नागपूर प्रकाशन क्र.—२३

# सावलीच्या उन्हांत

श्रीराम हरी अत्तरदे

एम्. ए., म. सा. वि.





नागपूर प्रकाशन, सिताबर्डी, नागपूर.

नागपूर प्रकाशन क्रमांक—२३

# सावलीच्या उन्हांत

( मिल्ल–पावऱ्यांच्या प्रश्नावरील स्वतंत्र कादंबरी )

लेखक

श्रीराम अत्तरदे, एम्. ए., म. सा. वि.



नागपूर प्रकाशन, सिताबर्डी, नागपूर.

# अर्पण

सावकारशाहीच्या पाशवी अत्याचारांना बळी पडलेल्या
ऊंबरगांव नी डहाणू भागांतील असंख्य
वारली हुतात्म्याना

# UNDER THE SCORCHING SHADE.

## PREFACE.

Most people ignore the evils of political trusteeship that is dominant in this country—in fact, they are methodically taught to believe that blackmarketeers, profiteers and sahukars, if thiey finance a national organization, are in no less degree patriotic and sacrificing than we ordinary people; that belief in their trusteeship of the country's politics is an inevitable necessity; and that what we people should do is to follow them, obey them blindly, not question their patriotism, and be mere 'soldiers of freedom'—what sort of freedom, nobody may ask.

It is this section of sahukars and good-for-nothing capitalists that are contaminating the country's politics today. In this novel I have tried to unmask the reactionary role of sahukars, the vested interests, and their mystic weaklings, that has been hindering the progress of peasants, politically and socially. The Bhils, the Pawaras and the Kolis of Khandesh and their problems are little known to the averrge Maharastriyan reader. This novel, in its limited field, may serve at least to bring them to the fore. These backward tribes have to this day been living in medieval ignorance and servitude, and the present trusteeship politics of reactionary zemindars, sahukars and profiteers serves to tighten the grip of medievalism over them. The real salvation of all peasants and backward tribes will come through their organisation in Kisan Sabhas all over the country.

The fallow region of the satpudas holds out brilliant prospects of development after elimination of all sorts of exploitation, and the Bhils along with their fellow tribes may well deserve to be ranked among the most skilled workers and technicians of India in future.

**Sri Rama Attarde**

# प्रस्ताव

चोराच्या मनांत चांदणं ही म्हण बदलून 'सावकाराच्या मनांत किसान सभा ' असं म्हणण्याइतकी प्रगति देशांत झालेली आहे. ' तिर्मक नाना ' ही माझी लघुकथा वाचून खानदेशांतला एक सावकार उखडला नी माझ्या वडिलांना तोंड टाकून बोलूं लागला, " तुमचा मुलगा असं लिहितो म्हणजे काय ? हरामखोरानं माझंच वर्णन केलं आहे. अगदी आगकाठी, नावनिशाणी, धंदा यांसह माझंच वर्णन. सावकारावाचून तुमचं चालत नाही. तुमचा मुलगा असं लिहूं लागला तर आमची बदनामी नव्हे का होणार ती ? "

गोष्ट खरी होती. " तिर्मक नाना " या कथेंत योगायोगानं तसाच प्रकार घडून आला होता. ध्यानीं मनीं नसतां अगदी त्याच सावकाराचं नावासह बिनचूक वर्णन उतरलं होतं. एका हायस्कूलच्या शिक्षकानं " ही कथा आहे. नांवं–नी पात्रं काल्पनिक असतात, " असं टासून सांगितलं तेव्हा तो सावकार स्वस्थ बसला. अर्थात् लघुकथा वाचण्याइतका सावकार ' विद्वान् ' असतो असं मला म्हणायचं नाही. आजकाल सावकार ' देशभक्त ' झाल्यापासून ' नवाकाळ ' हें कॉंग्रेसी वृत्तपत्र वाचणं त्याला आवडतं–'नवा काळां'त माझा मानसपुत्र ' तिर्मक नाना ' चमकला होता ! त्यांतलं संपूर्ण खानदेशी खेडुती वातावरण, अहिराणी बोलींतलें संवाद, हीं पुष्कळांना आवडलीं.

ह्या कादंबरींतील सर्व पात्रं काल्पनिक आहेत. घटना बव्हशीं सत्य आहेत असं मुद्दाम सांगून टाकतों. पण तेवढ्यावरून गावांचा नी स्थलादिकांचा संबंध सत्य आहे असं नव्हे. कुणाहि विशिष्ठ व्यक्तीवर टीका करायचा माझा कटाक्ष नाही, अर्थात् ' सावकार ' ही व्यक्ति ततोतंत उमटली तर त्याबद्दल मला आनंदच वाटेल. सावकारांचा नी भोंदू देशभक्तांचा दंभस्फोट करायला मी त्यांच्या पाचवीला पूजलेला आहे हें सांगून टाकतों. ' देशभक्त ' म्हणवणाऱ्या खादीधारी बगळ्यांच्या सावकारी छायेच्या दाहक उन्हांत लाखों श्रमजीवि

आत्मे कसे भाजून निघत आहेत हें ' सावलीच्या उन्हांत ' तुम्हांला सांगेल.. विश्वस्तांच्या राजकारणाचे दिवस संपले आहेत. कामगार किसानांच्या वर्गीय संघटनाच लोकशाही निर्मू शकतील हें निर्विवाद.

सातपुड्यांतल्या नी आसपासच्या भिल्ल–पावऱ्यांच्या राष्ट्रीय प्रश्नांवर प्रकाश टाकण्याचा मीं यथाशक्ति प्रयत्न केला आहे. राजकारणाच्या अभ्या-सकांनी योग्यायोग्यता टरवावी.

कादंबरी लिहिण्यांतला एक हेतु मतप्रचाराचा असला तरी ज्या गरीब कर्जबाजारी शेतकरी वर्गातून मी आलों नी ज्यांत कार्य करतो, त्यांच्या वर्गीय संघ शक्तीचा मनःपूर्वक अभिनिवेश हाहि दुसरा हेतु आहे.

यांतील ' पुढेच आता पुढेच पाय ' हें गाणें मुद्रित करायला संमति दिल्याबद्दल कॉ. वसंत वैद्य यांचे नी ' किसान सभा शेतकरी नी ' या पद्याचें अहिराणींत रूपांतर करण्यास नी छापण्यास संमति दिल्याबद्दल कॉ. अमरशेख यांचे आभार मानतों.

जळगाव, पू. खा. लेखक

# १

झाडांच्या सावल्या पूर्वेकडे लांब पसरल्या होत्या. समोरच्या अंजनाच्या झाडाआडून सूर्यनारायण आपले अखेरचे कटाक्ष हलुवारपणें फेकीत होता. धरतीवर पसरलेलं ऊन नरम झाल्यानं, नुकतंच लग्न झालेल्या मुलाच्या धोतरासारखं पिवळट दिसत होतं.

समोरच्या लवणाच्या झाडीआडून अधूनमधून शेतकऱ्यांचे गाडे येतांना खडखडाट होई, डोकीवर रिकाम्या घागरी घेऊन परत येतांना मजूरणी हातपाय धुण्यासाठी लवणाकांठी थांबत, त्यांची घरगुती विषयांवरील बोलाचाल थोडीफार ऐकूं येई, मायबाप शेतांतून आता येणार हें गाड्यांच्या खडखडाटावरून आणि बैलांच्या तांबी घंट्यांच्या आवाजावरून जाणून झोपड्यांतून गावठाणावरील हाळापर्यंत पळत आलेल्या पोरांपोरींचे उतावीळ बोलदेखील लक्ष्य वेधून घेण्यासारखे होते.

हाळावर शंकर मोटकरी नेहमीप्रमाणे आताहि मोट हाकलत होता. एका बैलाचीं लेंडीमुंडीं शिंगं तर दुसऱ्याचं एक शिंग ठेलारं नी दुसरं मोडून लहानसं धूड उरलेलं. दोन्ही बैलांचे कप्पे लागून गेलेले. फासळ्या काळ्या ठिक्कर पडलेल्या. ढोपरांची कातडी हाडांना बिलगलेली नी पाठीवर कावळ्यांनी कोरल्यामुळं रगताळलेले लालभडक टोचे. असा त्यांचा दीनवाणा नूर. तरीहि पाठीला पोक काढून नी मान खूप पुढं ताणून तोंड जमिनीला भिडेपर्यंत आवकाळ्या करीत ते मोट ओढीत होते !

अख्ख्या गांवाची तहान भागवण्याचं काम त्या दोन जिवांना करावं लागत होतं.

बाया पाणी वाहात होत्या. ढोरांसाठी मोठं लांब कुंड होतं, तिथं गाई म्हशी येऊन पाणी पिऊन जातांना घटकाभर थांबत, चाऱ्यासाठी जमीन सुंगत, रोडावलेलीं. शरिरं अंजनाच्या खरखरीत बुंध्याशी खेटून कंबर तोलत चालत होत्या.

आकाशांतून मिठ्ठूंचे कळपच्या कळप भराऱ्या मारीत नी केकाटत येत, शेतांतल्या पिंप्रीच्या झाडावर बसत, घटकाभर तिथं केकाटून पुन्हा फडफडून उठत नी उडत-उडत लवणांच्या दिशांनी खेपा घालीत. साळुंक्या, हाडे, किलकिले, यांचेहि थवेच्या थवे उडत येत. झाडांवर बसत.

सातपुड्याच्या दऱ्याखोऱ्यांत अंधार पसरत चालला होता. कांही टेकड्यांवरील झाडांवर ओसरतं पसरलेलं ऊन टाहुल्यांसारखं दिसत होतं.

शिकार-बरडीच्या बाजूनं झाडींतून येणाऱ्या गुरांकडं सहजगत्या पण विशेष तटस्थपणानं पाहात रामभाऊ दारच्या मैचीवर बसले होते. काळाच्या क्रूर लीलेमुळं त्यांच्या काळ्यासावळ्या चेहऱ्यावर सुरकुत्यांचं जाळं पसरलं होतं.

आज सारखीं सतरा वर्षे रामभाऊ अनुभवाचे आघात सोशीत आलेले होते. सेवामय जीवनाचा पुरस्कार करणाऱ्या या सेवानंदाचीं सगळीं स्वप्नं

धुळीला मिळालीं होतीं. जिवावर उदार होऊन नी सर्व सुखांना लाथाडून लोकसेवेचा जो मार्ग आपण अवलंबिला तो चुकीचा होता, त्या मार्गानं केलेल्या सेवेचा सातपुड्यांतील अनादि काळापासून अज्ञानांत खितपत पडलेल्या भिल्ल–पावऱ्यांना म्हणण्यासारखा उपयोग होण्यासारखा नव्हता, ह्या विचारांनी आजकाल रामभाऊ अत्यंत उदास असत. अशा वेळेस अंगणांत मैचीवर किंवा लाकडाच्या ओंड्यावर बसून भकासपणें बरड्यांकडं टक लावून बघण्याचा त्यांचा अलीकडचा स्वभावच बनून गेला होता.

बरडीकडं निरखून पाहतांनासुद्धा भाऊंच्या तोंडावर हरघडी छटा कमी-अधिक तीव्र होत होत्या. भोवतालच्या निसर्गाशी विसदृश अशी त्यांची चर्या त्यांच्या मनांतील निराशेच्या विचारांची स्पष्ट द्योतक होती. मानवी जीवितांतील विषमतेचा नी अन्यायाचा इतका कडू प्रत्यय यापूर्वी त्यांना कधीहि आलेला नव्हता. त्यांच्या मनाला आंतून असह्य वेदना होत होत्या!

मैचीवर त्यांच्या पाठीशी उभा असलेला नऊदहा वर्षांचा नामू आपल्याच आनंदांत गर्क होता. ह्याळावरून जाणारीं ढोरं जवळून जाऊं लागलीं किंवा दारीं लावलेल्या निंबोणीच्या झाडाला कुरतडण्यासाठी शिंगांनी वडांग खेटूं लागलीं म्हणजे चट्दिशी उतरून दोनचार दगड तो त्यांच्यावर फेकून मारी. एखाद्या ढोराच्या पोटावर दगड अचूक बसला म्हणजे नेमबाजीच्या आनंदांत त्याची कळी खुले! पुन्हा बापाच्या पाठीवर रेलून तो गंमत पाहूं लागे.

डोंगरांच्या बाजूनं 'टणमण टणमण' असे आवाज खूपच ऐकायला येऊं लागले. ते जास्त जवळ ऐकूं येतांच बापाला सोडून नामू अंगणाबाहेर मोटेच्या धावेकडं पळाला. त्याला आनंद झाला. बालस्वभावच तो!

"करंटी आली बापा करंटी!" म्हणत तो टाळ्या वाजवीत नी मांड्या पिटीत नाचूं लागला.

रामभाऊंची नजर आता कुठं ढळली. मोटेकडं नी सभोवार एकदा नजर फेकून ते अमाक उठले. आपण इतका वेळ कसे बेभान बसलें याचं

त्यांनाच हासूं आलं. नंतर खोपटाचा टोकर हातांत धरून त्यांनी आंत विचारलं,

“ दाणं भिजत घातलंना आज ? दे बरं पाटवून.”

आंत पाट्या-वरोट्याची घरघर चालली होती, म्हणून ते तसेच आंत गेले.

“ संबार वाटती ( चटणी वाटतेस ) ?” असें म्हणून उत्तराची वाट न पाहतां ते पलीकडल्या दाराकडं वळले. कुडांचा आडोसा लावलेल्या मोरींतून दाणाची घमेली घेऊन आले.

“ नाम्या आहे नं दारीं ? तो करीन दान चारा. आमाक इसावा त पाह्यजे जिवाले. कामकाम काम. बसा. घटकाभर. पोऱ्याले सांगा घमेल्याचं न् चारापान्याचं ” पत्नीचे जिव्हाळ्याचे बोल ऐकून रामभाऊंना किती बरं वाटलं. त्यांनी घमेली दारांत ठेवली.

“ जिवाचं रान त दरोजच आहे पन थोळुकसा बी इसावा नको का ? म्हनून म्हतलं, तुम्हले त सोताची निभून कायजी नाही.” चिंधाबाई काम थांबवून बोलली.

“ पन तू कितली कायजी करती माही जव्हा-तव्हा ?” बायकोकडं पाहात भाऊंनी उत्तर दिलं. त्यांनी तिच्या हातांकडं पाहिलं. खूपच जाड लाल भडक बिलोर हातांत भरलेले होते. झिजून-झिजून नावाला उरलेले दोन गोट मात्र काय ते जास्त होते. हातांना फोड येऊन, फुटून घट्टे पडले होते. राठ झाले होते हात.

करंटी हाळाजवळ येऊन ठेपल्यामुळं तिच्यांतील आपले बैल आवरण्यासाठी नी दाण चाऱ्यासाठी रामभाऊ दारीं आले, “ नाम्या, चारा-बिरा आनूं लाग तुहे बापाले” असा आईचा हुकूम सुटतांच त्या शहाण्या मुलानं बापाच्या हातांतील घमेली ओढून घेतली नी तो बैलांच्या धाबलीकडं कुदत गेला.

"नाचत आले गनपति होऽऽ आनंदें राधे" हें नामूचं गाणं ऐकून रामभाऊंचा विषाद मावळला.

× × × ×

बरड्यांच्या पायथ्याशी बैलांची करंटी येतांच कौतुकानं टाळ्या वाजवणारा नी मांड्या पिटणारा नामू आता धावलोंत बापाला दाणचाऱ्याच्या नी दुसऱ्या हलक्यासलक्या निवरासवरीच्या कामांत मदत करण्यांत गुंतला होता. बापाच्या पुढं-पुढं करण्यांत त्याला जी हौस वाटे ती त्याची त्यालाच ठाऊक. ओखर किंवा बाजरीच्या कुटाचे टोमे इकडून तिकडं ओढीत सारण्यांत त्याला पुरुषार्थ वाटत होता, कारण मोठ्या माणसाचीं तीं कामं आपण कुथतकुथत का होईना करतों यांत त्याला अभिमान वाटे. तशांत "पोऱ्या, पायावर पडेल कांही. गाठबिठ ढळेल रे !" असं बापानं म्हणतांच "अं. काही नही व्हत माले" असं उल्हासी बेफिकिरीचं उत्तर तो देई. भाऊंना त्याच्या त्या "अचाट" कामाबद्दल कौतुक वाटे.

करंटी मोठी असल्यामुळं अजून बैलांची पाण्यासाठी हाळावर झुंबडच लागून राहिली होती. घंट्याचे आवाज निरनिराळे पण एकदम ऐकूं येत होते. गंमत वाटे ते ऐकतांना. काही बैलांचीं शिंग खूपच मोठीं, कांहींचीं वेढां वाकडीं नी कांहींचीं मोडकीं तोडकीं. टकराटकरींत एका वळूचं शिंग पिरगळलं जाऊन थोडं रगताळलेलं असून देखील किती तिखटपणानं रग दावीत तो चालला होता. पण तो एका सावकाराचा वळू असल्यामुळं खादीनं पुष्ट झालेला होता. इतर गुरांची स्थिति वेगळी. बहुतेक गुरं हाडकीं, लंगडीं, फुटकीं, अशींच. सातपुड्यातून बैल चरून आलेले असले तरी ते मगम झालेले दिसत नव्हते, कारण बराचसा गवताळ भाग राखीव असून बाकीच्या बरड्या मात्र चराईला खुल्या होत्या. दररोज तेंच तें खुरटलेलं गवत कुरतडून गुरं भुकेलेलींच राहात; त्यांचे कप्पे लागून गेले होते अगदी. हाळाच्या कुंडावर सातआठ खंडी गुरांनी खूपच गर्दी केली. सगळीं तहानलेलीं. एखादं ढोर पाणी पिऊन परत फिरलं म्हणजे त्याला बाहेर येण्यास मार्ग मिळण्याची पंचाईत. करंटी बैलांची असली तरी

तिच्यांत ढोरक्यांनी म्हशी, गाई, सुद्धा आणलेल्या होत्या. म्हशींनी शिंगांचे ठोसे लगावीत खुशाल पाण्यासाठी मार्ग चिरावा.

एवढ्या करंटीवर तीनच्च ढोरक्ये होते. ढोरांनी गलतीकडं फाकून जाऊं नये म्हणून ते दूरवर अलग उभे होते. ढोर जाऊं लागलं एखादं, की दगड फेकून वा हयहय करीत त्यांना थोपवण्याचा ते प्रयत्न करीत. तरीहि भुकेमुळं कांही ढोरं शेजारच्या खोदऱ्यांत उतरलीं, काही उकिरड्यांवर चढलीं, कांहींनी जवळच्या शेतांतील कडब्याच्या गुडाकडं मोर्चा वळवला.

अखेर पांगलेलीं ढोरं ढोरक्यांनी परत फिरवून मार्गाला लावलीं. कांही हाळावरच होतीं. चारपाच गावचीं सारीं ढोरं. नागलवाडीच्या रस्त्यानं करंटी जाऊं लागली. गांवांतलीं ढोरं मालकांनी आंगीं लावून घेतलीं.

ज्या बरड्यांकडून करंटी आली होती, तिकडूनच घोड्यांच्या टापांचा परिचित आवाज येऊं लागला. गावांतला जागल्या हवालदार साहेबांच्या बिब्बीनं आणायला सांगितलेलीं भेंडी कुणाच्या तरी परसांतून मिरासदाराप्रमाणे आणून देऊन त्यांच्याच दारच्या खोपटवजा पडवीबाहेर गवाराच्या शेंगा निसून ठेवीत होता. टापांचा आवाज ऐकून तो चमकून गल्लींत आला नी घोडा पाहून आपला दंडा हातांत घेऊन घोड्यापुढं दौडूं लागला. घोड्याची गति कमी झाली होती म्हणून बिचाऱ्याला दौडतां आलं. म्हातारा होता तो.

रेंजरसाहेब आकस्मिकपणें आलेले पाहून कामदारांना अचंबा वाटला नी नेहमीच्या तजविजीसाठी त्यांची धांदल उडाली. भाऊंच्या झोपड्यासमोर मोठं पटांगण होतं. हाळाच्या मागील बाजूस पाटलाचं झोपडं. घोडा पटांगणांत उभा राहिला.

"पाटील ! ए पाटील !" रेंजरसाहेबांनी हुकमी आवाजांत हाक मारली.

दुसरा जागल्या पाटलाच्या घरीं पाणी भरत होता. तो घागर घेऊन बाहेर येणार तोंच रेंजरसाहेबांना पाहून घागर तिथंच टाकून पाटलाला हाका मारूं लागला. पाटील घराबाहेर आला.

“ हारामखोर ! आते हाका मारस का ? साहेब दारसे उनात तहो हाका मारवो ? इज्जत घाली देशी मन्हि ” ( हरामखोरा ! आता हाका मारतोस का ? साहेब दारी येऊन ठेपल्यावर हाक मारायची होय ? अशानं इज्जत घालवशील माझी )–जागल्याला दरडावून पागोटीचे सर डोक्याला गुंडाळीत पाटील तसाच दौडत आला.

“ काय पाटील ? काय करीत होतास ?......” किती तरी एकाच दमांत विचारून टाकलं साहेबांनी. पाटील अजीजी करीत उभा होता. “ पुरे तें. तीं ढोरं परतवून आणा लवकर. पळा.” हुकमासरशी रेंजरसाहेबांनी पाटलासकट सर्व कामदारांना थोरथाटीकडं ढोरं परतवण्यासाठी दामटलं.

बिचारे ढोरक्ये गोंधळून गेले. लोक ओरडत येतात काय नी ढोरांना मारहाण करीत परतवतात काय, सारं एकदमच. पाटलानं तर एकाला सण-सणीत ठेवून दिली सुद्धा. “ तुन्हा आंडेरना × × × ? लई च्यालनात ढोरे ? कूपमां का तुम्हना × × × घाला व्हंत्यात ? ”

ढोरक्यांना या शिवीगाळीचा राग आला. त्यांनीहि दोन शब्द पाटलाला सुनावले. पण पाटलाच्या अंगांत रेंजरसाहेब संचरले होते. त्यानं गर्जना केली—“ रंजक साहेब उना तो तुम्हना बाप ! सांगा त्याले करम तुम्हनं. मापें कसाले दाई राह्यनात तुम्हू ? मरा ना आतें हाराम मौतें ! ( रेंजर साहेब–तो तुमचा बाप–आला आहे ना. सांगा त्याला तुमचं नशीब. माझ्यासमोर कशाला ( दिमाख ) दाखवतां ? मरा ना आता हराम मौतीनं ) ”

“ रंजक साहेबा ” चं नांव ऐकतांच ढोरक्यांचे सात गेले नी पाचच राहिले ! सगळे घाबरले. साहेब कांही तरी करणार नी इकडं मालक दुट्टी भरणार. इकडं कराड नी तिकडं पहाड अशी त्यांची अवस्था झाली.

ढोरं तीं ढोरंच. अंगांत त्राण नव्हतं तरी आटोपत नव्हतीं. आलटून पालटून घराच्या रस्त्यानं पळायला पाहात. वडांगी मोडून आजूबाजूच्या शेतांत घुसूं लागली.

पटांगणांतील आरडाओरड ऐकून नामू अगोदरच बाहेर आला होता. अशी वार्ता बापाला सांगितल्याखेरीज तो कसा राहणार ? भाऊ गिलकं उघडून बाहेर आले. " नाहाप आहे ह्या अधिकाऱ्यांची ! " एवढेच उद्गार त्यांच्या तोंडून बाहेर पडले.

आपली मैची पटांगणांत आणवून तिच्यावर रेंजरसाहेब बसले आहेत नी पाटील त्यांच्या शेजारीं हुजऱ्यासारखा अर्धवट वाकून अदबीनं कांहीसं बोलत आहे; ढोरक्ये गुन्हेगारांप्रमाणे ईवलींशीं तोंडं करून गुरांच्या बाजूला उभे आहेत; हें सारं पाहतांच भाऊंना सगळा उलगडा झाला.

रेंजरसाहेबांनी ढोरक्यांना अद्वातद्वा बोलून नी ठोसे लगावून भेदरवून सोडलं. राखीव कुपांत गुरं घातल्याचा त्यांच्यावर आरोप होता. त्यांतल्या एका म्हाताऱ्या ढोरक्यानं पुढं येऊन सोडून देण्यासाठी रावण्या करतांच रेंजरसाहेबांनी त्याला धक्के मारायला सुरवात केली. बिचाऱ्याचं पागोटं विस्कटून खाली पडलं. साहेबांना आजा शोभणाऱ्या त्या काळकट नी शेलाट्या आंगकाठीच्या म्हाताऱ्यानं जितक्या अजीजीनं रावण्या केल्या तितक्याच स्वाभिमानानं आता पुढं येऊन त्यांना बजावलं, " साहेब, कोन्ता भरान्तीमा स ? मन्हं पांघोटं ऊळाई लावनं तुले सोबस ? आरे, भिलटानं हाळ स. मन्हि पांघोटी उळाई ते तुल्हे बी देखी लेसू—भिलटानी आदावत मालूम नही स तुल्हे, साहेब ! ( साहेब, कुठल्या भ्रान्तींत आहेस ? माझं पागोटं उडवून लावणं तुला शोभतं तरी का ? अरे, भिल्लाचं हाडपेर आहे हें. माझं पागोटं उडवलंस, तुला पाहून घेईन. भिलट्याची अदावत ठाऊक नाही तुला अजून. ) "

हे शब्द ऐकून मात्र साहेब चरकले, पण गुर्मीनं त्यांनी जागल्या करवी त्याला धक्के देववले. म्हातारा तणतणून बजावीत होताच.

रामभाऊंनी उघड्या डोळ्यांनी तें दृश्य पाहिलं. पाहाणं भाग होतं. तो म्हातारा —मुंदऱ्या भिल—आजवर त्याच्याशी त्यांची वेगवेगळ्या निमितानं केवढा संबंध आला होता. " देईन तर प्राण देईन, घेईन तर प्राण घेईन "

हा सुंदऱ्याचा बाण कधीहि खोटा पडलेला नव्हता. साहेबांनी सुंदऱ्याला डिवचायला नको होतं, पण तो डिवचला गेला होता हें खरं.

एकदोन ढोरं कुपांत नजरचुकीनं घुसलीं असतील, तो मोका साधून साहेबांनी हा प्रसंग आणला होता. ढोरांची गणती करण्यांत आली. पंचनामा झाला. सगळीं ढोरं कोंडवाड्यांत घालण्याचा पाटलाला हुकूम झाला.

एका सुंदऱ्या भिलाखेरीज सगळे ढोरक्ये आता हुंदके देत साहेबांकडं धावले. कोणी पायांवर डोकं ठेवतो, कुणी हात जोडतो तर कुणी "साहेब! साहेब! गरीबवरते दया करा. गुन्हा माफ करा साहेब!!" म्हणून गयावया करूं लागतो. "पोऱ्हे सोरेस्ना धनी शेहोऽऽ (पोरासोरांचा धनी आहें होऽऽ)" म्हणून ढोरक्ये धाय मोकलून रावण्या करूं लागले. सुंदऱ्याला पाहून साहेबांचा दिमाख वाढतच होता. त्यांनी आग पाखडायला पुन्हा सुरवात केली— "हरामखोर! कुपांत ढोरं घालून आणखी वर पायां पडतात. दाढी धरतात! चला व्हा एकीकडं. पाटील, कोंडवाड्यांत ढोरं हाकल म्हणून सांगतो ना. चला, उशीर नको. व्हारेदूर. चल, हट".

धुडक्या कोळी पुढं आला. "साहेब—साहेब—धकाना कळ्हे देखी ल्या एकबखत. धवया बाल जायात. हुबा जलममा गुन्हा नहि क्या. कूपमा ग्यात नहि ढोरे. ग्यात नहि व्हो साहेब! (साहेब, म्हाताऱ्याकडं बघा जरा एकदां. केस पांढरे झाले पण उभ्या जन्मांत गुन्हा केला नाही. कुपांत ढोरं गेलीं नव्हतीं, नाही हो साहेब, कुपांत नाही गेलीं ढोरं!)"

"वरून खोटं बोलतोस आणखी? कुपांत ढोरं गेली नव्हती मग का तुझ्या ×××× गेल्या होत्या? तुझा बाप चरला का तिथं? लबाड लोक. डांबीस आहेत सारे. चांगला तडाखा दाखवला म्हणजे कळेल."

पायांवर पडलेल्या ढोरक्यांना ढकलून साहेबांनी गावकऱ्यांना ढोरं कोंडवाड्यांत घालायला सांगितलं. अर्ध्या तासभर चाललेला आकांत नी आरडाओरड जाऊन स्मशान शांतता पसरली.

ढोरक्यांना जमीन फिरत आहेशी वाटली. मटकन् खाली बसले. धुडक्या अन् हामजी या दोघांचं लक्ष्य गिलक्याजवळ उभे असलेल्या भाऊंकडे गेलं. भाऊंचे भेदक डोळे कारुण्यानं थवथवले होते.

हामजीवा तीरा सारखा धावत गेला नी भाऊंच्या पायावर डोकं ठेवून रडू लागला—" जीभू ! गरीबनी कीव करा व्हो. संबाई ल्या आव्हळा वखतले. दादा ऽऽ ! गांधी बाप्पाना आवतार आते कसा मुगा बटना ?? ( जीभाऊ ! गरीबाची कीव करा हो. सांभाळून घ्या एवढ्या प्रसंगी. दादा ! गांधी बाप्पाचे तुम्ही अवतार आता कसे हो मुके राहिलांत ? ) "

जागेवरून बाजूला होत नी म्हाताऱ्याला मध्येच हातांनी सावरीत भाऊ पाटमोऱ्या साहेबाकडे पाहात होते. नंतर म्हाताऱ्याला ते प्रेमानं बोलले, " नको, हामजीबा, पाया कसाले पळस मन्हा ? आरे, तू धल्ला शे. लळस काय आसा ? मी काय करसू आते ? देखीशी आतळा तुटतस रे ! पन—ग्यात त्या दिन. मन्हा हातमा काय शे आते ? पाटीलकी गई, इनाम—वतन— सम्दं गे ! बन्धूकना परवाना बी ग्या ! मी आते तुन्हमाईकस शे रे भो हामजीबा ! ! ( नको, हामजीबा, पायां कशाला पडतोस ? अरे तू म्हातारा. रडतोस काय असा ? मी काय करणार आता ? पाहून आंतडी तिळतीळ तुटतात रे ! पण—गेले ते दिवस. माझ्या हातांत काय आहे आज ? पाटीलकी गेली, इनाम—वतन—सगळं गेलं. बंदुकीचा परवाना पण गेला ! मी आता तुझ्या-सारखाच आहे रे हामजीबा ! ) "

त्यांच्यानं पुढं बोलवेना. गळा सद्गदित झाला. म्हाताऱ्याची दशा पाहवेना, त्याच्या रावण्या ऐकवेनात. मागील सारा इतिहास डोळ्यांसमोर उभा राहिल्यामुळं क्षणभर वेड्याप्रमाणेच डोंगराकडं पाहात ते निःश्वास सोडीत उभे होते. सेवामय जीवनाची विफलता, अन्यायाची चीड, अगतिकता, इत्यादि अनेक गोष्टींनी त्यांचं चित्त व्यग्र झालं. " आम्ही पोराबाळांचे धनी आहोत, आमच्यासाठी साहेबांना शब्द टाका " अशी ढोरक्यांची बिनवणी ऐकून राम-भाऊंना आपली अगतिकता असह्य झाली.

" साहेब "—हाक ऐकतांच साहेबांनी मागं वळून पाहिलं. रानडुकराला बेंबट दिसावं तशी साहेबाची स्थिति झाली. पण त्यांनी स्वतःला सावरलं. भाऊंची लोकसेवेची कीर्ति नी आत्मबलाचा अधिकार या ठिकाणीं त्यांना पराभूत करूं शकणारा नव्हता. किंबहुना त्या जगल सेटलमेंटमध्ये भाऊंसारखा मनुष्य राहूं देणं अहिताचं वाटल्यावरून साहेबांनी अलीकडं त्यांना काढून लावण्यासाठी अर्जफाटे चालवले होतेच. आपल्या सेटलमेंटमध्ये लोकमनावर सत्ता गाजवणारे भाऊ त्यांना नकोसे वाटल्यास आश्चर्य नाही; परंतु समोरच्या लोकांदेखत—त्यांत अर्धे अधिक भिल्ल होते—त्यांनी भाऊंना वरकरणीं नरमाईनं वागवण्याचं ठरवलं होतं. तथापि आताचा प्रसंग वेगळा होता. ढोरक्यांची कैफियत भाऊंनी पूर्ण मांडली नाही तोंच साहेब तिरसटपणानं गरजले—" तुमच्या वकिलीची गरज नाही. अन् तुम्हांला या सेटलमेंटमध्ये जागा देणारं कॉंग्रेससरकार पांच वर्षां पूर्वीच राजीनामा देऊन चुकलं आहे हें विसरूं नका "
भाऊंनी थोडं बोलण्याचा प्रयत्न केला, पण साहेबांनी ऐकणं टाळण्यासाठी पावलं दुसरीकडं फिरवलीं, मात्र तसं करतांना भाऊंकडं अधिकाराची करडी नजर टाकण्यास ते विसरले नाहीत !

---

# २

निर्गुडीच्या फोकांचे कूड लावलेल्या धाबळींत तीन बैल आणि एक तुटकं घोडं नुकत्याच टाकलेल्या कडब्यांचे धांडे करडत होतीं. धांडे करडतांना बैलांच्या गळयांतले घोगर वाजत. बाहेर एकदोन ढोरं थकून बागूल करीत होतीं, त्यांच्या दातांचा 'कुडर कुंर' असा आवाज होत होता, जसा कांही खुराड्यांतला कोंबडाच कुचकुचतो आहे.

अंधार पसरलेला. धाबळींतल्या मोडक्या संसाराचा देखावा गोड्या तेलाच्या दिव्याच्या उजेडांत अधिकच भेसूर दिसत होता. ओखराच्या दोन पासा, एक कुसा, दोनतीन टोपल्या, नांगराचा कऱ्हो, सादड्याच्या लाकडाचीं दोन बांडकं, मोडका पेटारा, वगैरे. त्या भकास धाबळींत एका तुटक्या खाटे-वर रामभाऊ लवंडले होते. ढोरक्यांची दैना पाहून नी आपल्या पूर्वायुष्याची हकीकत आठवून भाऊंचं मन उदास झालं होतं. ते वरोबर जेवले देखील नव्हते. फाटक्या धोतराला गाठी मारून नी ठिगळं लावून नीटसं करावं आणि

बसायला जावं, तोंच तें गुडघ्यावर टरकन फाटावं, पुन्हा त्याला चर भरावे, पण त्या चरांना लागूनच तें आस्ते आस्ते विरत जावं; असा त्याचा खुर्दा झाल्या-वरहि आपण तें नेसण्याचा प्रयत्न करावा;—तसंच कांहीसं त्यांच्या आयुष्याचं झालं होत. ठिगळं दे देऊन देणार किती ?

मागील आयुष्याचा सगळा चित्रपट भाऊंच्या डोळ्यांसमोरून सरकूं लागला.

धरणगांव-चोपडा सडकेवरील तापी काठावरच्या सावखेड्यांत मन्साराम भारंबे आपल्या गोड स्वभावानं अन् अडीअडचणींत सर्वांच्या उपयोगीं पडण्या-च्या तत्परतेनं सगळ्या गावाला प्रिय झाले होते. दोन बिघ्यांचा मालक तो कितीसा श्रीमंत असणार ? मजुरी करून जमाखर्चाची तोंड मिळवणी करावी लागे. म्हातारपणीं नवसा–सायासांनी मुलगा झाला पण बायको पटकीनं एका दिवसांत देवाघरीं निघून गेली. म्हाताऱ्या मन्साराम बोवांना तो आघात असह्य झाला. आयुष्यानं तशा उतारवयांत पुत्र प्राप्तीचा आनंद देऊन हा दुःखाचा आघात केला होता. संसाराचा हा निष्ठुर चमत्कार उघड्या डोळ्यांनी पाहात मुलासाठी जीव घट्ट करणं भाग होतं. मन्साराम बोवांनी दुःख गिळलं, मन घट्ट केलं, नी मुलाच्या भवितव्यासाठी आयुष्याची पुनर्घटना केली. मुलाला टाकून मजुरी करणं शक्यच नव्हतं गरिबाला त्या वयांत दुसरी बायको मिळणंहि अशक्यच होतं. सात ईयत्ता शिकून जगाचे व्यवहार त्याला माहीत झाले असल्यामुळं धरणगांवच्या सुरजमल सावकारानं आपल्या मोटार सर्व्हिसचीं टिकिटं फाडणारा एजंट म्हणून बोवांची सावखेड्यास नेमणूक केली.

मोटारधंद्यांतील बेरडपणाचे, लाचलुचपतीचे नी कांही सौजन्याचे अनु-भव मात्र बोवांना नवीनच होते. तरीहि सचोटीनं त्यांनी काम चालू ठेवलं. वीस रुपयांच्या वेताच्या पगारांतून दरमहा थोडी शिल्लक टाकून त्यांनी मुलाच्या शिक्षणाची तरतूद करण्यास आरंभ केला. दिवसभर सडकेवरील लहानशा हॉटेलाच्या खोपटांत त्यांचा वेळ जाऊं लागला. पण रामदासचं—एकुलत्या एक मुलाचं—

बाप दिवसभर मोटारींच्या तिकिट भरतीच्या कामांत गुंतलेला, आई नाही, आणि गावांतील उनाड मुलांची संगत, यामुळं रामदास अर्ध-नागड्या अवतारांत सारखा भटकत असे. कुणाच्याहि घरीं जेवून घ्यावं, लवणाकाठीं झाडाखाली गोट्या खेळाव्या, बरडीवरून घसरगुंडी खेळत हुंदोस घालावा, किंवा तापीच्या विस्तीर्ण वाळवंटांतील डांगरां-टरबुजांच्या दुकानांभोवती हिंडत फिरावं, हा त्याचा इतर सोबत्याच्या संगतींतला दररोजचा कार्यक्रम होता. एकदा सोबत्याच्या भमलतीत सामील होऊन दुकानामागून टरबुजं चोरत असतां अचानक सापडल्यामुळ भोयानं त्याला खूप मार दिला. गावांतला वेडू सुतार कांही कामासाठी वाळवंटांत आला होता. त्यानं त्याला सोडवलं. पण मोटारांच्या धक्क्यावर जाऊन "काय मन्साराम बोवा, म्हातारपणचे चिरंजीव चोऱ्यासुद्धां करायला लागलेत!" असा टोमणा मारून हकीकत सांगायला तो विसरला नाही.

मन्साराम बोवांना फार दुःख झालं. यासाठी का त्यांनी जीव घट्ट केला होता? एवढ्याचसाठी का त्यानी मोटार-धंद्यांतली ही तावेदारी पत्करली होती? आयुष्यांतील एकच एक आशास्थान असलेल्या मुलाला त्यांनी त्या दिवशीं रात्रीं पहिल्यानंच बेदम मार दिला. त्याचे हातपाय बांधून आकोड्यानं पीळ दिला! रामदास धापा टाकूं लागला. बापाचं हृदय! बोवांना एकदम उपरति झाली. स्वतां होऊन त्यांनी रामदासचे हातपाय सोडून त्याला एकदम पोटाशी धरलं. त्यांच्याहि डोळ्यांत आसवं उभीं राहिलीं. रामदासानं तें दृश्य पाहतांच हुंदका दिला. वृद्ध पित्याला अश्रु गाळीत असतांना तो पहिल्यानंच पाहात होता. बेदम मार देऊन आकोडा लावणाऱ्या बापाचं हृदय कठोर तितकंच प्रेमळ आहे हें त्याला कळून चुकलं. पाय धरून तो स्फुंदत बोलला, "बाबा, पुन्हा नाही असं करणार हो."

स्वयंस्फूर्तीचे ते बोल ऐकून बोवांचा सगळा राग पार विरघळून गेला. रामदासाच्या तोंडावरून हात फिरवीत ते सद्‌गदित होऊन बोलले, "पोरा, तुझ्यासाठी की रे जीव तगवला आहे. शेवटच्या दिवसांत असे प्रसंग आणूं नको माझ्यावर. तुझ्यासाठी एवढी आटापीट. मोठा होशील, बापाचं नांव काढ-

शील, हा भरोसा. ' मन्साराम बोवा भारंख्याचा मुलगा ' म्हणून सगळयांनी नावाजावं ही माझी मोठी इच्छा. ती पूर्ण झाली की सुखानं डोळे मिटेन एकदाचा " त्यांच्यानं पुढं बोलवेना. ते उठले. जड पावलांनी चुलीकडं गेले. दोन भाकरी ठोकून तिखट वाटून त्यांनी ताट वाढून घेतल. शेजारून पावशेर दूध विकत आणून त्यांत गूळ घालून रामदासला त्यांनी अर्धी भाकर नी दूध वाढलं. दोघांनी जेवण केलं. रडून रामदास थकला होता. त्याला झोप लागली. बोवा ज्ञानेश्वरी वाचायला ओसरींत दिवा घेऊन आले.

आयुष्यांतला हा पहिला रोमांचकारक प्रसंग आठवून रामभाऊंचे डोळे ओले झाले. म्हाताऱ्याची आसवं गाळणारी ती कृश मूर्ति, तिचे हृदय पिळवटून निघालेले ते मर्म भेदक उद्‌गार—" मन्साराम बोवा भारंख्यांचा मुलगा म्हणून सगळ्यानी नावाजावं ही माझी मोठी इच्छा. ती पूर्ण झाली की सुखानं डोळे मिटेन एकदाचा !"—सारं काही त्यांना प्रत्यक्ष घडत असल्यासारखं वाटलं.

मन्साराम बोवांनी रामदासला शाळेंत घातलं. मोटार स्टँड जवळ थोड्या अंतरावर शाळा होती. उखर्डू मास्तरनी त्याच्याकडं विशेष लक्ष्य देण्याचं कबूल केलं. मास्तरांच्या मुलीच्या अंगांत चुडेलीचा संचार झाल्याचा समज होता. ती चुडेल मन्साराम बोवांनी काढली होती. बोवा भगत होते. शिवाय दवाईचं ज्ञान त्यांना होतं. त्यांच्या घरगुती दवाईनं बऱ्याच जणांना गुण आलेला होता. मास्तरांच्या हरघडी उपयोगीं पडण्यात बोवा कसूर करीत नसल्यामुळं ते रामदासकडं जातीनं लक्ष्य देऊं लागले. मास्तरांना मुलगा नव्हता. तेहि वयानं उतार झाले होते. बोवांचं नी त्यांचं बरंच बोलणं झालं. रामदासचे पालक आतां स्वतः मास्तरच बनले. शिवाय शिकवणीचे दरमहा दोन रुपये द्यायचं बोवानी कबूल केलं. रामदास अभ्यास करूं लागला.

तथापि सोबत्यांची संगत तुटणं अशक्य होतं. वेळ साधून रामदास त्यांच्यांत मिसळे. मात्र चोरीचपाटीसारख्या कामात तो भाग घेईना. मागील प्रसंगाचा त्याच्या मनावर परिणाम झाला होता.

शाळेंत उखर्डू मास्तरांनी एकदा ध्रुवाची गोष्ट सांगितली. दुसऱ्यांदा कर्णाची सांगितली. पण त्यांपेक्षाहि नचिकेताची गोष्ट रामदासला फार आवडली.

बाणेदार नी कर्तबगार मुलांच्या या गोष्टी त्याच्या बालमनावर फार परिणाम करत्या झाल्या. त्याच्या वृत्तींत अंतर्मुखता येऊं लागली. पूर्वीची हूड वृत्ति कमी होत चालली. हा फरक बोवांच्याहि ध्यानीं आला नी त्यांना समाधान वाटलं, एकदा धाब्यावर झोऱ्या टाकून बाप–लेक झोपण्यासाठी म्हणून लवंडले असतां रामदास एकदम उठून बसला. बोवांनी चमकून 'काय झालं' म्हणून विचारलं रामदास आपले डोळे कमालीच्या कौतुकानं विस्फारीत बोलला, " बाबा, परवा मास्तरांनी आम्हांला नचिकेताची गोष्ट सांगितली. आजसुद्धा आम्हीं त्यांना आग्रह केला म्हणून पुन्हा सांगितली. का हो, यमाच्या राज्यांत नचिकेत कसा गेला ? कुणीकडं आहे यमलोक ? यम तर माणसाला मारून टाकतो ना ? मीं मास्तराना विचारलं तेव्हा ते म्हणाले कीं तुझ्या वडिलांना विचार, त्यांच्या ग्रंथांत सगळं लिहिलेलं आहे म्हणून. का हो, नचिकेत मोटा अजब असला पाहिजे !"

त्याच्या चौकसपणानं आनंदित होऊन आणि गोष्टींतल्या धार्मिक वाता-वरणानं भाविकपणाच्या भरात येऊन बोवा सांगूं लागले, " पोरा त्या गोष्टीचा मतलब असा आहे. जसं देव तसा यम, यम माणसांना मारून नेतो. पण त्याच्या राज्यांत भयंकर यातना होतात. जे त्या यातनांवर विजय मिळवतात तेच फार थोर. असे लोक विरळा. नचिकेत तुझ्यासारखा लहानसा मुलगा. तो यमपुरी पाहून आला. त्यानं आपला बाणा राखला. ज्याच्यांत पाणी आहे तो वाटेल तिथं खडकांतून पाणी काढतो. बार्कीचीं माणसं अन् मेंढरं यांत फरक नाही. ध्रुव काय, कर्ण काय नी नचिकेत काय, हीं लहान पोरं होतीं, पण त्यांच्या अंगांत पराक्रम होता, सत्याचं बळ होतं, निष्ठा होती, म्हणून यम-पुरीसुद्धा उघड्या डोळ्यांनी पाहून परत यायचा पराक्रम त्यानी केला. आपण माणसं यमाचं नाव ऐकलं की मेदरतो. तोच ध्रुव त्यानं अढळपद मिळवलं; तोच कर्ण, आईविना पोरका असून त्यानं अर्जुनाशी लढाई दिली; तोच नचि-केत, त्यानं यमपुरीचा प्रवास करून बाणेदारपणा राखला. तुकाराम महाराज म्हणतात, ' आपुलें मरण पाहिलें म्यां डोळां '. अशा प्रकारचे थोर महात्मे मरणाला भीत नाहीत, जग उलटलं तरी सत्य, खरेपणा सोडीत नाहीत, संक-टांनी गांगरत नाहीत. नर करणी करे तो नरका नारायण हो जाय. समर्थ

रामदासस्वामींनी म्हटलं आहे—'केल्याने होत आहे रे; आधी केलेंच पाहिजे'. कृति करणाराला अशक्य असं काहीच नाही. पाहिजे कर्तबगारी. पाहिजे निष्ठा. पाहिजे सत्य. रामदास होते म्हणून करणी करून गेले. नाहीतर रामदास नांवाचे लोक पुष्कळ असतात, ते फक्त नावानं रामदास, कृतीनं नाही."

बोवांच्या त्या प्रवचनाचा ओघ आपल्याकडं वळला हें रामदासला न कळण्याइतका तो अजाण नव्हता. त्या प्रवचनानं मात्र त्याच्या मनांत नवी आशा, नवा आत्मविश्वास, जागृत झाला. त्या उत्साहानं हुरळून अधिक चांगल्या रितीनं मांडी घालून बसत तो म्हणाला, "मला तर नचिकेताची गोष्ट फार आवडली." मूळ पालुपदाकडं मुलाचा ओघ वळलेला पाहून बोवा उठून बसले नी त्याच्या शेंडीशी लाडाचा चाळा करीत उद्गारले, "पोरा, यमपुरी कांही दूर नाही. आपल्या पृथ्वीवरसुद्धा आहे. आयुष्यांत माणसावर संकटं येतात कुणाची आई मरते, कुणाचा बाप मरतो, कुणाचं घरदार जळून जातं, कुणाला काही होतं. हीं सगळीं संकटं अन् दुक्खं खंबीरपणानं सोसणं म्हणजेच यमपुरी हिंडून येण्यासारखं आहे. संकटांना न् दुक्खांना पाहून गांगरला तो बुडाला. जो त्यांतून वाट काढील तोच खरा नचिकेत. असे नचिकेत थोडे फार सगळीकडं दिसतील. उखर्डू मास्तरांचीच गोष्ट. बिचाऱ्यावर आजपर्यंत केवढी संकटं आलीं, केवढी दुक्खं त्याला सोसावी लागलीं, हालअपेष्टा तर विचारूंच नको; पण पठ्ठ्याची मान वर आहे. नेहमी हासतमुख असतो, कधी रिकामा बसत नाही. उखर्डू मास्तर म्हणजे एक नचिकेत आहे."

इतक्यांत जिन्यांतून कुणीसं वर आलं. भिकन तांबोळ्याला विंचू डसल्यामुळं तो उतरवण्यासाठी बोवांना बोलावण्याकरतां त्याचा मुलगा आलेला होता. बोवा अंगांत बांडीस घालून नी रामदासचीच टोपी डोकीवर ठेवून बाहेर पडले.

रामदास विचार करीत धाब्यावर पडला होता. अंधारामुळं त्याचे विचार शीघ्र गतीनं सुरू झाले. तशाच स्थितींत त्याचा डोळा लागला. झोपतांना त्याच्या मनांत सारखे तेच ते विचार घोळत होते—"रामदास होते म्हणून करणी करून गेले. नाही तर दुसरे पुष्कळ रामदास असतात, फक्त नांवानं, कृतीनं नव्हे......सगळीं संकटं न् दुक्खं खंबीरपणानं सोसणं म्हणजेच यमपुरी हिंडून

येण्यासारखं आहे. संकटांना न् दुक्खांना पाहून जो गांगरला तो बुडाला. जो त्यांतून वाट काढील तोच खरा नचिकेत. असे नचिकेत थोडे फार सगळीकडं दिसतील......उखर्डू मास्तर म्हणजेसुद्धा एक नचिकेत आहे."

*    *    *

असेच कांही दिवस गेले—आणि सर्वांच्या दृष्टीनं तो सोन्याहून पिवळा दिवस उगवला.

सावखेड्या-जवळच्या नांदेड गांवीं सरावण चौधरी राहात. त्यांचा नी उखर्डू मास्तरांचा घरोबा होता. उखर्डू मास्तरांनी चौधरींना रामदासच्या सोयरिकीबद्दल प्रश्न केला. चौधरींना आठ वर्षांची चिंवी नावाची मुलगी होती. ते घरचे गरीब. मुलीला गरीब परंतु शीलवान घराण्यांत द्यायचा त्यांचा हेतु. मन्साराम बोवांच्या रामदासला जावई करून घेण्याची मास्तरांची सूचना त्यांना अक्षरशः पटली आणि तेलबोळा वगैरे विधि पार पडले. दोन वर्षांनी आतां लग्नाचा विचार शिजत होता. शक्य तितक्या लवकर या काळजींतून मुक्त व्हायचं म्हणून बोवांनी तयारी दर्शवतांच बायकामंडळींनी धान्य निवडण्यास सुरवात केली. तीथ ठरलीं. कुंकुमपत्रिका झाली. लोट्र गुरवाचा वाजा नी पुंगाण्या नांदेडांत चौधरींच्या दारीं मंडपांत वाजूं लागल्या. इकडं सावखेड्यांत बोवांच्या दारीं दोन बेळींच्या आधारावर टांगलेल्या नी आंब्याच्या डगशांनी सुशोभित केलेल्या ताटीखालीं गुरवाच्या वाज्याबरोबरच रामदासला हळद लावायचं काम रंगांत आलं होतं. त्यानंतर त्याला एका पाटावर बसवण्यांत आलं. गावांतल्या बायाबापड्या मंडपांत येऊन नवरदेवाला ओवाळणी घालीत नी ओवाळणीचे पैसे न्हाव्याच्या हातांत देऊन चालू लागत.

या आनंदीआनंदांत एकच उणीव होती. नाजी खाटकीण ओवाळणी घालून सर्वांना उद्देशून म्हणाली, "काय नाहाप शे माय नसीबना. देव आंडोर देस ते मायले लई जास, आनं माय जित्ती ऱ्हास ते ती आंडोर कुन्ता लुलफास पन आंडोर भेटत नही ( काय खेळ आहे बाई नशिबाचा. देव पुत्र देतो तर आईला-स्वर्गांत-घेऊन जातो, आणि आई जिवंत राहिली तर ती पुत्रासाठी हाय हाय करते पण पुत्र मिळत नाही ) !!"

नाजीचे ते शब्द ऐकून सगळ्यांना हळहळ वाटली; पण या प्रसंगीं शोक करणं योग्य नाही असं समजून तिनं रामदासच्या डोक्यावर बोटं मोडून नी त्याची दाढी प्रेमानं धरून आशीर्वाद दिला—" मन्हा बाप, म्हतारा व्हशी आनं बापनं नाव काढशी ( माझ्या बापा, तू म्हातारा–मोठा–होशील आणि बापाचं नाव काढशील. )"

मनुष्याच्या आनंदाला दुःखाची किनार सदैव लावलेली असते नी म्हणूनच तो आनंद शोभून दिसतो याची बोवांना या वेळेस प्रचीति आली. मुलाला हळद लावलेली नी त्याचे कपडे हळदीनं माखलेले पाहून म्हाताऱ्याचं हृदय भरभरून आलं. आपल्या डोक्यावरचा फार मोठा भार हलका होत आहे या जाणिवेनं त्या दिवशीं बोवा सारखे रामदासकडं पाहात परोटीवर बसून होते.

वऱ्हाड निघालं. नांदेडच्या मार्गाला लागलं. बैलांच्या चंगाळ्या नू गाड्यांचे खडखडाट, पुरुषांची वल्हारी नू बायकांचीं गाणीं, यांना ऊत आला. नवरदेवाचा जानोसा, नवरा-नवरीचं एकत्र स्नान, थट्टेच्या व्यक्तींवर गुळणा-फेक, गुलालफेक, पंक्तीभोजन, अंतरपाट, नवरदेवाचा रुसवा, पारावर नवर-देव-नवरीचा कवड्यांचा नू पत्त्यांचा डाव, मांडव, समारोप वगैरे सर्व सोहाळे मोठ्या आनंदांत पार पडले. नवरदेव नवरीसह घरीं आला. थोड्या दिवसांनी वायनं येऊन वधूपक्ष नवरीस परत घेऊन गेला.

हा सर्व देखावा रामभाऊंच्या डोळ्यांसमोर उभा राहिला. त्यावेळची ती चिंचुंद्री पोर! तिच्याशी पारावर कवड्यांचा डाव जरी चांगलासा खेळतां आला नाही तरी दोघांनी मिळून आयुष्याचा डाव किती खेळीमेळीनं खेळत आणला होता. चिंधाबाईंचा पराकाष्ठेच्या समजसपणा, हालअपेष्टा सोसण्याची तयारी, कोणत्याहि परिस्थितींत न जाणारा जिवाचा तिखेपणा, उद्योग, वगैरे सद्गुण प्रत्यक्ष अनुभवानं त्यांना त्यांच्या ठायीं दिसून आले. आयुष्याचा उधळलेला डाव सावरण्यांत त्यांना पत्नीची फार मदत झाली होती. पण बिचारीला त्याचं काय फळ मिळालं होतं! अठराविश्वे दारिद्र्य उघड करून दाखवणारीं फाटकीं लुगडीं, औषधावाचून असहाय्य स्थितींत राहिल्यामुळं

जडलेले बाळंतरोगासारखे विकार, हेंच तिचं वैभव. भाऊंनी खाटेवरून उठून आत डोकावून पाहिलं. चिंधाबाई गृहकृत्यांत दंग होत्या. भांडीं विसळणं, टोपल्याटापल्या बाजूला सारणं, झाडलोट, वगैरे कामं आटपलीं होतीं, पण गाठोड्यांतलीं फाटकीं लुगडीं काढून त्यांची झावर शिवण्यासाठी त्या तजवीज करीत होत्या. नामू घरोटाराशीच झावर पसरून झोपून गेलेला दिसला. भाऊ पुन्हा खाटेवर लवंडले. मागील आयुष्याचे प्रसंग नी विचार त्यांचा पिच्छा पुरवत होते.

एखादा नाटककार नायकाचं कर्तृत्व खुलवण्यासाठी त्याच्या भोवतालच्या महत्त्वाच्या व्यक्तींना क्रमक्रमानं स्वर्गास पाठवून देतो त्याचप्रमाणे नाटकी नियतीनं देखील आपल्या बाबतींत या न्यायाचा अवलंब केला असावा की काय असा एक विचार त्यांच्या मनात चमकून गेला. सावखेड्यास शिक्षण पुरं करून रामदासला बापाच्या इच्छेवरून जळगावीं पुढील शिक्षणासाठी प्रयाण करावं लागलं. आपला मुलगा आता इंग्रजी शिकू लागला, लवकरच मॅट्रिक होईल, नंतर—या विचाराचं चक्र बोवांच्या मनांत सदैव चालू राही.

नव्या विद्यालयांत रामदासची प्रगति चांगलीच होत होती. शिक्षकवर्ग त्यावर बेहद्द खूप होता. लहानपणीं बरेच दिवस उनाडण्यांत गेल्यामुळं शाळेंत त्याचं नाव अगोदरच उशिरां घातलं गेलं, म्हणून तो वर्गबंधूपेक्षा वयानं जरा मोठा होता. हें वैगुण्य सोडलं तर अभ्यासांत तो चांगली प्रगति दाखवीत होता. त्याला सरकारी नी शाळेची अशा दोन शिष्यवृत्त्या मिळाल्या. आता मन्साराम बोवांचा मुलगा म्हणून त्याचं नाव सगळीकडं ऐकू येऊं लागलं. गावांत, मोटारीच्या धक्क्यावर, जळगावीं मित्रवर्गांत, बोवांची लोक स्तुति करूं लागले. बोवांना धन्यता वाटूं लागली. बापाचं समाधान वर्धिष्णु होत चाललेलं पाहून रामदासला देखील उभारी आली. एका वर्षांत दोन इयत्ता करण्यापर्यंत त्याची मजल गेली. शाळेचे अध्यापक त्याच्या विषयीं मोटमोठ्या आशा बाळगूं लागले.

अन् तो दिवस !—फूटबॉलच्या सामन्यांत त्याच्या शाळेचा पराजय हा ठरल्या सारखाच होता. तो गोलकीपर. आता दुसऱ्या खेळांत विरुद्ध पक्षाशीं

समानतेचं नातं जोडायची आशा नव्हती. चेंडू आला. वेळ संपत आला होता. पेनल्टीचा चेंडू शाळेला अपयश देणार या विचारानं सर्वांचीं तोंडं म्लान झालेलीं होतीं. शेवटचं मिनिट—शेवटचा चेंडू नी तोहि पेनल्टीचा. रामदासनं अशा शिताफीनं थाड्दिशीं चेंडू उडवून लावला कीं तो कुणालाहि दिसला नाही. चेंडूच्या ठिकऱ्या झालेल्या मात्र सर्वांच्या नजरेस पडल्या. पण त्यांत त्याचा पाय दुखावला होता. तो खाली बसला. वेळ संपला, चेंडू आटोपला नी गोलकीपर खाली बसला. सगळीकडून उत्साहाच्या आरोळ्या नी रामदासचा जयजयकार ऐकूं येत असतां रामदासच्या या अवस्थेमुळं कांही शिक्षक नी खेळाडू त्याच्याकडं धावले. वायगावकर मास्तरांनी त्याच्या पायांची शुश्रूषा पत्करली. "शाबास भारंबे ! पाय मुरगळला पण शाळेची अब्रू बचावलीस !" म्हणून ते त्याला वाखाणूं लागले. त्यांना त्याचा केवढा अभिमान वाटत असलेला दिसला. तशा स्थितींतहि रामदासला स्वतःची धन्यता वाटली.

अभ्यासांत नी खेळांत शाळेचं नाव उजळ करणारा हा विद्यार्थी सामन्यांतील अत्युच्च पारितोषिक मोठ्या अभिमानानं स्वीकारतांना दिसत होता एकेदिवशीं.

बक्षीस समारंभ आटोपल्यावर शाळेंतील अल्पाहार आटोपून खेळाडू नी शिक्षक घरोघर परत गेले. जुन्या गावांतील आपल्या लहानशा खोलीचं कुलूप रामदास उघडणार तोंच उखर्डू मास्तर बोळांतून लगबगीनं येत असलेले त्याच्या दृष्टीस पडले. हातांत पिशवी, दाढी वाढलेली, बगलेंत छत्री, अशा वेषांत मास्तर येत होते. रामदासनं केलेला नमस्कार अर्धवट स्वीकारीत मास्तर घाबऱ्याघाबऱ्या त्याला सांगू लागले, "रामदास, शाळेंतून येत आहेस होय? मी एकदा खोलीवर येऊन गेलों; तू शाळेंत होतास म्हणून तिकडं गेलों तर तू इकडं आलास, आपल्याला घाईनं सावखेड्यास गेलं पाहिजे."

"कां, कांही जरुरीचं काम—" मास्तरांची घाबरी चर्या पाहून भांबावलेल्या रामदासनं पृच्छा केली. त्याचे ओठ विलगच राहिले.

"तुझ्या वडिलांचा भरोसा नाही. गेलं पाहिजे. मोटार आता मिळणार नाही. सकाळीं जाऊं म्हटलं तर त्याचा उपयोग नाही. कसं करावं आता?"

प्रश्नोत्तरांना वेळ नव्हता. रामदासला सगळं समजून चुकलं होतं. त्याच्यावर हा मोठा जबरदस्त आघात होता. सकाळची किंवा मोटारीची वाट न पाहतां त्यानं अर्धा तास थांबून तडक सावखेड्याचा रस्ता सुधारला. मास्तरहि त्याच्या बरोबर लगेच जायला निघाले.

मन्साराम बोवांचा उत्कर्ष सहन न झाल्यामुळं कुणातरी गावगुंडानं त्यांना मोटारधक्क्यावरील हॉटेलांत कांही खाऊं घातलं होतं. ते कांही तासांचे सोबती होते.

भाड्याच्या टांग्यांतून रामदास नी मास्तर सावखेड्यांत शिरले तेव्हा रात्रीचे बारा वाजत आले होते. सर्वत्र सामसूम होती. नदीकडल्या पराड्याच्या बाजूस असलेल्या आपल्या घराच्या दाराशी रामदास मास्तरांना नी धरणगांवच्या बरोबर आणलेल्या डॉक्टरांना घेऊन आला तेव्हा दारांतूनच नाजी खाट-किणीनं निरोप सांगितला की म्हातारा मुलाचा झिंग घेत आहे. मागील खोलीं-तून "रामदास! बेटा रामदास!" असे आर्त उद्गार कानीं पडतांच रामदास हुंदका देत तीरासारखा आंत गेला नी बापाच्या खाटेवर जाऊन पडला. बाप-लेकांची भेट झाली. म्हाताऱ्या मन्साराम बोवांना जो आनंद झाला त्याच्या भरांत त्यांच्यानं बोलवेना. आंग थरथरूं लागलं.

डॉक्टरनं प्रकृति तपासली. कांहीसं औषध दिलं, पण कसलाहि इलाज चालणार नाही असं सांगितलं. तरुण रामदासच्या कानांत शब्द घुमत होते—"संकटांना नी दुक्खांना पाहून गांगरला तो बुडाला. त्यांतून वाट काढणारा तोच खरा नचिकेत. असे नचिकेत थोडे फार सगळीकडं दिसतील."

आपल्या घरांतहि नचिकेत असणं शक्य नाही काय? या प्रश्नानं त्याच्या मनांत धैर्य आलं. बापाच्या नी मास्तरांच्या शिकवणुकीचा धिरसा त्याच्या ऐन वेळीं उपयोगी पडला. त्यानं मन घट्ट केलं. बापाची विचारपूस केली.

" बाबा, धीर सोडू नका. मी रामदास आहे तुमच्याजवळ " म्हणून तो धीर देऊं लागला.

बोवांनी प्रयासानं इकडं तिकडं पाहिलं नी एकेक शब्द सावकाश उच्चारीत म्हटलं, " पोरा, धीर नाही सुटला माझा, तू आला नव्हतास तोंवर मात्र माझा धीर गळून गेला होता. लक्ष्यांत घे. माझी शेवटची एकच इच्छा आहे. मन्साराम भारंभ्याचा मुलगा म्हणून तुझं नाव सगळीकडं गाजेल एवढी माझी खात्री झाली कीं मी सुखानं प्राण सोडीन. पोरा, मी चाललों. पण माझे शब्द नेहमी तुझ्यापाशी असू दे. उभ्या आयुष्यांत मीं लबाडी केली नाहीं, कुणाला फसवलं नाहीं. माझ्या इमानानं जगलों. सत्य सोडूं नको. अन्याय करूं नको आणि सहन पण करूं नको. तुझं लग्न करून दिलं आहे, मला मिळालं नाही तेवढं शिक्षण मी तुला दिलेलं आहे. त्याचा सदुपयोग कर. नेकीनं संसार कर. बायकोचे अन् इतरांचे अपराध पोटांत घालीत जा. सुखानं नांद. तुझ्या बापाचं नांव रतिभर देखील काळं होणार नाही याची काळजी घे. रामदास, पोरा, देव्हाऱ्याखाली सातशे रुपये आणि तुझ्या आईचे चार दागिने पुरून ठेवले आहेत. ते पैसे उभ्या आयुष्यांत शिल्लक टाकले आहेत. त्यांचा सद्व्यय कर. तुझ्या आईनं मनगट झिजवून जवळ केलेली माया—तिच्यावर तुझा हक्क आहे.

" तुला नोकरीवर किंवा व्यवसायांत काम करतांना पाहायचा मानस होता, पण तें आता नशिबीं नाही. पोरा, रामदास,—"

नंतर मास्तरांना दोन शब्द सांगून नी मुलाची जबाबदारी त्यांच्यावर टाकून बोवांनी इहलोकांतील वास्तव्य संपवलं.

दारांतच नाजी खाटकिणीचं रडणं ऐकून लोकांना मन्साराम बोवांच्या निधनाची वार्ता कळली. एका सच्छील ग्रामबंधूसाठी त्याची मानलेली बहीण शोक करीत होती.

बोवांचे अखेरचे शब्द रामदास कधीहि विसरला नाही. त्यावेळचे ते सातशे रुपये नी आईचे दागिने यांचा त्यानं सद्व्ययच केला, खाजगी खर्चासाठी नव्हे.

रामदासच्या आयुष्याला निराळीच गति मिळाली.

*       *       *

आईनं कुढापे करून जमवलेले नी बापानं भर घालून जतन करून ठेवलेले पैसे जसेच्या तसे राखून रामदासनं स्वतःच्या हिमतीवर विद्याभ्यास चालवला. रात्रीं आणि सुटीच्या दिवशीं काम करून मिळवलेल्या पैशांना शिष्यवृत्तीचा जोडोपा देऊन तो शाळेंत जाऊं लागला. शाळा फारशी जुनी नसल्यामुळं शिक्षण यथातथाच मिळे, पण स्वतःच्या हिमतीवर वाचन वाढवून त्यानं प्रगति करून घेतली. "मन्साराम भारंब्यांचा मुलगा" म्हणून त्याला नाव काढायचं होतं.

मॅट्रिकच्या वर्गात असतांना त्याला भावी आयुष्याची सुखस्वप्नं दिसूं लागलीं. त्या काळाच्या मानानं त्यानं शिक्षणांत बरीच आघाडी मारली होती. सावखेड्याच्या आसपासच्या दहा खेड्यांत त्याच्या इतका कुणीच शिकलेला नव्हता.

पण हाच त्याचा अपराध. त्याला चाहते लाभत होते, त्याच बरोबर दुष्मन देखील निर्माण होऊं लागले होते. दोन बिध्यांचं त्याचं शेत खेडणाऱ्या कुळानं त्याच्या हातावर तुरी दिल्या. उखर्डू मास्तर नी सरावण चौधरी या दोघांचीं पत्रं त्याच्या हातीं पडलीं त्या दिवशीं तातडीच्या कामाचं निमित्त करून तो शाळेंतून घरीं आला. आपल्या उत्कर्षाच्या मार्गात खाचाखळगे आहेत याची पहिल्यानंच त्याला प्रखर जाणीव झाली. त्याचा उत्कर्ष सहन न झाल्यामुळं कुणा गावगुंडानं त्याचं सावखेड्यांतलं घरदार पेटवून बेचिराख करून टाकलं होतं. थरथरत्या हतांनी तीं पत्रं त्यानं समोर धरून दोन चार वेळां वाचलीं.

शेताच्या उत्पन्नाची वासलात लागली. शेजारच्या शेतमालकानं आपलं शेत वाढवीत रामदासचा अर्धा बिघा घशांत घातला होता. मेराची खूण कुठल्या कुठंच गडप झाली होती. वाऱ्यावर सोडलेल्या धोतराप्रमाणे त्याच्या आयुष्याची फडफड चालू झाली. लवणांतल्या खोदऱ्यांतून जाणारा दोन मैलांचा रस्ता चालून तो सासऱ्याच्या घरीं गेला.

तरुणपणाच्या उंबरठ्यांत उभी असलेल्या बायकोशी त्याचं त्या दिवशीं पहिलं संभाषण झालं. चौधरी मळयांत गेले होते. सासूनं आपल्या हौशी समजुतीला अनुसरून मुलीला नी जावयाला हवेलींत एकान्त घडवला. चौदापंधरा वर्षांच्या त्या अल्लड पोरीच्या तोंडून कोणते गंभीर विचार ऐकायला मिळणार ? ढणाढणा जळणाऱ्या टाणईवरल्या दिव्याच्या उजेडांत रामदास नी चिंधी अशीं दोघं कानोडेपणानं चाचळत बसलीं होतीं. पदर दातांत धरून खाली पाहात चिंधीनं पहिला प्रश्न केला, " नोकरी कहा घेनार आह्यती तुम्हि ? ( नोकरी कधी घेणार आहांत ? ) " त्या एका प्रश्नांत त्या अशिक्षित मुलीचं आयुष्याचं सारं कुतूहल भरलेलं होतं. त्याच्या उत्तरांत तिचा सर्वोच्च आनंद सामावला होता.

निरक्षर, अडाणी नी अल्लड अशा पत्नीच्या त्या साध्या प्रश्नाची रामभाऊंना या वयांतहि आठवण झाली. त्याच प्रश्नानं त्यांच्या मनांत भावी जीवना संबंधाच्या गभीर विचाराचा उगम झाला होता. त्याच रात्रीपासून रामदास हा नुसता खेळाडू विद्यार्थी न राहतां संसाराचा साक्षेपानं विचार करणारा तरुण बनला होता. त्याच्यांत फार मोठा बदल घडून आला. वाऱ्यावरचं आयुष्य स्थिर करण्याचे विचार त्याच्या मनांत येऊं लागले. त्याला मॅट्रिकच्या परीक्षेला बसायचं होतं. कॉलेजात जायचं सामर्थ्य त्याच्या टायीं नव्हतं. परीक्षा जवळ आलेली होती. त्याची ७५ रुपयांची गरज कुणीहि भागवली असती. सासऱ्याकडं मागणी करायला त्याला लाज वाटे. उखर्डू मास्तरांनी स्वतः नव्हे तरी परक्याकडून जमवून भरपाई केली असती. पण रामदासला आपली काळजी इतरांनी घ्यावी असं वाटेना. तो घरीं आला. घर कुठं होतं ? उखर्डू मास्तरांच्याच घरीं त्याचा मुक्काम. मास्तरांची बदली तापीच्या दुसऱ्या थडीवरल्या निमगव्हाण येथील शाळेंत झालेली. ये जा करून ते सावखेड्यांतच राहात.

संध्याकाळीं सहज करमणुकीसाठी तो नदीवर एका डोणग्याच्या डोलकाठीखाली जाऊन बसला. त्याच दिवशीं चोपड्याचा बाजार असल्यामुळं त्या वेळेसच नाजी खाटकीण नदीतून अलीकडं येत असलेली त्याला दिसली. तिचंहि त्याच्याकडं लक्ष्य गेलं. मानलेल्या भावाचा मुलगा पाहून तिलाहि आनंद झाला. त्याची तिनं विचारपूस केली. चोपड्याला कांही बकऱ्या नी मटन विकून आण-

लेले पैसे तिनं कमरेला कशांत बांधले होते नी मीठ मिरचीचं गाठोडं बरोबर आणलं होतं. नाजीबाईजवळ आपली अडचण सांगायला हरकत नाही असं रामदासला वाटलं नी ती संधि त्यानं साधली. नाहीतरी तिच्या मनांत कधींच परकेपणा नव्हता. मन्साराम बोवा जरी भाविक असले तरी नाजीनं आणून दिलेलं चांगलं मटन ते आवडीनं घेऊन राधत. नाजी त्यांच्यापासून सहसा पैसे घेत नसे. रामदासला तर अनेकदा तिनं आंतल्या घरांत नेऊन आपल्या हातचं मटन खाऊं घातलं होतं. त्यालाहि तसले प्रसंग मनापासून आवडत, पण जात-पातीच्या भिडेस्तव तो बाहेर त्यांची वाच्यता करीत नसे.

" फुई, म्याट्रिकनी परक्सा शे मन्हि. पानसे रुप्यानी नळ शे. त्यान्हकुन्ता जीव हेटे वन्हे हुई ऱ्हायना. ( आत्या, मॅट्रिकची परीक्षा आहे माझी. पाऊणशे रुपयाची नड आहे. म्हणून जीव खालीवर होतो, पाहा )" त्यानं प्रस्ताव मांडला.

" बस्स ? आरे मन्हा भासा ! मन्साराम बोवाना आंडोरले काय कमती शे ? देख भो, छूं बोल देऊंगी तो तेरे वास्ते हाज्यार रुप्या पयदा करूंगी—येक घंटामें. पन भो, याद रख. पाचसो रुप्या पगारकी नोकरी लेना, बेटा. मेरा आसीर्वाद हय तेरकू ( बस्स ? अरे माझ्या भाच्या ! मन्साराम बोवाच्या मुलाला काय कमी ? पाहा भाऊ, छूं बोलेन तर तुझ्यासाठी हजार रुपये पेदा करीन एका तासांत. पण भाऊ, लक्ष्यांत ठेव, पाचशे रुपये पगाराची नोकरी मिळवली पाहिजे, बेटा. माझा आशीर्वाद आहे तुला. )"—म्हातारी खड्या आवाजांत अभिमानानं बोलत होती. " बोल, अब्बी के अब्बी दे डालूं पैसे ? "—प्रश्न केला खरा, पण एक गोड विचार मनांत येतांच ती पुढं म्हणाली, " नहि. अब्बी नहि देऊंगी. आज तू मेरे घर आव. तुल्हे निवतं दी ठेवस मी. मन्हकळे जेवाले ये. मंग पैसा देसू. रामदास, तुन्हि गरज पुरी करसू मी. ( नाही. आताच नाही देणार. आज तू माझ्या घरी ये. तुला निमंत्रण देऊन ठेवतें. माझ्याकडंच जेवायला ये. मग देईन पैसे. रामदास, तुझी गरज भागवीन बरं मी ) "

त्या रात्रीं नाजी आत्याकडं समदम पोट फुगेपर्यंत मटण जेवून रामदास मास्तरांच्या घरीं आला तेव्हा त्याच्या खिशांत भावी आयुष्याची सामग्री कर-णारी रकम खुळखुळत होती.

दिवसामागून दिवस भराभर चालले होते. वाढत्या यशाबरोबरच वाढत्या जबाबदाऱ्यांची जाणीवहि तीव्रतर होत होती. एका सद्‌गुणी होतकरू तरुणाचा उत्कर्ष न पाहवल्यामुळं त्याच्या घरादाराची राखरांगोळी करायला निघालेले वरकरणीं हितचिंतक आणि कनिष्ठ वर्गातील गरीब परंतु दिलदार आणि उभारीचे नाजीखाटकिणीसारखे पाठीराखे यासंबंधीचे विचार मनात आले म्हणजे रामदासला जगाच्या बहुरंगीपणाची मोठी गंमत वाटे. मित्रांशी किंवा चार वडील मंडळींशी चावळतांना त्याच्या बोलण्यांत त्याच्या या अनुभवांचं फार मार्मिक तत्त्वज्ञान येई, तें ऐकून त्याला मित्रमंडळींत 'अकालीं वृद्ध' तर सांसारिकांत 'समंजस नी विचारी मुलगा' हीं नावं प्राप्त झाली होतीं. वडिलांच्या, उखडू मास्तरांच्या, नाजीआत्याच्या, पत्नीच्या नी अवलोकनांतील गृहस्थांच्या प्रभावी व्यक्तित्वाचे संस्कार त्याच्या मनावर अधिकाधिक दृढ होत जाऊन त्याला पराकाष्ठेचा आत्मविश्वास येत चालला. आपल्याबद्दल इतरांच्या अपेक्षा आपण पूर्ण करूंच करूं नी 'मन्साराम बोवांचा मुलगा' म्हणून अभिमानानं सर्वांच्या आदरास पात्र होऊं अशी खात्री त्याला वाटूं लागली.

चौधरींनी मुलीला घेऊन जाण्यास जावयाला अनेक निरोप पाठवले. वयांत आलेल्या मुलीची जिम्मेदारी पत्करण्यास आपण तयार नाही असं त्यांचं स्पष्ट म्हणणं. जावयानं नोकरी घ्यावी नी मुलीचा संसार आपण कौतुकानं पाहावा ही सासूची आमना. पगारदार नवऱ्याची बायको म्हणून संसार करावा ही बायकोची आकांक्षा. पण—

रामदासला काय पाहिजे होतं? त्याला सच्छील पित्याचा कर्तबगार पुत्र म्हणून नांव काढायचं होतं. कर्तबगारीच्या त्याच्या कल्पना आताशा बदलत चालल्या होत्या. चांगल्या पगाराची नोकरी, मुलंबाळं, इस्टेट नी अखेर किड्या-मुंगीप्रमाणे मरण, एवढीच उत्कर्षाची कल्पना त्याला मान्य नव्हती. तो आता चाकोरीं बाहेर पाहूं लागला. पण समाजाची नी त्याच्या कर्तृत्वाच्या कल्पनांतील अंतर उत्तरोत्तर वाढत चालल्याचं त्याला स्पष्ट दिसत होतं. जीवनाचा गंभीरपणें विचार करायला शिकवणारा निरक्षर पत्नीचा पहिल्या एकान्तांतला पहिलाच प्रश्न त्याला आता वेगळ्याच रितीनं भेवडावं लागला. चाकोरीबाहेर

पड म्हणून त्याचं मन त्याला सांगू लागलं, परंतु लगेच पत्नीची नी आर्थिक कमाईची जबाबदारी त्याचा पिच्छा पुरवीत असल्याचं त्याला दिसून आलं. आजपर्यंत त्यानं आगरकर, टिळक, जॉन्सन् वगैरे व्यक्तींबद्दल शालेय शिक्षकांच्या तोंडून बरंच ऐकलं होतं. टिळक दिवंगत झाल्यावर देशभर पसरलेलं शोकाचं त्याप्रमाणेच राजकीय जागृतीचं वारं त्यालाहि अमाप स्पर्श करून गेलं होतं. पण त्या अजाण अवस्थेंत त्या गोष्टी त्याच्या पोरमनांत क्रांति करूं शकल्या नाहीत. नंतर महात्मा गांधींनी सुरू केलेलं आंदोलन देखील त्याला स्पर्शू शकलं नव्हतं. पण आतां, कां कोण जाणे त्याला समाजाच्या दृष्टीनं उत्कर्षास पोचलेल्या पगारदार श्रेष्ठींचे आदर्श गिरवावेसे वाटले नाहींत. शिक्षणानं नी संस्कारांनी त्याचं मन जिवंत झालं होतं. तथापि परिस्थिति बदलू पाहणाऱ्या राष्ट्रीय जीवनाशी त्याच्या जिवंत मनाचा संबंध आलेला नव्हता.

सामाजिक संकेताच्या नी परिस्थितीच्या पिंजऱ्यांत फडफड करण्यापलीकडं त्या जागृत मनाला दुसरं काय करतां येणं शक्य होतं ? संकेताचा पिंजरा विध्वंसून बाहेर येण्यासाठी समकालीन राष्ट्रीय स्वातंत्र्याकांक्षेशी त्या पोपटाचा संबंध येणं आवश्यक होतं. त्यावाचून पिंजऱ्यांतच फडफडणं किंवा मुकाट्यानं त्यातलं जीवन पत्करणं हेच त्याला भाग पडलं.

त्याच सुमारास महेबूबखां नावाचे मुन्सफ अमळनेरला बदलून आले. मन्सारामबोवांनी मुन्सफसाहेबांच्या पत्नीस पुत्रप्राप्तीसाठी अमोघ वनस्पतीची मात्रा देऊन त्यांचं आयुष्य सफळ केलेलं होतं. तो उपकार ते विसरले नव्हते. बोवांचा मुलगा मॅट्रिक झाला आहे असं कळतांच खानसाहेबांनी त्याची भेट घेऊन त्याला मुलकी खात्यांत नोकरी मिळवून दिली.

पश्चिम आशियाच्या मैदानावर उधळणी धावणाऱ्या घोड्याप्रमाणे कचेरीतल्या खर्डेवहीवर रामदासच्या हातांतला टाक वेगानं धावं लागला तेव्हा आपण आता रामदासचे भाऊसाहेब झाल्याचं त्याला आढळून आलं.

मुलकी कचेरींतल्या त्या झापडा लावलेल्या तट्टांमध्ये कांही दादासाहेब होते, कांही नानासाहेब, कांही रावसाहेब, तर कांही भाऊसाहेब, त्यांतच आपले

नवे भाऊसाहेब. भाऊसाहेबांचं शिक्षण त्या सर्वांहून अधिक झालेलं होतं. ही गोष्ट समजतांच त्यांच्याकडं बघण्याच्या इतरांच्या तऱ्हा बदलल्या. शिक्षणांतील वरचढपणामुळं हे राजेश्री आपल्यावर एखाद वेळेस मात करून जाणार असं कांहींना वाटूं लागलं.

कर्तृत्व नी उत्कर्ष या बाबत भाऊसाहेबांच्या कल्पना भोवतालच्या सांसारिकांपेक्षां वेगळ्या होत्या यांत शंका नाही. त्यामुळंच त्यांच्या मनाला एक प्रकारची टोचणी लागून राही. चाकोरींतलं खर्डेघाशीचं जीवन अनिच्छेनंच त्यांना पत्करावं लागलं होतं. त्यामुळं त्यांचं असमाधान दुणावलं होतं.

भाऊसाहेब चांगली होतकरू नोकरी स्वीकारून संसार करूं लागले, एवढंच नव्हे तर त्यांच्या घरांत मूल रांगू लागलं म्हणून त्यांचे श्वशुर सरावण चौधरी यांना कृतकृत्यता वाटली, सासूला अस्मान ठेंगणं झालं, चिंधाबाई नव्या नवलाईच्या नी बहुमानाच्या संसारांत दंग झाल्या, उखर्डू मास्तरांना दिवंगत मित्राच्या कष्टाचं साफल्य झाल्यानं धन्यता वाटूं लागली, आपले आशीर्वाद फळाला आल्याचं नाजी खाटकिणीला समाधान वाटूं लागलं,--सर्वांना आनंद वाटला; पण भाऊसाहेब ? त्यांना चुकल्यासारखं अहर्निश वाटत होतं. आपलं आयुष्य निरर्थक व्यतीत होत आहे असं वाटून त्यांचं मन भावी काळाबद्दल साशंक झालं होतं.

सच्छील, परोपकारी नी पापभीरू पित्याच्या नांवाला त्यांच्या या उत्कर्षानं उजाळाच मिळाला होता, पण तो लौकिक दृष्टीनं. यापेक्षा अधिक कांही करायची आमना त्यांना होती. शिक्षण, उमेद, आत्मविश्वास, ह्या सर्व गोष्टी असूनहि त्यांच्या मनाच्या असह्य आवकाळ्या चालल्या होत्या.

यांतच दुसऱ्या एका गोष्टीची भर पडली. मुलकी कारभाराला सरावलेल्या त्यांच्या कारकून भाईंनीं आपल्या चौसष्ट कळा दाखवायला सुरवात केली. अडला नारायण गाढवाचे पाय धरी म्हणतात. आडल्या कामासाठी खेड्यांतले गरीब शेतकरी अन् शेतमजूर नाइलाजानं या मंडळींचे हात भरल्याशिवाय राहात नसत. दहा रुपयांचा तलाटी गावांत केवढी माणकेश्वरी गाजवतो हे

टाऊक असल्यामुळं या नोकरशहांचे खिसे गरम केल्याशिवाय किंवा कांही धान्यधुन्य त्यांच्या घरीं आणून टाकल्याशिवाय त्यांना काम होईल अशी खात्री नसे. या लाचेच्या कारभारांत भाऊसाहेबांना सामील करून घेणं इतर कारकुनांना आवश्यक वाटलं, कारण एरव्ही त्यांना तो परिपाठ चालू ठेवणं शक्य नव्हत. भाऊसाहेबांना आश्चर्याचा धक्का बसला. कारकुनी पेशा ह्मणजे कंटाळवाणी खर्डेघाशी एवढीच त्यांची समजूत होती. गरीब शेतकरी नी मजूर त्यांना लुबाडण्यासाठी ही नोकरशाही जीं लफडीं करते तीं त्यांना अपरिचित होती. सुशिक्षितांच्या या स्वार्थी नी दांभिक वृत्तीची त्यांना चीड आली. अधिक कांहीं करतां न आलं तरी बापाचं सच्छील मी कलंकित करणार नाही ही त्यांची किमान आकांक्षा असतां तिलाच नख लागण्याचा प्रसंग येऊन ठेपला.

एकदा त्यानी सहजगत्या मागील पत्रव्यवहाराची आवक-जावक चाळून पाहायला सुरुवात केली. मामलेदाराकडं एका शेतकऱ्यानं तातडीनं अर्ज केला होता. साहेबांच्या सूचनेवरून त्या शेतकऱ्याला स्वतांच्या शेतांत चुन्याची भट्टी सुरू करायची परवानगी द्यायची होती. भाऊसाहेबांनी प्रकरण बाहेर काढून हुकुम लिहायला सुरुवात केली, तोंच त्याचे सहकारी त्यांच्या कानाशी लागले. एकूण प्रकरण असं होतं कीं, प्रस्तुत शेतकऱ्यानं परवान्यासाठी अर्जावर अर्ज केले होते, आठ महिने त्याची दाद लागली नाही, कारण साहेबांचा हुकूम कारकुनांनी दाबून ठेवला होता. लाचेची रकम वसूल झाल्याशिवाय शेतकऱ्याच्या हातीं हुकूम पडूं नये असा कावा रचलेला असल्यामुळं इतक्या दिवसांपर्यंत ही दाबादाबी चालली होती. सहकाऱ्यांच्या तोंडून ही माहिती ऐकून भाऊसाहेबांना वाईट वाटलं. घरीं बोलावून कांहीं रकम घेऊन मगच हुकूम त्याच्या हातांत द्यावा ही इतरांची सूचना त्यांनी मान्य केली नाही. हुकूम रवाना करून टाकला. अशीं कितीतरी प्रकरणं नेहमी चालू असल्याचं त्यांना आढळून आलं.

आपलं बरंवाईट करण्याची सत्ता या नोकरशहांच्या हातीं असल्यामुळंच जनता त्यांना वचकून असते नी मान देते असं त्यांना विचाराअंतीं कळून आलं. मुलकी खात्याच्या नोकरीसाठी माशांप्रमाणें ऊमेदवार कां घोंगावत येतात याचाहि उलगडा त्यांना झाला. या बऱ्यावाईटाच्या सत्तेमुळंच त्यांना भाऊसाहेब,

दादासाहेब, नानासाहेब, म्हणून मान मिळतो, म्हणूनच तीस रुपयांचा कारकून तीस हजारांची इस्टेट मिळवूं शकतो, यांत शंका नाही. तीच गोष्ट शिक्षकांची घ्या. हे शिक्षक बी. ए. एम. ए. वा बी. टी. झालेले असले तरी कुणाचं वाईट करायची सत्ता त्यांच्या हातीं नाही. लाच घेण्यासारखीं कामं त्यांच्याकडं नसतात, म्हणून ज्ञानामृत पाजून राष्ट्राची पिढी तयार करण्याचं कार्य जरी तं करीत असले तरी त्यांना समाजांत मान नाही.

एकूण, वेश्येभोवती सतरा टरांगांनी नाचावं त्याप्रमाणे सत्तेभोवती शहाण-पण, मानमरातब, पैसा, यांचा नाच चालत असतो तर! शेतकऱ्यांचे नी मजूरांचे अर्जकाटे वरिष्ठ अधिकाऱ्यांपर्यंत जाऊंच शकत नाहीत, लाच दिल्याबरोबर मात्र बंगाली जादूप्रमाणे सगळीं कामं पार पडतात. पुष्कळदा मामले-दारांच्या सल्ल्यावाचून कारकुनांनीच परभारं स्वताच्या अधिकारांत लाच घेऊन अर्जांचे निकाल लावल्याचीं उदाहरणं भाऊसाहेबांना दिसून आलीं. अशा नोकरशाहीवरील त्याचा विश्वास पार उडून गेला. थोड्याच दिवसांत इतर सह-काऱ्यांशी त्यांचं जमेनासं झालं. पण भाऊसाहेबांना अधिक काय करतां येणार? त्या पापाचे वाटेकरी स्वतः ते झाले नाहीत म्हणून त्यांची स्थिती गरिबीची राहिली. डोळ्यां देखत सर्व पापं निमूटपणें सहन करणं भाग होतं.

एकदा एका इसमानं त्यांच्या गैरहजेरींत त्यांच्या घरीं काही सामान आणून दिलं. पन्नास रुपयांचं तरी असावं. चिभावाईंना आनंद झाला. त्यांनी तें स्वीकारलं. गरीब रयतेनं आणून दिलेलं सारं काही स्वीकारणं हें आपलं कर्तव्यच, अशी मनोवृत्ति नोकरशाहींतील गृहिणींचीहि होऊन बसली तर त्यात आश्चर्य नाही. भाऊसाहेबांना ही गोष्ट समजली. त्याना असंहि कळलं की सदर इसमानं बायकोचे दागिने गहाण ठेवून त्या रकमेचं तें सामान खरीदलं होतं. त्यानी त्याला बोलावून त्याचं सामान परत केलं. लाच घेणं हें पाप आहे, एवढंच नव्हे तर कचेरींतले लोक रयतेच्या सोयीसाठी नेमलेले आहेत, रयतेचे ते नोकर आहेत, लाच घेणाऱ्याहून तो देणारा अधिक दोषी आहे, लाच घेणा-ऱ्याविरुद्ध तक्रार करावी, वगैरे गोष्टी त्याला समजावून देऊन त्यांनी त्याच्या अर्जाची लवकर विल्हेवाट लावली आणि सन्मानानं, प्रेमानं त्याला परत पाठवलं.

सहकाऱ्यांना ते नकोसे झाले, गरीब रयतेला प्रिय वाटू लागले. त्यांचा आणखी एक अनुभव मजेदार होता, पीतांबर शेट नांवाच्या एका सावकारानं काम करून घेण्यासाठी दोनशे रुपयांच्या नोटा त्यांच्या घरीं येऊन त्यांच्या हातांत कोंबल्या. भाऊसाहेबांनी त्या परत केल्या. शेटजींना राग आला, 'आम्ही खुषीनं देतां तें तुम्ही घेत नाही ? आमचा अपमान आहे हा, भाऊसाहेब !" मिशा पिंजारीत ते बोलले. जणू आरोपीलाच जाब विचारीत आहेत ! भाऊ-साहेबांनी माडी नीट घालीत नी अडकीत्ता बाजूला सारीत म्हटल, "शेटजी, कुणाचा मान नी कुणाचा अपमान ? मला माहीत आहे मी कशासाठी नेमला गेलों आहे तें. लोकांचों योग्य तीं कामं करणं हें माझं काम. त्यासाठी मला पगार मिळतो. लाच घेणारे महाभाग असतील, त्यांना ती द्या. मला नको. तुमचं काम योग्य असेल तर मी करीन. अयोग्य तें करणार नाही. त्या कुळाचं शेत तुम्ही गटवूं पाहात अहात. त्यात तुमचा स्वार्थ आहे. म्हणून तुम्ही लाच देतां. वर मोठेपणा मिरवतां. लबाडींत सामील करुन घेण्यासाठी तुम्हीं हे पैसे मला देतां नी वर म्हणतां की परत केल्यानं तुमचा अपमान होतो म्हणून ! छान न्याय आहे. दोनशेच काय हजार देखील द्याल तुम्ही, कारण तुम्हांला स्वार्थ साधायचा आहे. पण मला काय त्याचं ? लाच देऊन माझ्यावर उपकार केल्याचा आव आणूं नका. दोनशे रुपये द्याल नी दोन हजार रुपये सावकारींत लुबाडाल. रयतेला तुम्हीं नाडावंत्‌ कारकुनांनी तुमचीं पापं कायदेशीर ठरवावींत. त्यांना दिलेला खुराक तुम्हीं पुन्हा रयतेपासून दसपटीनं वसूल करावा ! दुनियेंत बांडगुळ फार वाढलीं आहेत. "

या सडेतोड व्याख्यानानं पीतांबर शेट नरमले नाहीत. त्यांच्या हातांत पैसा खेळत होता. कामं पार पाडून घ्यायाची धमक म्हणूनच त्यांच्या हातीं होती. तणतणत पायऱ्या उतरतांना त्यांच्या तोंडून अस्पष्टपणें उच्चारलेले शब्द भाऊसाहेबांच्या कानांवर पडले--" असे छप्पन्न कारकून विकत घेतले आहेत नी घेईन सुद्धां ". त्यावर भाऊसाहेब स्वतांशीच पुटपुटले—" घेतले असतील विकत नी घ्याल सुद्धा; पण माझ्यासारखे नाहीं विकले जायचे. प्राण गेला तरी."

अंतकाळीं बापानं "लबाडी करूं नको" म्हणून उच्चारलेले शब्द भाऊसाहेबांनी खरे करून दाखविले. पण त्याचा परिणाम म्हणून ते शिक्षकाप्रमाणे दरिद्रीच राहिले कचेरींत नी सावकार महाजन वर्गांत त्यांच्याकडं सगळे मारकया म्हशीप्रमाणे पाहूं लागले. कांही गरीब शेतकऱ्यांत मात्र ते प्रिय झाले होते.

मामलेदाराच्या परिक्षेंत भाऊसाहेब उत्तीर्ण झाले आणि यावल मुक्कामीं त्यांची हंगामी मामलेदार म्हणून तात्पुरती नेमणूक झाली. चिंधाबाईंना पतीच्या पुष्कळशा गोष्टी जगावेगळया म्हणून आवडत नसल्या तरी तिच्या दृष्टीनं दोषस्वरूप ठरलेले त्यांचे ते गुण या नव्या आनंदांत ती विसरून गेली. घरांत तीन मुलांची पायधूळ लागत असल्यामुळं त्यांना सगळीकडं रंगनाच दिसू लागली. वडील मुलाचं नांव देविदास. त्याहून लहान दोन्ही मुलीच.

यावलचे मामलेदार या नात्यानं भाऊसाहेबांना त्या भागांत हिंडायची संधि मिळे, तिचा ते पुरेपूर फायदा घेत. मुलकी कारभारांतील भानगडी नी रयतेची जाचणूक ठाऊक झाल्यामुळं ते नेहमी जागरूक राहून कचेरींतील कामांत जातीनं लक्ष्य घालीत, अर्जफाट्यांची आवकजावक स्वतां तपशील लहानू जावळे नावाच्या एका कारकुनाच लाच प्रकरण उघडकीस आल्यावरून त्यांनी त्याला चांगलाच वटका केला. बिचारा लटपटून गेला. नोकरी जाते की काय, या धाकधुकीनं लाचार होऊन भाऊसाहेबांना भेटायला त्यांच्या घरीं गेला. " साहेब, पोराबाळांचा धनी आहे मी. एवढा गुन्हा पोटात घ्या.तुमच्या धाकट्या भावाप्रमाणे पाठीराखे व्हा. पोटावर पाय देऊं नका. पुन्हा असं कारणार नाहीं !" या त्याच्या रावण्या ऐकून भाऊसाबांचं चित्त पघळलं. पण दयाळू तितकेच कर्तव्यनिष्ठुर होते तें त्यांनी त्याला विचारलं, " तुम्हाला सचोटीनं वागून पगारावर उदरनिर्वाह नाही का करतां येणार ! लाच घेतल्याचं पाप कशाला करायच तें !" लहानू जावळे हात जोडून उत्तरला, "साहेब, खटलं मोठं घरची गरिबी. पोटासाठीच हा गुन्हा केला. " त्यावर ते बोलूं लागले, "खटलं मोठं अन् पगार अपुरा पडतो तर सरकारशी भांडा. सगळे कारकून अमलदार रयतेला पिळं शकतात अन् सरकारला मात्र पिळूं शकत नाहीत होय ? गरीब बिचारी रयत. तिच्यासाठी तुम्ही आहांत. असं असून तिला तुम्ही नाडता.

पण रयतेच्या दुर्दशेला देखील सीमा आहे. एखाद दिवशीं ती असह्य होवून सारी रयत उठेल, त्या उठावणींत अखल्या नोकरशाहीचा बळी पडेल. जात-भाईची पिळणूक करून पिढीजाद पिळणूक करणाऱ्या सावकार-महाजनांचे तुम्ही साथीदार होतां तें कशासाठी ? जनता मान देते तुम्हांला तो तुम्हीं तिची मान पिरगळूं शकतां म्हणून ! जा. पुन्हा असं करूं नका. तुमच्याविरुद्ध मी काहीहि करणार नाही."

त्याचं तें आश्वासन ऐकून जावळेला किती कृतज्ञता वाटली तें त्याच्या चर्येवर स्पष्ट दिसत होतं. ती चर्या रामभाऊंना धाबलीच्या अंधारांत आजहि अस्पष्ट रीतीनं दिसत होती. लहानू जावळे यानं त्यानंतर सचोटीनं काम केलं अशी त्यांची तरी खात्री होती नी एका इसमाला शुद्धीवर आणण्यांत आपण बापाचंच पवित्र व्रत पुढं चालवलं त्याचं त्यांना समाधान वाटलं. पुढील करुण प्रसंगहि त्यांना आठवला. लहानू जावळे आयुष्याच्या ऐन उमेदींत विषमज्वरानं आजारी पडून इहलोक सोडून गेला. त्यावेळेस त्याच्या अंतिम इच्छेस्तव आपण त्याच्या घरीं गेलों होतों; कोंदट खोलींत एका खाटेवर पडलेला लहानू नी त्याच्याभोंवती स्फुंदणारीं बायकापोरं पाहून आपणांला भडभडून आलं. जगाचा निरोप घेण्यापूर्वी लहानूनं आपणांला दोन शब्द सांगितले—"साहेब, तुम्हीं मला आयुष्यांतल्या पहिल्या पापापासून परावृत्त केलंत मीं पुन्हा लबाडी केली नाही असा मला विश्वास आहे. तुमच्या-सारखे रयतेचे कैवारी माझ्या घरीं पायधूळ झाडीत आलांत—केवढे उपकार, साहेब, लहानू जावळेला क्षमा करा. क्षमा मागण्यासाठीच बोलावलं तुम्हाला. तसदीची माफी मागतों"—आणि त्यानं डोळे कायमचे मिटले. एका पापभीरु पण परिस्थितीमुळं पापाला प्रवृत्त झालेल्या संसारी जिवाचे ते बोल आपणाला अजूनहि आठवत आहेत याचं एकप्रकारें आश्चर्यच वाटलं भाऊंना. पश्चातापानं पापी आत्म्याची शुद्धि होते हें सनातन सुभाषित त्यांना अनुभवानं पटलेलं होत.

यानंतरचा कालखंड भाऊंच्या जीवनांत फार महत्त्वाचा होता. उत्कर्षाच्या नी कर्तृत्वाच्या त्यांच्या नी समाजाच्या कल्पनांत महदंतर असल्यामुळं त्यांना पराकाष्ठेचं दुःख मनातल्यामनांत होई हें खरं; पण अप्रत्यक्षपणं त्याचं सचोट

मन हळुहळू इष्ट मार्गानंच त्यांना नेत होतं. यावलच्या नी फैझपूरच्या बाजारांत सातपुड्यांतून भर उन्हांत अनवाणीं चालत येणारे भिल्ल आणि पावरे पाहून त्यांना रयतेच्या मागासलेपणाचा पुरेपूर प्रत्यय येई. त्या वन्य जमातीच्या लोकांचे धिप्पाड परंतु उघडेनागडे देह पाहून नी त्यांच्याबद्दल माहिती ऐकून त्यांच्याशी समरस होण्याची आकांक्षा भाऊंच्या मनांत डोकावूं लागली, ते त्यांच्या बोलण्याचालण्याचं, चालीरितींचं, बारकाईनं निरिक्षण करूं लागले. नाल्याच्या काठावर गाड्या सोडून तीन दगडांवर स्वैंपाक करीत बसलेले पावरे किंवा झाडाखाली उपाशीं लवंडलेले भिल्ल पाहिले की भौतिक उत्कर्षास नी सर्वांगीण विकासास पारखे झालेल्या या लोकांत जाऊन त्यांना काही शिकवावं असं त्यांना वाटे. पण लगेच त्यांच्या विचाराचा ओघ वदले आणि त्यांचं मन म्हणे, " काय उपयोग यांना शिकवून ? जगांतील सारीं तत्त्वं यांना सांगून किंवा दोन अक्षरं शिकवून कां यांची उन्नति होणार आहे ? अन् शिक्षण तरी त्यांच्या जीवनाला उपयुक्त असंच पाहिजे ना ? नाहीतर आमचं शिक्षण—" मध्येच विचारांची साखळी तुटे नी नोकरपेशाचीं जाचक बंधनं त्यांना अधिकच जाणवूं लागत.

या परिस्थितीतच चोपड्यास भाऊंची बदली होऊन तिथं ते कामावर रुजू झाले. भिल्ल-पावऱ्यांच्या जीवनाचं अवलोकन ते करूं लागले असले तरी त्या दिशेनं त्यांची प्रगति फारशी झाली नाही.

चोपडा तालुक्यांतील बहुतेक सर्व शेती सावकारांच्या ताब्यांत. जे काही शेतमालक शेतकरी होते त्याची संख्या थोडीच, आणि त्यांपैकी बहुतेकांची शेती फारच थोडीथोडी असलेली त्यांना आढळून आली. पिढीजाद ऐषआरामांत दारूच्या बाटल्या झोकत पडलेले गुजर बांधव अत्यंत विपन्नावस्थेस प्राप्त झालेले जसे त्यांना दिसले, तसेच दरवर्षीं इस्टेट वाढीस लावून गबर होणारे नी कोळी, भिल्ल, मराठे, इत्यादि रयतेला फुकट राबवून नागवून घेणारे स्वार्थलंपट सावकारहि त्यांनी पाहिले. विशेषतः चोपड्यांतच सावकार फार. त्यांचे दूरवर पसरलेले पाय भाऊंना पुरेसे त्यावेळेस दिसले नाहीत. सरकारी नोकर एवढ्या अवलोकनापलीकडे काय करूं शकणार ? उघड्या डोळ्यांनी ते रयतेची आर्थिक नी सामाजिक नागवणूक पाहात होते.

त्यांच्या आयुष्याला दुःखाची झळ या काळांत लागली नाही असं नाही. त्यांच्या दोन्ही मुली काळानं इहलोकांतून ओढ्न नेल्या. वडील मुलगा देविदास हा इंग्रजी शाळेंत जात होता. त्याला जळगांवीं ठेवण्यांत आलं होतं.

सन १९३०-३१ चा देशव्यापी सत्याग्रह सुरू झाला. महात्मागांधींच्या नेतृत्वाखाली जनमनाचा विराट अहिंसक प्रक्षोभ प्रकट झालेला असल्यामुळं खेडोपाडीं सत्याग्रहाशिवाय कांहीच ऐकूं येईनासं झालं. सातपुड्याच्या दऱ्या-दरड्यांत गावरणाऱ्या भिल्लपावऱ्यांना मात्र यांतलं कांही एक कळत नव्हतं. तरीहि बाजारपेटांतील चर्चेचा प्रतिध्वनि त्यांच्याहि कानीं पडे. गल्लोगल्लीं चाललेलीं निदर्शनं त्यांना दिसत होतीं. गांधी नांवाचा महात्मा राज्य मिळवण्यासाठी निघाला आहे एवढंच त्यांना कळत होतं. राष्ट्रीय चळवळीचा विकास झालेला असला तरी या वन्य जमातींपर्यंत तो लोंढा येऊन पोचला नव्हता. तो का येऊन पोचला नव्हता हें त्यावेळेस भाऊंना नीटसं कळलं नव्हतं नी काय केलं म्हणजे तो पोंचेल या प्रश्नाचं उत्तरदेखील त्यांना तेव्हां देतां आलं नाही. याच प्रश्नानं ते अलीकडं बेचैन झाले होते.

उत्कर्षाबद्दल किंवा राष्ट्रकार्याबद्दल केवळ विचार करणं वा त्याचीं स्वप्नं रंगवणं हा एक प्रकारं बौद्धिक वा मानसिक विलासच होय. बुद्धीला किंवा मनाला जेव्हा प्रत्यक्ष त्याची झळ लागते तेव्हाच त्याच्या कृतिप्रवणतेच्या खऱ्या कसोटीची वेळ येऊन ठेपते. भाऊंचं असंच झालं. त्यांच्या उदात्त विचारांना प्रत्यक्ष कृतीचं स्वरूप येऊं शकत नव्हतं पण तसा प्रसंग आला. त्यानं त्यांच्या जीवनांत आमूलाग्र स्थित्यंतर घडवून आणलं.

विद्यार्थ्यांनी शाळाकालेजांवर बहिष्कार घातला. सूतशाळा काढून खादीचा नी ग्रामसुधारणेचा कार्यक्रम अंमलांत आणण्यासाठी कॉंग्रेसचें कार्यकर्ते दूरवर पसरले. परदेशी मलावर बहिष्कार घालण्यांत आला. खुद्द चोपड्यांत भाऊंच्या घराजवळ परदेशी मालाची होळी झालेली त्यांना दिसली. रस्त्यानं जाणाऱ्या येणाऱ्या माणसांच्या परदेशी कापडाच्या टोप्या खुषीन नी सक्तीनं होळींत टाकण्यांत येत होत्या, लहानलहान पोरं देखील महात्माजींचा नी भारत-

मातेचा जय घोष करीत गल्लोगल्लीं निदर्शनं करीत हिंडत होतीं. पोलिसांनी धर-पकड सुरू केली.

इतर विद्यार्थ्यांसमवेत भाऊंच्या देविदासनंहि शाळेला रामराम ठोकला. तो प्रभातफेऱ्यांत भाग घेऊं लागला. सूतकताईचा प्रचार करूं लागला. आता भाऊंची खरी कसोटी होती. पुत्र प्रेमानं क्षणैक त्यांचं मन वेडं झालं. ते जळगांवीं धाईनं गेले. मुलाला उपदेश करूं लागले. त्यांचं म्हणं की, शाळेवर बहिष्कार घातलास तेवढा पुरे. वाटल्यास घरीं बसून सूत कात; देशकार्य करायला इतर लोक पुष्कळ आहेत, तू एकटा घरीं बसल्यानं देशाचं काही नुकसान होणार नाही; शिवाय मुलांना राजकारणाची पूर्ण माहिती नसत, वगैरे. पण देविदास सत्याग्रहाच्या उभारीनं पुरेपूर भारला गेला होता. त्यानं उत्तर दिलं, "प्रत्येक बाप जर आपल्या मुलाला असंच म्हणूं लागला तर देशाचं नुकसान होणार नाही का ? ह्या लढाईत अहिंसेचा अवलंब करायचा आहे, म्हणून लहानथोर सर्वांना तिच्यांत सैनिक म्हणून भाग घेतां येतो. देश स्वतंत्र होणार, त्यासाठी सर्वांनी झटलं पाहिजे. मी आता माघार घेणार नाही. राज-कारणाचा मी पूर्ण अभ्यास केलेला नाही हे खरं, पण ती अट पुरी करण्यासाठी आयुष्यभर थांबावं लागेल. देशाच्या सर्वश्रेष्ठ पुढाऱ्याच्या आज्ञा सैनिकाप्रमाणे पाळणं एवढच माझ्याकडून होण्यासारखं असल्यामुळं तेंच मी करीत आहे. आपल्या देशाचे पांग आम्ही फेडू. ते फेडण्याचा जन्मसिद्ध हक्क प्रत्येकाला आहे.'

"पण तूं हें साहस करूं नये असं माझं म्हणणं. तुझी आई सारखा तुझा ध्यास घेत आहे " शेवटची मात्रा लागू पडते की काय हें अजमावण्यासाठी भाऊ म्हणाले.

" देशाच्या स्वातंत्र्यापुढं आईवडिलांच्या अश्रूंचा विचार करायला बाबा, तुम्ही मला सांगतां ? देशासाठी घरादाराची उपेक्षा करणाऱ्या सैनिकाला क्षमा करूं न शकणारी शक्ति या जगांत दुसरी नाही. स्वतांच्या आईच्या सुखदुःखा-पेक्षा चाळीसकोटींच्या आईचं सुखदुःख अधिक महत्वाचं आहे. तिचं पारतंत्र्य नष्ट करण्याच्या संग्रामांत भाग न घेऊं तर आम्ही गुन्हेगार ठरू. "

" तें सर्व कळतं मला, पण माझं म्हणणं एकच आहे — तूं घरीं चल. त्याहून अधिक कांही बोलायची माझी इच्छा नाही. नाहीतर तुला मी बळजबरीनं घेऊन जाईन. "

"तुमच्या बोलण्यांत पुत्रप्रेम असलं तरी तुमची क्षमा मागतों. तुमच्या बळजबरीचा प्रतिकार मला करतां येत नसेल तर देशाच्या स्वातंत्र्यासाठी लढायला मी नालायक ठरेन. येऊनजाऊन सूतकताई, खादीप्रसार, परदेशी मालावर बहिष्कार, हा माझा आणि सर्वांचा कार्यक्रम आहे. तुम्ही भितां तरी कशाला, बाबा ? "

मुलाचं मन भाऊंना वळवतां आलं नाही. कुठून वळवतां येणार ? जिचा प्रतिकार करणं साम्राज्यशाहीला अशक्य, ती स्वातंत्र्याकांक्षा बाप झाला म्हणून त्याला कशी दडपतां येणार ? सुटलेल्या बाणाप्रमाणे देविदास भाऊंच्या प्रेम-जालांतून निसटला. दोन दिवस ते त्याच्या शोधार्थ हिंडत होते. शहरभर चळवळीचा हैदोस उसळला होता.

सायंकाळीं कुणींतरी बातमी आणून दिली कीं गावांत जयस्तंभाजवळ परदेशी मालाच्या मोटारी सत्याग्रही जमावानं अडवून धरल्या आहेत, नी त्यांत देविदासही दिसतो म्हणून. भाऊ धावतच गेले. पण एवढ्या जनसंमर्दात देविदास त्याच्या अडपझडप दृष्टीस पडला एवढंच काय तें. त्यांचा आवाज ऐकूं जाणं शक्यच नव्हतं.

मोटारींना चहूबाजूंनी सत्याग्रही जमावानं घेरलं आहे, पोलिस अंमलदार शिपायांसह वाटाघाटी करीत उभा आहे. स्फूर्तीच्या घोषणा ऐकूं येत आहेत. मोटारी हालूं शकत नाहीत. अंमलदारानं मोटारी चालवण्याचा हुकूम सोडला तोंच काही तरुण पुढं आडवे पडले. भाऊंनी पाहिलं. त्यांच्या काळजांत चर्चर झालं. हुंदक्यासरशी त्यांच्या तोंडून उद्गार निघाला— " देविदास ! बेटा ! "

मोटारींपुढं निजलेल्या तरुणांत देविदासहि होता. पोलिसांनी काही तरुणांना बाजूला ओढलं. पण देविदास — तो मोटारीच्या भागाला पक्केपणीं धरून पडलेला होता. पोलिस अंमलदारानं पुन्हा हुकूम सोडला. जनसंमर्द

खवळला. मोटारीवरील गाठींवर हल्ला चढवण्यांत आला. बांजूला कापडाची होळी भडकली. मागील मोटारींच्या धाव्या फोडण्यांत आल्या. कांही लोकांना अटक झाली. चहुबाजूंनी जयघोष चालू असतांच अजस्र हत्तीप्रमाणे मोटार हालून वाट काढीत चालली.

रक्ताच्या चिळकांड्यः उडाल्या. देशासाठी बापाशी भांडणारा देविदास बापाल दुःखांत लोटून तमाम जनतेला स्फूर्ति देऊन निघून गेला !

आरडाओरड—गलबला—लाठीमार—पांगापांग—स्फूर्तिशाली अध्याय तिथंच संपला.

× × × ×

देविदासच्या निधनाचा भाऊसाहेबांच्या मनाला मोटा धक्का बसला. जीवनाच्या नी कर्तृत्वाच्या खऱ्याखुऱ्या विकासासाठी त्यांचं मन आजवर आंतल्याआंतच हुरहुरत आलं होतं. त्या विकासाचा मार्ग त्यांना गावला नव्हता. पण देविदास विद्यार्थिदशेंतच आयुष्याचं सार्थक करून गेला होता. जिकडं-तिकडं त्याचं नांव सर्वतोमुखीं झालं. त्याच्या त्या अतुलनीय त्यागाचं न् धडाडीचं कौतुक सगळ्या रयतेकडून होत असलेलं ऐकून भाऊसाहेबांचा ऊर अभिमाननं दाटून येई. पण त्यांच्या पितृहृदयाचं समाधान तेवढ्यानं होईना. पुत्रवियोगाच दुःख ते विसरू शकत नव्हते. चिंधाबाईनं तर अन्नच सोडलं.

आरशांतलं प्रतिबिंब पाहून त्यावर टोच मारीत नी भोवती घिरट्या घालीत राहणाऱ्या चिडीप्रमाणें भाउसाहेबांची अवस्था झाली होती. आयुष्य हें कवड्यांच्या खेळासारखं वाटलं त्याना. बित्तू फडकला तर यश, न फडकला तर अपयश; पण यांतलं काहीच माणसाच्या हातीं असूं नये ! नोकरीवर त्यांची श्रद्धा कधीच नव्हती. जेणेकरून आपल्या जागृत मनाला समाधान प्राप्त होईल असं काहीतरी समाजकल्याण हातीं घ्यावं असं त्यांना वाटे. मुलाच्या उदाहरणानं त्यांच्या आयुष्यग्रंथाचं नवं पान उघडल गेलं. बोवा, उखर्डूमास्तर, चिंधाबाई, नाजीखाटकिन, या सर्वांपासून त्यांनी काहीना कांहीतरी उभारी वा मदत

घेतलेली होती. आतां पोटच्या गोळ्याच्या उदाहरणांत त्याना नवा मंत्र मिळाला. चिंधाबाईची न् नातलगांची नाराजी धाब्यावर बसवून त्यांनी पुढील पाऊल टाकलं. पत्नीला सर्व चीजवस्त देऊन त्यांनी सावखेड्यांत एक घर घेऊन राह्यला सांगितलं. सर्व व्यवस्था स्वतः करून दिली. नोकरीचा राजीनामा खरडला नी कचेरीच्या कंटाळवाण्या न् स्वार्थी वातावरणाला रामराम ठोकला. प्रभातफेऱ्या, सूतकताई, खादीप्रचार, अस्पृश्यतानिवारण, गावसफाई, व्याख्यानं, हा त्यांचा रोजचा व्यवसाय होऊन बसला.

रयतेच्या डोळ्यांत भरणारा असा हा त्याग होता. मामलेदारीसारखी मानाची, सत्तेची न् भरकूस पगाराची जागा भाऊंनी सोडली, तेव्हा धल्डीं माणसंसुद्धां बोलूं लागलीं, " इनाकारनस का मन्सारामबोवानं बिवाळ बोलास ? बाप तसा आंडोर. गांधीमाहात्मानि कामगिरी शे. भाऊसाहेबनि नोकरी छोळी दिधि देसनाकुन्ता, ते देव त्यास्हे दी ऱ्हाई. धन्न शे (मन्सारामबोवाचं बिवाड म्हणून नावाजतात तें विनाकारणच का ? बाप तसा बेटा. गांधीमहात्म्याची कामगिरी—मोहीम—आहे ही. भाऊसाहेबांनी देशासाठी नोकरी सोडली, देव त्याला पुढं सगळं देईल. धन्य आहे )"

राष्ट्रीय चळवळींत यापूर्वी भाऊसाहेबांनी भाग घेतला नव्हता, तरी त्यांच्या या त्यागामुळं लोक त्यांच्याकडं आकर्षिले गेले. दीर्घ तपश्चर्येनं नव्हे तर आकस्मिक त्यागानं ते सर्वांच्या डोळ्यांत मरले. त्यांच्याकडं उत्तर नी दक्षिण अशां दोन्ही तापीथडीवरल्या खेड्यांचं पुढारीपण अनायासें आलं ते राजकारणांत अननुभवी होते, पण रयतेच्या प्रेमानं ते नेते बनले. ही जबाबदारी मोठी होती. ती पार पाडण्यासाठी त्याना आरंभीं काही लोककार्याचे धडे गिरवणं भाग होतं. यांना दिसून आलं की अनेक वर्षं राष्ट्रीय चळवळींत हालअपेष्टा सोशीत कार्य करीत राहिलेले कित्येक सत्याग्रही रयतेच्या ध्यानींमनींहि नव्हते; कारण ते कनिष्ठ वर्गातलें नी गरीब होते. लोकांचे डोळे दिपवणारा आकस्मिक त्याग—भाऊसाहेबांसारखा—त्यांच्या जीवनांत नव्हता. टिकाऊ नी सुंदर रंगापेक्षा भडक रंगालाच भुलणाऱ्या रयतेची त्यांना कीव आली. आपल्या पाठीमागं दीर्घ नी भरीव तपश्चर्या नसूनहि केवळ मानाची नोकरी आपण सोडलो, एवढ्याशा

भडक त्यागाला रयत भुलूं शकते नी वर्षानुवर्षे हाल सोशीत देशासाठी जिवाचं रान करणाऱ्या श्रमवीरांची मात्र उपेक्षा होते, हा विपर्यास त्यांच्या मनावर फार गंभीर परिणाम करता झाला. कुठल्याहि व्याख्यानांत ते या कनिष्ठवर्गीय श्रमवीरांच्या कार्याचं महत्त्व सांगितल्याशिवाय राहात नसत. यामुळं स्वताहून इतरांना अधिक मान देण्यांत व्यक्त होणारा विनय हा सद्‌गुण भाऊसाहेबांच्या ठायीं रयतेला दिसूं लागला. जनमनांत त्यांना खोल स्थान मिळालं. कौतुकाचं प्रेमात नी प्रेमाचं श्रद्धेत रूपांतर व्हायला उशीर लागला नाही.

भोवतालच्या उपेक्षित श्रमवीरांमधेच मिटाराम पाटील अन् झिपरू कोळी या दोघांच्या कार्य करण्याची कळकळ, निःसीम स्वातंत्र्यप्रेम नी मनमिळाऊपणा या गुणांनी भाऊसाहेबांचं लक्ष वेधून घेतलं. या कार्यकर्त्यांच्या मेळाव्यांत भाऊसाहेबांचे रामभाऊ झाल्यामुळं तेंच नाव रयतेंत रूढ होत चाललं. रामभाऊ मिटाराम नी झिपरू यांच्यासह कार्य करीत नी राजकारणाच्या चर्चेत काही काळ अवश्य घालवीत.

गरीब शेतकरी नी शेतमजूर या वर्गातून मिटाराम नी झिपरू हे कार्यकर्ते निर्माण झाले होते. सावकारशाहीनं त्यांच्या घरादारांचा नी संसाराचा सत्यानाश केलेला होता. गांधी महात्मा शेतकऱ्यांचं राज्य स्थापन करणार आहे अशी त्यांची दृढ श्रद्धा असल्यामुळं ते या सत्याग्रहाच्या चळवळींत उतरले होते. ते म्हणत — " न्याय हेंच सत्य. कामकऱ्याच्या श्रमाचं फळ हें त्यालाच मिळालं पाहिजे हा खरा न्याय. तेंच सत्य. त्याचाच आग्रह आम्ही धरतों म्हणून आम्ही सत्याग्रही आहोंत. सत्याग्रहाचा दुसरा कोणताच अर्थ आम्हांला मालूम नाही. आमचीं बोटं सावकारशाहीनं भाजलीं आहेत. आमचे संसार तिनं बेचिराख केले आहेत. आम्ही स्वराज्य मिळवूं. शेतकरीकामकऱ्यांचं राज्य सुरू करूं. याच ध्येयानं आम्ही चळवळींत सामील झालों आहोंत. आम्हाला आजचं जुलमी परकं सरकार नको, नोकरशाही नको, सावकारशाही नको. आमच्या सत्याग्रहाचं हें ब्रीदवाक्य असलं पाहिजे. "

या अडाणी समजल्या गेलेल्या शेतमजुरांच्या तोंडून भाऊंना पुष्कळ शिकण्यासारखं दिसलं. सत्याग्रहाचा हा अर्थ त्यांच्या मनांत इतक्या ठकळ

रीतीनं कधीच आलेला नव्हता. ज्याची पिळणूक होते त्याच्या सत्याग्रहाचा अर्थ त्याना आता उमजला होता. गांधींच्या शब्दापेक्षाहि या श्रमवीरांच्या शब्दांत त्यांना खराखुरा सत्याग्रही अर्थ प्रतीत होवूं लागला.

सरकारची दडपशाही वाढत चालली तसतसा चळवळीचा डोंब भडकूं लागला. कैदखाने तुडुंब भरले. लहान मुलं देखील स्वातंत्र्याचा झेंडा ऊंचावीत प्रभातफेऱ्यांत नी निदर्शनांत सामील झालीं. धरायला आलेल्या पोलिसांना वाकोल्या दावीत मुलं उत्साहानं गर्जना करीत असलेलीं पाहून आता स्वराज्य दूर नाही असंच कुणालाहि वाटलं असतं.

कमतवाडींत रात्रीं शेतकऱ्यांची सभा संपवून भाऊ, मिठाराम नी झिपरू एका पडक्या धाबळींत कांबळी टाकून निजले होते. सुनी जागा असल्यामुळं वीसपाय चावत होते. अस्वस्थ झोपेच्या तंद्रींत असतांच मिटाराम जागा होऊन उठून बसला. गावकरी त्यांना उठवीत होते.

"पोलीस आले आहेत. उठा. लपून राहा."

त्या वाक्यानं ते खडबडून उठले. अवतीभोवती नजर टाकून भाऊ उत्तरले, "येऊं द्या पोलिसांना. आम्ही सत्याग्रही आहोंत. तुरुंगांत जायला तयारी आहे आमची." त्याबरोबर मिटाराम तावातावान बोलूं लागला, "भाऊ, हा काय अवसानघातकीपणा? आपणांला रान उठवायच आहे. दरवाड पेटवायची आहे. खेडोपाडीं हिंडून तमाम रयत उभी करायची. पोलिसांना झुकांडी दिलीच पाहिजे. स्वतः होऊन तुरुंगांत जायला सत्याग्रहच कशाला हवा?" त्यावर भाऊ त्याच्याशी भांडूं लागले. "महात्मा गांधींनी आफ्रिकेंत असतांना पोलिसांना आपण होऊन कायदेभंगाला साक्षीदार नमूद करायला सांगितलं होतं. सरकारशीदेखील लपवाछपवी नको. लपंडाव नको. तरच खरा सत्याग्रह. आपला स्वराज्याचा हक्क हें सत्य आहे. तो शाबीत करतांना पोलिसांशीदेखील आपण सत्यानं वागलं पाहिजे. बेधडक तुरुंगवास पत्करला पाहिजे. हेंच गांधींच म्हणणं आहे."

"भाऊ, तुमची कीव का करूं आता? लोकजागृतीच्या कार्यक्रमांत हें असलं अजब सत्य बसतं तरी कसं? तुरुंगवासाला आम्ही भीत नाही, पण

स्वतां होऊन पोलिसांच्या हातीं पडायचं याला का सत्याग्रह म्हणणार तुम्ही ?"

"होय. तो सत्याग्रहच."

"असला सत्याग्रह तुम्हालाच लखलाभ असो. गांधींच्या आज्ञा आम्ही पाळतों, पण आम्हा आंधळे सैनिक नाही जागृत सैनिक आहोंत. सैनिकानं डोकं दवडायचं वा गहाण टाकायचं कारण नाही. अहिंसक चळवळीचं किमान सत्याग्रही तत्व आम्हांला मान्य आहे. आम्ही पोलिसांच्या हातीं आपण होऊन जाणार नाही. तुम्हालाहि जावूं देणार नाही."

चोरकंदिलाच्या उजेडाचे झोत गल्लींत दिसूं लागतांच झिपरू आणि मिठाराम भाऊंना ओढीत धाबलीच्या मागच्या बाजूस दडूं लागले. पण पोलिसांनी मोव्हाटीपर्यंत मजल गाठली होती. बाहेर आरडाओरड चालू होती. त्या धांदलींत भाऊ पोलिसांच्या हातीं सापडले. झिपरू आणि मिठाराम कूड मोडून उकीरड्यांच्या आड लपत शेतांतील खोदरींतून पसार झाले.

भाऊंना अटक करण्यांत आली. कांही गांवकऱ्यांना दुट्टी भरून पोलिसांनी दुसऱ्या सत्याग्रहींचा शोध चालवला, पण ते हातीं लागले नाहींत. आपल्या वांझोट्या प्रयत्नाचं एकटं शेंडेफळ म्हणून एकाच कैद्याला घेऊन पोलिस मार्गाला लागले.

या ठिकाणींच मिठाराम नी झिपरू आणि रामभाऊ यांचे राजकीय मत-भेदामुळं दोन भिन्न मार्ग झाले

तुरुंगांत सत्याग्रहींची खूपच भरती झाल्यामुळं कांही ठिकाणीं सामान्य गुन्हेगार कैदी नी सत्याग्रही कैदी यांना एकत्रच ठेवण्यांत आलं. भाऊ ज्या कोठडींत होते तिच्यांतील सर्व कमीअधिक गुन्हेगार म्हणूनच कैदेंत ठेवण्यांत आले होते. इतरहि कांही सत्याग्रही त्या तुरुंगांत होते. गुन्हेगारांच्या संगतींत भाऊंना स्वार्थ-दंभाचं नी विषमतेचं पुष्कळ ज्ञान झालं. तिथंच सुंदऱ्या भिल, पोवलाद जगांतील कोळी, येक्या भिल, नगऱ्या भिल, या कैद्यांशी त्यांचा दृढ परिचय घडून आला.

सुंदऱ्या भिल आणि त्याचे दोस्त यांना सरकारनं न् दुनियेनं गुन्हेगार म्हणून तुरुंगांत डांबलं होतं सर्वांच्या दृष्टीनं ते गुन्हेगार होते, पण सुंदऱ्याच्या तोंडून त्यांची माहिती ऐकल्यावर रामभाऊंना ते पूर्ण निर्दोष असल्याची खात्री पटली. ज्या समाजव्यवस्थेंत त्यांची हयात गेली तिच्यांत माणसाच्या आसुरी वृत्तींनाच वाव मिळत असल्यामुळं समाजाच्या जुलमी घरोटांत भरडल्या गेलेल्या सुंदऱ्यासारखे लाखो लोक गुन्हेगार ठरले आहेत हें पाहून भाऊंना केवळ नामधारी सत्याग्रहापेक्षा अधिक कांहीतरी करणं इष्ट आहे असं वाटूं लागलं. पण त्यांची राजकीय दृष्टि तितकीशी सखोल नी विकसित झालेली नव्हती. एका सर्वमान्य पुढाऱ्याच्या हाकेला व्हकारा देत चहूकडून उठून उभी राहिलेली रयत मात्र त्यांना दिसत होती. रयतेच्या या स्वयंस्फूर्त स्वातंत्र्य-प्रेमाला भरीव राजकारणाचं स्वरूप देऊन एका नव्या दुनियेची उभारणी कशी करावी हा प्रश्न त्यांना कधीहि शिवला नव्हता. सुंदऱ्याची न् त्याच्या दोस्तांची हकीकत ऐकून जगांतल्या विषमतेची कल्पना, त्यांना आली असली तरी वरील प्रश्न त्यांना सुटला नव्हता. तो सोडवण्यास आपल्यापेक्षां सुंदऱ्याचे दोस्त नी मिठाराम-झिपरू हेच अधिक लायक होत अशी ग्वाही त्यांचं मन देत असे; पण भाविकतेवर नी दयाधर्मादि सद्‌गुणांवरील विश्वासावर पोसल गेलेलं तें मन आपल्याच भोवती गिरक्या घेत राही. नदीच्या पुरांतल्या खराडींत गरगर फिरणाऱ्या लाकडां-प्रमाणे त्यांची अवस्था झाली होती. मिठाराम नी झिपरू यांचे चेहरे त्यांच्या दृष्टीसमोर नेहमी उभे राहात; त्यांच्या त्यागाचं न् कर्तब-गारीचं त्यांना कौतुक वाटे, कांही बाबतींत आपणांहूनहि ते अधिक श्रेष्ठ आहेत असं ते मनाशी कबूल करीत; पण त्यांचे राजकीय विचार, त्यांची स्वराज्याची कल्पना, त्यांचे मार्ग, हें सर्व भाऊंना मानवत नव्हतं. त्यांच्या बुद्धीला मनाचा काटेरी लगाम भलत्याच वेळेस लागला असल्यामुळं नोकरीवर पाणी सोडूनहि केलेल्या सत्याग्रहांत बागूल करणाऱ्या ढोराप्रमाणे आत्मसमाधानांतच गुंगत राहण्याखेरीज त्यांना गत्यंतर उरलं नाही. अधूनमधून ते रात्रीं गवती चटई-वरून अमाक उठून बसत सुंदऱ्याकडं पाहात; तशा अंधाऱ्या वेळेसहि झोपेंतच त्याच्या चेहऱ्यावर दिसून येणारी बेडर नी बेफिकीर वृत्ति पाहून त्यांना त्याचा अचंबा नी एक प्रकारें भीतिच वाटे. पुन्हा पूर्वायुष्यांतील घटनांचीं स्वप्नदृश्यं पाहात ते डोळा लावीत.

सुंदऱ्याला लहानपणचे फारसे प्रसंग आठवत नसत; पण तो आठ वर्षांचा असतांना त्याच्या बापानं त्याला एका पाटलाला विकून टाकलं नी कांही दिवस त्याच्याकडून काम घेतल्यावर पाटलानं पण त्याला कन्हू शेठ नावाच्या सावकाराला मोघम करारानं विकून टाकल, एवढंच त्याला टाऊक होतं. कन्हू शेठनं आरंभीं त्याला गुरं चारण्याचंच तेवढं काम दिलं. नाहीतरी भिल्लाचा पोरगा दुसरं कोणतं काम करणार ? शेतकामाची भिल्लांना सवय नसते. मजुरीपेक्षा शेतांतली पिकं राखून महिन्याला पैसे घेणं, चोरून धान्य मिळवणं किंवा वेळ पडल्यास जंगलांतून चारोळ्या, टेंभरं, टोळआंबे, बेल, मोहू वगैरे मिळवून दिवस काढणं एवढंच त्यांना ठाऊक. कधीकधी तर खुशाल उपाशीं राहूनच झाडाखाली तणावून द्यावं हा त्यांचा परिपाठ. ना त्यांना घर ना बिढार. दाहीदिशांचे वारकरीच ते. म्हणून " भिल्लांच्या अंगांत काममू वृत्ति नसते " असं कन्हू शेठ नेहमी म्हणणार. स्वतां कन्हू शेठ फार मोठे जमीनदार. त्यांची चोपडाऱ्यावल भागांत दूरवर पसरलेली जमीन सावकारीच्या धंद्यांत त्यांनी मिळवली होती. शिवाय रोकडा व्यवहार लाखांनी चालायचा. दरोबस्त शेतकरी न् शेतमजूर दररोज, विशेषतः रविवारी बाजार म्हणून, त्यांच्या पेढीच्या परोटीखाली जमा होत. पाच दहा रुपयासाठी घर गहाण टाकणारे त्यांत असत, लगन—यावासाठी शंभरु रुपयांत दोन परतण शेत अडकवणारे त्यांत असत, शंभर रुपयांची कर्जात सूट मिळावी म्हणून शेठजीच्या हुकमावरून स्वतांची बायको किंवा चवळीच्या शेंगेसारखी कोवळी पोर शेठजींच्या बिछान्यावर पाठवणारे हवालदील नी तळतळणारे आत्मेहि त्यांत होते. शेठजी सावकारीच्या व्यवहारांत फार चोख असत. त्यांच्या चोखपणाला सगळीं कुळं भीत असत. दोन दिवसांच्या बाळंतिणीला उघड्यांत उभं करून तिच्या खाटेचा लिलाव भर टिवटणींत करायला देखील ते मागंपुढं पाहात नसत. वर आणखी " पैसा लेवाना वखत नाना म्हनी पाया पळतस आनं पैसा देवाना येयले नानी मरी ज्यास तुम्हनी ! ( पैसे घेते वेळेस नाना म्हणून पायां पडतां आणि पैसे देतांना मात्र नानी मरून जाते तुमची ! ) " असे शब्द कर्जदाराला ऐकवल्यावाचून आपल्या जन्माचं सार्थक होणार नाही अशी खात्री असल्यामुळंच की काय, तें सार्थक ते हटकून करून घेत.

कन्हू शेटनं याखेरीज दुसरा एक धंदा पत्करला होता. सगळेच सावकार तो करतात. सुंद्र्या मोठा झाल्यावर त्यांनी त्याला स्वतांच्या जातींत वावरण्यास मुभा दिली. मवाली दरोडेखोरांशी त्याचे संबंध जुळवले आणि दरोडे घालण्यास, चोऱ्याचपाट्या करण्यास, त्याला उत्तेजन दिलं. सुंद्र्यानं चोऱ्या कराव्या अन् कन्हू शेटनं त्या पचवाव्या. कन्हू शेट गबर होत चालला, पण सुंद्र्या मात्र कफल्लकच राहिला. आपण सुंद्र्याचे हितरक्षक आहोत असं शेटजी त्याला भासवीत. आपल्या सावलींतच सुंद्र्यानं नांवालौकिकाला (!!) यावं अशी त्यांची मनापासून इच्छा होती.

सावलीचं ऊन सुंद्र्याला चांगलंच जाणवूं लागलं. त्या सावलीच्या उन्हानं त्याची चांगलीच बोफली शेकली गेली. पैशाच्या भानगडी म्हणजे खरोखर भानगडी होत हे त्याला कळूं लागलं. एका दरोड्याचा पोलिसांना सुगावा लागला. सुंद्र्या पकडला गेला. कन्हूशेट नामानिराळे राहिले. त्यांनी दरोड्यांतलं सोनं-रुपं गुप्तपणें वितळवून त्याची विल्हेवाट लावून टाकली. सुंद्र्याची पाठ कोण राखणार ? शेटजी बगल झाडून बाजूला झाले.

सुंद्र्याचं वकीलपत्र चोपड्यांतले सुप्रसिद्ध समाजसुधारक आणि दानधर्मशील म्हणून नांवाजलेल्या काकासाहेब वकिलांनी घेतलं. धुतला तांदूळ म्हणून समाजात टेंभ्यानं मिरवणाऱ्या या वकिलानं सुंद्र्याला नवा दरोडा घालून मुद्देमाल आपणांला देण्याच्या अटीवर वकीलपत्र स्वीकारतों म्हणून सांगितलं. दरोडा कुणाच्या घरीं घालायचा, तिथं काय काय संपत्ती आहे याची माहितीमुद्रा काकासाहेबांनी त्याला दिली. अधिकाऱ्यांना भरकूस लाच भरून त्यांनी सुंद्र्याची निर्दोष म्हणून सुटका करविली. पण आता सुंद्र्या काकासाहेबांचा बंदा बनला होता. चारदोन दरोडे त्यांनीच पचविले. सुंद्र्या हा कन्हू शेटचा नोकर असल्यामुळं कन्हूशेटला वैषम्य वाटूं लागलं. पण एका चोरानं दुसऱ्या चोराच्या बाबतींत मूग गिळून बसावं अशी गत काकासाहेब नी कन्हू शेट यांची झाली. या संभावित समाजकंटकांचे कृष्ण—व्यवहार अबाधितपणें चालू राहिले.

सुंद्र्यानं लग्न केलं. त्यासाठी कन्हूशेटनं त्याला सवाशे रुपये देऊन दुप्पटीचा कागद लिहून घेतला. दोन दिवस दारूची धमाल चालून

संसाराला सुरवात झाल्यावर सुंदऱ्याला आढळून आलं की, आपल्यावरील सावलीचं ऊन अधिक प्रखर झालेलं असून ज्यांचे आपण रांजण भरले ते काकासाहेब नी कन्हूशेठ आपल्यावर गुलामगिरी लादून बसले आहेत. कन्हूशेठच्या घरीं कर्जफेडीस्तव त्याला राबावं लागत होतं, पण कर्ज कधीच फिटत नव्हतं. पोट भागवण्यासाठी म्हणून घेतलेल्या धान्याची किंमत दुप्पटीनं वाढत जाऊन कर्ज वर्षाअखेर कायम. तोडलेल्या वृक्षाला दुप्पट जोरानं डीर फुटतात त्याप्रमाणे ह्या कर्जाची गत होती. त्या निरक्षर, अडाणी, अन् देवभोळ्या जिवाला सावकारशाहीचे हे गळफास पराकाष्ठेनं जाणवूं लागले, तेव्हा त्यानं बंड करायचं ठरवलं. मागील सर्व दरोड्यांतील रकमेचा हिस्सा त्यानं शेठजीकडं मागितला; नाहीतर सरकारांत कळवायची धमकी दिली. शेठजी पिळ्यान्‌पिळ्यांचे वस्ताद; एका निरक्षर अडाण्याला ते दाद थोडेच देणार? त्यांनी देतों म्हणून उलटसुलट कागद लिहून त्यांवर त्याचे आंगठे घेतले.

पुढं तापीकाठच्या तावसं गांवांत दरोडा पडला. सुंदऱ्याचं त्यांत अंग नव्हतं. तो सावखेड्यांत मालीच्या मुलाच्या मरणानंतर दुःख प्रदर्शित करण्या-साठी गेला होता ही संधि साधून कन्हूशेठनं अलीकडं अवजड होत चाललेलं हें धूड उखडून लावण्यासाठी त्याच्याविरुद्ध पोलिसांत वर्दी देवविली. तावशांतील दरोड्याबाबत संशयित आरोपी म्हणून त्याला पकडण्यांत आलं. सत्याग्रहाच्या चळवळीमुळं कोर्टांतलीं कामं रेंगाळूं लागलीं. सुंदऱ्याला तुरुंगांतच खितपत पडावं लागलं. सावकारशाहीच्या नी मालकशाहीच्या सावलीच्या उन्हांत त्याचा संसार पार जळून गेला होता.

एकदां भाऊंना आपल्या आठवणी सांगत असतां सुंदऱ्यानं तुरुंगात आलेल्या नव्या कैद्याकडं पाहिलं. तो नगऱ्या भिल होता. चहार्डीच्या एका बाप्पाचा तो नोकर. त्याच दिवशीं नगऱ्याकडून सुंदऱ्याला बातमी मिळाली की आपली बायको कन्हूशेठनं ठेवून घेतली असून शेठजींचे चवचाल चाळे सगळ्यांना ठाऊक झालेले आहेत

सुंदऱ्यानं डोळ्यांत रग आणून दातओठ चावले. "भिलटाना बच्चा शे. कन्ह्याले चांगला हात दखाळसू (भिल्लाचा बच्चा आहें मी त्या कन्ह्याला चांगलाच हात दाखवतो)"—तो पुटपुटला.

त्या प्रसंगीं त्या निरपराध जिवाचा तो सात्विक क्रोध रामभाऊंना मोठा भीषणरम्य वाटला होता.

त्याच सुंदऱ्याला आज रेंजरसाहेबांनी वय वगैरे न पाहतां थडाथड थोबाडांत मारल्या तेव्हाचा त्याचा चेहराहि भाऊंना आठवला. कन्हू शेठच्या पेढीवर दरोडा घालून सुंदऱ्यानं त्याचा सूड घेतला होता. आता रेंजरसाहेबांना तो जें बोलला होता तें जर त्यानं कृतींत उतरवलं तर ? ?

हा विचार मनांत येतांच त्यांच्या काळजाचा थरकाप झाला. अंधारांतील भीषणतेत भर घालणारा तो विचार टाळण्यासाठी ते खाटेवरून उठले. भोवतालच्या अंधाराची त्यांना आता कुठं जाणीव झाली. गोड्या तेलाच्या दिव्याची वात केव्हांच जळून गेली होती. बैल बागूल करीत शांतपणें बसले होते. घोडं मागच्या एका पायाला दुसरा पाय टेकून पेंगत उभं होतं.

---

# ३

इतक्या विचारानंतर भाऊंना झोपेचा नुकताच ढुळका लागला असेल नसेल, तोंच दारीं त्यांना कुणीतरी हाका मारूं लागल्यामुळ ते जागे झाले. त्रिंधाबाईंनाहि जाग आली पण भाऊनी त्यांना स्वस्थ झोपायला सांगितलं अन् दार उघडून ते बाहेर आले. तेवढ्या रात्रीं तंगड्या तोडीत ते शेतकरी दऱ्या-खोऱ्यांतले रस्ते आक्रमून आलेले होते. हामजीबा, धुडक्या, वगैरे ढोरक्येहि त्यांच्या बरोबर परत आलेले त्यांना दिसले. बिचारे कोर्टातल्या आरोपीप्रमाणे उभे होते. अपराध नसतांना रेंजरसाहेबांनी त्यांना गाळया देऊन नी मारून-पिटून ढोरं कोंडवाड्यांत घातलीं होतीं घरीं गेल्यावर मालकांनी त्यांना दाबलं होतं. ढोरक्याचं नी हातावर पोट भरणाऱ्या मजुराचं जगणंच तसं.

कोंडवाड्यांतल्या ढोरांपैकी कांही ढोरं सावकारांचीं न् जमीनदारांचीं होतीं त्यांच्यापैकी अर्थात् कुणीहि आलेलं नव्हतं. दुसऱ्या दिवशीं जाऊन ढोरं

सोडवून आणूं ही उमेद त्यांना; शिवाय कोंडवाड्याची रकम जी भरावी लागणार ती ते ढोरक्यापासूनच वसूल करणार—रिवाजच होता तो त्यांचा. पण जे ढोरमालक गरीब शेतकरी होते ते सर्व तातडीनं आलेले होते. त्यांच्या-पैकी बहुतेकांजवळ पैसे नव्हते, म्हणून भाऊंचा हवाला देऊन ढोरं सोडवण्याची तरी त्यांना उमेद होती. भाऊ त्यांचे पाठीराखे ते भाऊंना भेटायला आले.

भाऊंनी सर्वांचं म्हणणं ऐकून घेतलं. अर्ध्या उघड्यानागड्या अशा त्यांच्या त्या कैकाड्या मूर्ति पाहून भाऊंना त्यांच्या कठीण परिस्थितीची तीव्र जाणीव झाली. युद्धकाळामुळं महागाई मी मी म्हणतं आहे, पाचपट पैसे देऊनहि धोतर मिळायची मारामार. वर्षभर कष्टानं जमीन खेडूनसुद्धा कर्जभरपाई म्हणून सर्व धान्यधुन्य सावकार-जमीनदारांच्या गोदामांत जाऊन पडल्यामुळं पुन्हा त्यांच्याचपासून धान्य तिपटीच्या भावानं विकत घ्यायचं, ती किंमत देण्यास पैसे नाहीत म्हणून दामदुप्पटीचा कागद लिहून द्यायचा; नेसायला धडूत नाही, खायला कोंडा नाही, जमिनी अक्षरशः मातीमोलानं सावकारांच्या वशांत चाललेल्या; अशी बिपत सगळीकडून झाल्यामुळं आधीच हवालदील झालेले शेतकरी कोंडवाड्याचा दंड कुठून भरणार! काहींनी तर "पैसे भरण्यापेक्षा ढोरांचा कोंडवाड्यांत लिलाव का होईना" असं उत्तर दिलं. सगळे भाऊंच्या पाया पडूं लागले "आटला वखत समाई ल्या, जीभू. पोऱ्हासोरोस्नु धनी सत. पोटवरे पाय पळी ग्या. (एवढ्या वेळेस सांभाळून घ्या, जीभाऊ. पोरासोरांचे धनी आहोंत. पोटावर पाय पडलेला आहेच.)"

भाऊंना त्यांच्या रावण्या ऐकवेनात. घटकाभर त्यांना ठग पडले. युद्धकाळ त्यांनाहि भोवला. बायकोच्या अंगावरचं दांडीं केलेलं फाटकं लुगडं नी हातांतले रोठे बिलोर दिसत होते त्यांना. स्वतांसाठी टोपीदेखील त्यांना घेतां आली नव्हती; नामूची टोपीच शेंडीच्या घेरावर उणीपुरी ठेवून ते गरज भागवीत होते. शेतकऱ्यांची गरज भागवणं त्यांना शक्य नव्हतं. पण मध्यस्थी करावी म्हणून त्यांना घेऊन ते हाळापलीकडं पाटलाच्या घरीं गेले. पाटलाच्याच घरीं चावडीकडल्या खोलींत रेंजरसाहेब असल्याचं त्यांना समजलं.

पाटलानं कानांवर हात ठेवले. पैसे आल्याखेरीज कोंडवाड्यांतून ढोरं सोडतां येत नाहींत म्हणून रोखठोक उत्तर मिळालं आठ दिवसांच्या आंत

दंडभरणा करूं. म्हणून परोपरीनं ढोरमालकांनी गावण्या केल्या, भाऊंनी हवाला घेतला. पण उपयोग झाला नाहीं. रेंजरसाहेबाच्या खोलीकडं भाऊंनी मोर्चा वळवला. शेतकरी बाहेरच्च बसले.

भाऊंचा पाणउतारा करण्याची संधि साहेब कसे दवडणार? दंडाच्या हवाल्याची खिर्डी करून ते म्हणाले, "राहीनात का ढोरं कोंडवाड्यांत. पैसे येतील हातांत तेव्हा शेतकरी सोडवून घेतील आपापलीं जित्राब. नाहीतर लिलाव होईल, दुसरं काय? तुम्ही कशाला हवाल्याच्या फंदांत पडतां? या लोकांचा अनुभव तुम्हाला नाही, मला आहे. तुम्ही हवाला घ्या नी ढोरं कोंडवाड्याबाहेर जाऊं द्या की ते तुम्हालाहि विसरतील नी पैसे द्यायलाहि. हरामखोर लोक असतात. यांना उठल्या लाथ, बसतां लाथ, हा न्याय पाहिजे."

"माझं म्हणणं असं, साहेब," भाऊ समजावणीच्या नरम भाषेत बोलूं लागले, "कीं या ढोरमालकापाशी पैसे नाहीत. आठ दिवस ढोरं राहिलीं तर दंड वाढत जाईल. महागाईमुळं विपाला अधेला मिळत नाही. म्हणून रावण्या करताहेत. मी हवाला घेतों. मजजवळदेखील पैसे नाहीत; पण आठ दिवसांत ढोरमालकांनी आणून दिले नाहीत तर मी देईन पैसे."

"तें सगळं खरं आहे." साहेबांची मल्लीनाथी सुरू झाली, "पण त्यांनी आणले नाहीत तर पाटलानं कुठंकुठं हिंडायचं न् कुठापे करायचे? आणि तुम्ही तरी कुठून देणार? तुम्ही देशभक्त."

शेवटचे शब्द अशा सुरांत त्यांनी उच्चारले की भाऊंना नेमका तो टोमणा जाणवला. त्यांना वाटलं, जास्त कांहीएक न बोलतां चालतें व्हावं, पण शेतकऱ्यांची दैना स्वस्थ बसूं देईना त्यांना. शेवटीं कांहीशा अजीजीनंच म्हटलं, "साहेब, आपलींच लेकरं आहेत. गरीब माणसं दया विसरत नसतात. एवढं तरी करा."

"तुम्ही काय म्हणतां हां?" चढ्या आवाजांत साहेब बोलूं लागले "ही जंगल सेटलमेंट असली नी मी रेंजर असलों तरी कोंडवाड्याच्या

कामावर कांही माझी सत्ता नाही. पाटील आणि वरचे मुलकी अधिकारी कांहीहि करोत. मला कांहीहि करतां येत नाही. कांही केल्यास गुन्हा होईल तो माझा. ”

एखादूक ढोर कुपांत घुसलं असावं ही सबब साधून साहेबांनी सगळीं ढोरं कोंडवाड्यांत डांबलीं होतीं नी आता ते मुलकी कायद्याचा देखावा पुढं करीत होते. एरवी हजार वेळां त्यांनी त्या जंगल सेटलमेंटमधे मुलकी कायदे पायाखाली तुडवले असतील. युद्धपरिस्थितींत महागाईमुळं अन्नाला न् कपड्याला मोताद झालेल्या शेतकऱ्यांकडून ज्वारीबाजरीपासून तूर–कुळथा पर्यंत सर्व धान्य खाजगी उपयोगासाठी सक्तीन वसूल करतांना त्यांना मुलकी किंवा दुसरा कोणताहि कायदा आडवा आला नव्हता. शेतकऱ्यांपासून मुर्ग्या किंवा बोकड उपटून आपला आत्मा गार करण्याचा हक्क काय त्यांना कायद्यानं दिलेला होता ? वाटल त्या खाजगी कामासाठी शेतकऱ्यांना विगार करायला लावून खोपड्याच्या आपल्या बंगल्याबाहेर त्यांना दिवसभर उन्हांत अन् उपाशी तात्कळत ठेवतांना त्यांना माणुसकीचा कायदा कधीच्च आठवला नव्हता. सेटलमेंटच्या गावांत विहिरी किंवा कोंडवाडे बांधून घेण्यासाठी शेत-कऱ्यांना विगारीच्या नावाखाली मजुरीवाचून राबवून घेऊन मुलकी खात्यानं दिलेले मजुरीचे पैसे स्वतां गिळंकृत करण्याला त्यांनी मागं पुढं पाहिलं नव्हतं. जंगलांत नवीन सेटलमेंट बसवतांना पाडण्यांत आलेलीं नवीं शेतं गरीब शेत-कऱ्यांना मोफत वाटून द्यायचा सरकारी कायदा धाब्यावर बसवून कोळी-पावऱ्यां-पासून शेतामागं तीनचारशें रुपये उपटून स्वताची पोतडी भरतांना रेंजरसाहेबांना दिक्कत वाटली नव्हती. भिल्लपावऱ्यांकडून सक्तीनं बेकायदा दारू घेऊन आपला तब्येत गार करतांना त्याना शरम वाटली नव्हती. जंगलखात्याच्या कन्सर्वेटर-कडून किंवा डिव्हिजनल ऑफिसरकडून शेतकऱ्यांना आलेले फायदेशीर हुकूम दडपून ठेवून उघड लांच खातांना आणि सतरा भानगडी निर्माण करतांना न्यायाची आठवण त्यांना कधीहि झाली नव्हती. गावांतील सर्व शेतकऱ्यांच्या वतीनं अर्ज करवून गावासाठी मिळालेलं घासलेट किंवा साखर स्वतां पाटला-बरोबर अर्धे वाटून घेऊन शेतकऱ्यांना कोकलत ठेवतांना रेंजरसाहेबांना अन्न-खात्याच्या किंवा मुलकी खात्याच्या कायद्याची पर्वा वाटली नव्हती; नी आज ते कोंडवाड्याच्या बाबतींत भाऊंना मुलकी कायद्याची सबब सांगत होते !

जंगलसेटलमेंटमधील त्या अरेराव हुकूमशहाचं एकेक वाक्य भाऊंच्या कानांत कढत तेल ओतल्यासारखं तिडतिडत होतं. घटकाभर भाऊ खाली घोण घालून विचार करीत बसले होते.

बिचाऱ्या ढोरक्यांचा न् ढोरमालकांचा नाइलाज होता. एक दोघे तिथंच बाहेर अंजनाच्या झाडाखाली झोपीं गेले. कांही गावांत ओळखीच्या शेतकऱ्यांकडं निघून गेले.

खोलींत खाटेवर हलक्यां कपड्यांत लवंडलेले नी सिगरेटीचा धूर सोडीत असलेले रेंजरसाहेब, घोण घालून विचार करीत बसलेले भाऊ नी भिंतीशी पेंगणारा पाटील, त्याचप्रमाणे पलीकडल्या धाबलींत घोड्याजवळ आंग टाकून झोपी गेलेला वंकार जागल्या, एवढीच एकंदर मंडळी. स्तब्ध शांतता पसरली होती. असाच बराचसा वेळ आणखी गेला असता. पण—मागच्या बाजूला खोदरीच्या काठावर ढासण होती. अंजन, हिवर, सादडा, यांच्या झाडीवर देवळ्याच्या वेलांनी कचकण भरलेलं होतं. तिकडून कसलासा आवाज आला. पण तिकडं कुणीं लक्ष्य दिलं नाहीं. एक दोन मिनिटांच्या आंतच भिंतींतल्या खिडकीला जोराचा धक्का बसला अन् साहेब किंवा पाटील उठून बसतात न बसतात तोंच पुढलं दार सनकेसरशी लाथेनं ढकलून दोनतीन भिल्ल खांद्यावर कुऱ्हाडी घेऊन उभे असलेले सगळयांना दिसले क्षणांतच खोलीला कुऱ्हाडबंद भिल्लपावऱ्यांचा गराडा पडला अन् आंत गडबड सुरू झाली. "कोण, धुडक्या भिल ? तू ?" बोबडी वळलेली सावरण्याचा प्रयत्न करीत साहेब ओरडले.

पण धुडक्यानं बेंबटाप्रमाणे गुरगुरण्यापलीकडं कांहीच केलं नाहीं. तोंडाला काळं फडकं बांधलेला एक कैकाड्या पण कणखर शरीराचा भिल सोबत्यांना सारून आंत आला. साहेबांनी त्याला ओळखलं नाही. पण भाऊनी ओळखलं. तो सुंदऱ्या भिल होता.

"काय सायेब, आते मापें गाठ स. तुन्ही भरांती एक घंटामा उतारी टाकस्र. डोयामा आधिकारनी धुंदी स तुन्हा. आरे सायेब, इतला भरी उंबरमा

कोन्ही हातनी चरपट खादी नहि. धळलाला मानूसना मोव्हाळामा माराले तुल्हे सरम नहि उनी ? तुन्हा × × × × × ! येक कुन्हाळना टोला देसू ते सतरा खांडे करी देसू. (काय साहेब, आता माझ्याशी गाट आहे. तुझी भ्रांति एका क्षणांत उतरून टाकीन. तुझ्या डोळयांत अधिकाराची धुंदी चढली आहे. अरे साहेब, इतक्या हयातींत अजून कुणाच्या हातची चापट खाल्ली नाही मीं. म्हाताऱ्या माणसाच्या तोंडांत मारतांना तुला शरम नाही का वाटली ? तुझ्या × × × × ! कुन्हाडीचा एक टोला देईन तर सतरा खांडोळीं होतील तुझीं) " आणखी शिव्या हासडून तो जरा पुढं आला. भाऊ त्याला निवारूं लागले. वेडेपणा न करण्याबद्दल त्याला ते बजावूं लागले. पण त्याच्या डोळयांत सुडाची भावना न् तिची रग यांपलीकडं कांहीएक दिसत नव्हतं. भाऊंचा हात थोडया उद्वेगानं बाजूला झटकून देऊन सुंदऱ्या बोलूं लागला.

" आरे मी ते भिलटाना बच्चा स. बदला लेयानाकुंता जातवालास्ले लई उनू. आते साएब, तुन्हा दिन गनी ले. भाऊ, सुंदऱ्या बदला लेवाले येएल स. मझार पळीशी मन्हान् तुम्हना काय फायदा स ? आयकी ल्या ह्या रंजक साएब जो येस तो पह्यलाथिन बी जबून हिंगस. यास्ले भरांती स कि बठा किरशान आन मजूर यास्ना बापना गुलाम सत जानूक. यास्ना × × × ×, आन तुम्हु त्या गांधि माहात्मानं ग्यान आम्हले सांगतस कि बट्टं आयकी लेव्वो. पन भाऊ, भिलटाना आंडोरले त्यान्ह काय स ? उठवो ते लाथ बटस, बठवो ते लाथ बटस; आशी स हाइ शेटलमेन ! रंजकसाएब आढलना राज्या स—आरेराव स—त्यान्ह बापनी कमाई स जानूक. आम्हिन गरीब लोके सइन करी न्हायनूत रहनी या आरेराव आधिकारीस्नं फावस. माती ग्यात सम्दा, एनि × × × × ! ( अरे मी तर भिल्ल्याचा बच्चा आहे. बदला—सूड—घेण्यासाठी जातभाईंना घेऊन आलों. आता साहेब, तुझे दिवस मोजायला लाग पाहूं. भाऊ, सुंदऱ्या बदला—सूड—घ्यायला आला आहे. मधेच तुम्ही पडल्यानं माझा किंवा तुमचा कोणता फायदा होणार आहे ? ऐकून घ्या. हे रेंजरसाहेब जे जे म्हणून येतात ते पहिल्यांपेक्षा अधिकच बेरड निघतात. यांना भ्रांत आहे की सगळे शेतकरी न् मजूर यांच्या बापजाद्यांचे गुलाम आहेत जसे कांही. याच्या × × ×, आणि तुम्ही त्या गांधी महात्म्याचा उपदेश आम्हांला सांगतां की, जें जें होईल

तें सहन करावं मुकाट्यानं. पण भाऊ, भिलड्याच्या पोरांना काय त्याचं ? उठतांना लाथ, बसतांना लाथ, असा ह्या सेटलमेंटचा कायदा ! रेंजरसाहेब म्हणजे इथला राजा—अरेराव आहे. त्याच्या बापजाद्यांचीच मिरास आहे जणू. आम्ही गरीब लोक सहन करीत असतां म्हणून या अरेराव अधिकाऱ्यांचं फावतं. सगळे मातले आहेत बेटे. × × × × ! )"

हा वेळपर्यंत खोलींतलं वातावरण अत्यंत भेसूर झालं होतं. भिल्लांचे कैकाडी देह आणि कुऱ्हाडी पाहून पाटील तर भेदरूनच गेला होता. भाऊ, सुंदऱ्याला आणि त्याचा साथीदारांना अविचार न करण्याबद्दल रावण्या करून सांगत होते. धुडक्या न् पोवलाद यांनी साहेबांना खाटेवर दडपून धरलं होतं.

आपल्या आजवरच्या साऱ्या राजकीय स्वप्नाचा डोलारा आज कोसळून पडत आहे असं भाऊंना वाटलं. अलीकडं त्यांच्या भिल्ल सेवामंडळाचं भिल्लां-वरचं वजन अगदीच ओसरलेलं त्यांना दिसत होतं. पूर्वी भाऊंना महात्म्याचा अवतार मानणारे तेच भिल्लपावरे आजकाल उघडपणें भाऊंना "तुमचं ग्यान आम्हांला पटत नाही" असं सांगूं लागले होते. सुंदऱ्याहि त्याला अपवाद नव्हता. लहानसहान अन्यायाचीहि दाद भाऊंकडं मागायला येणारा सुंदऱ्या गेल्या संध्याकाळीं साहेबांनी त्याच्या थोबाडींत भडकावल्यावर आपल्याकडं ढूंकून देखील न बघतां सुडाच्या भावनेनं जळफळत उभा असलेला भाऊंनी पाहिला होता. अन्याय मुकाट्यानं सोसणं, अधिकारी उर्मटपणानं वागले तरी नम्रता न सोडतां सत्याचा आग्रह धरणं, हा त्यांचा उपदेश हरघडी पायदळीं तुडवला जाणारा त्यांना दिसत होता. आताशा भोंवतालच्या खेड्यापाड्यांतील भिल्लपावऱ्यांच्या मनांत प्रतिकाराची भावना मूळ धरू लागली होती. भाऊंच्या भिल्लसेवामंडळाचं अवतारकार्य संपलेलं उघड होतं. मोठ्या उतावीळपणानं भाऊ भिल्लांची प्रत्येक हालचाल पाहात होते. पाटलानं आरडाओरड करायचा प्रयत्न केला. पण रंग्या भिल्लानं त्याला एक ठोसा लगावून भिंतींत चिणलं आणि "आरे तू बी सायेबना कुतळ्ळा. हारामखोर ! लोकेस्ना मुंड्या मोळस आं ! ( अरे तू तरी साहेबांचा कुतरडाच की नाही ? हरामखोरा ! लोकांच्या माना मुरगळतोस आं ? )" असं म्हणून त्याला गप्प केलं.

गावकऱ्यांना गप्प राहायला भिल्लगावऱ्यांनी सांगून ठेवलेलं असावं. गावांत कसलीहि हालचाल नव्हती. पलीकडच्या शेताच्या वडांगींत मोराचा टाहो चालू होता. मांजरीच्यासारख्या त्या आवाजानं खोलीतल्या भेसुरतेंत अधिकच भर पडली.

कांही पावरे आंत शिरले. त्यांनी सुदऱ्याच्या हुकमावरून साहेबांना करकचून बांधून आकोडे लावले नी तिथून उचललं. पाटलाच्या तोंडांत सुडक्याचा बोळा भरून त्याचे हातपाय बांधून टाकण्यांत आले. भाऊंना स्वस्थ राहायला सांगून नी जागल्याला दोनचार लाथा देऊन सारे खोदरीच्या दिशेनं अंधारांत पसार झाले.

भाऊ जड पावलांनी बाहेर आले. त्यांचं डोकं विचारानं आणि घडलेलं सगळं पाहून भणाणून गेलं होतं. भिल्लांनी रेंजरसाहेबांना पकडून नेलं होत, त्यांचं काय होणार हा प्रश्न त्यांच्या डोळ्यासमोर उभा राहिला. ते पुन्हां आंत गेले. सगळीकडं आलबेल आहेसं पाहून त्यांनी पाटलाला सोडवलं. पाटील चडफडतच जागल्या—कामदारांना जागं करायला गेला. दोनचार आरोळ्या देऊनहि गावांतून व्हकारा मिळाला नाही. गावकरी स्वस्थ झोपले होते.

भाऊंचं चित्त अधिकच अस्वस्थ झालं. त्यांना सगळीकडं आणभक वाटू लागलं. भिल्लसेवामंडळामार्फत त्यांनी चालवलेल्या लोकसेवेचा हा मोठाच पराभव होता. आत्मबल, सत्य, सहनशीलता, सात्त्विक मनोवृत्ति, निष्काम कर्म, वगैरे त्यांच्या मनोराज्याचे सगळे बुरूज एकदम ढासळून पडले होते. हा पराभव त्यांना असह्य झाला.

हाळासमोरच्या पटांगणांत अंधारभुडूप होतं. कोंडवाड्यांतल्या ढोरांची रेटारेट झाल्यामुळं त्यांच्या खुरांचे आवाज तेवढे ऐकूं येत होते. मधूनच खोदरीपलीकडल्या पिंप्रीच्या झाडाकडं तडशाचा आवाज वाऱ्याच्या झुळकेसरशी ऐकूं येत होता. बाकी सर्वत्र किर्र झालं होतं. भिल्लांच्या धास्तीमुळं पाटील घरांत जाऊन बसला होता. रेंजरसाहेबांवर आलेली आफत फार गंभीर स्वरूपाची होती. सकाळीं चोपड्याला आणि आजूबाजूला त्यांच्या शोधासाठी माणसं

पाठवणं जरूरीचं होतं. यांतलं कांहीएक भाऊंच्या हातीं नव्हतं. जें जें होईल तें तें पाहावं या पलीकडं कांहीहि त्यांना करतां येत नव्हतं. गावावर झाल्या प्रसंगाची तोहमत येणार या विचारांत त्यांच्या मनांत धाकधूक निर्माण झाली. ते विलक्षण कात्रींत सापडले होते. सेटलमेंटमधून त्यांना काढून टाकण्यासाठी रेंजरसाहेब खटपट करीत होते तर इकडं भिल्लबाऱ्यांवरलं त्यांच्या भिल्लसेवा-मंडळाचं वजन आजकाल निर्नाम नष्ट झालं होतं. अधिकारी त्यांना सूननजरेनं पाहात होते तर रयतेपासून त्यांची फारकत झाल्यासारखी होती. साराच इतिहास मोटा चमत्कारिक होता. मन शांत करण्यासाठी गिलक्यापाशी पडलेल्या मैचीवर त्यांनी आंग लोटून दिलं. पण शांतता मिळाली नाही त्यांना. त्यांचं विचारचक्र जोरानं फिरूं लागलं.

१९३१ च्या सत्याग्रहांत तुरुंगवास भोगून परत आल्यावर भाऊंना जगांत बरीच उलथापालथ झालेली दिसली. त्यांना उपजीविकेचं दुसरं साधन शोधणं भाग होतं. शिवाय अंगीकारलेली देशसेवा चालू ठेवण्याचीहि त्यांना आमना होती. सत्याग्रहानंतर रयतेंत उदासीनता फैलावली त्यामुळं आकस्मिक त्यागानं पुढारी बनलेल्या भाऊंना कोणतंच भरीव कार्य करतां येण्यासारखं नव्हतं. मिठाराम नी झिपरू हे पूर्वीपासून सावकारशाहीविरुद्ध शेतकऱ्यांना जागृत करण्यांत आस्तेकदम कार्य करीत असल्यामुळं सत्याग्रहानंतर त्यांची जनतेपासून फारकत व्हायचं कारणच नव्हतं. पण भाऊंच्या जीवनाला तसा पूर्वीचा भरभक्कम राजकीय पाया नव्हता. त्यांनी उपजीविकेचे अनेक मार्ग शोधून पाहिले शेवटीं चोपड्याच्या जगनशेटांच्या कृपेनं त्यांना गुमास्त्याची जागा मिळाली. त्यावेळेस झिपरूनं त्यांना एक पत्र लिहून त्यांचा निषेध केला होता. झिपरू खादीधारी वा शाकाहारी नव्हता, तरीपण मिठारामचं न् त्याचं राजकीय ध्येय निश्चित होतं. भाऊ संपूर्ण खादीधारी आणि अहिंसावादी बनले असून शेटसावकारांच्या पेढीवर गुमास्तेगिरी करायला निघाले. जगनशेटदेखील खादी-अहिंसेचे फार अभिमानी असून तालुका कँग्रेस कमिटीचे अध्यक्षहि होते. राष्ट्रीय चळवळींत मालक-मजूर, सावकार-शेतकरी या सर्वांना कार्य करायचा हक्क आहे अशी भाऊंची विचारसरणी. त्यावर मिठारामनं लिहिलं होतं. " भाऊ, तुम्ही ही फार मोठी चूक करीत आहां. भांडवलशाही अर्थकारणांतून

साम्राज्यशाही निर्माण होत असल्यामुळं साम्राज्यविरोधी चळवळ ही भांडवल-शाहीविरोधी असेल तरच तिला लोकशाहीचं स्वरूप येऊं शकतं. तुम्ही करीत असलेल्या गोष्टी आम्हांला अजिबात पसंत नाहीत. तुम्ही जगनशेटांना देशभक्त मानून प्रदक्षिणा घाला, आम्ही किसानसंघांची उभारणी करून रयतेची ताकद काँग्रेसमागं उभी करूं आणि या सावकारशाहीच्या बगळ्यांचा समाचार घेऊं. आम्हांला पिळणूक नष्ट करायची आहे. लोकशाहीची स्थापना करायची आहे. साम्राज्यशाहीचा आधारस्तंभ असलेल्या हिंदी भांडवलशहांना न् सावकारांना नेस्तनाबूद करायचा आमचा कार्यक्रम राहणार. देशभक्तीचीं खरीं मूल्यं विचारांत घेऊन हे कार्य होणं इष्ट आहे "

मिठारामचे त्यावेळचे हे उद्गार भाऊंना कधीच पटले नाहीत. जगन-शेटसारखे, खादीधारी नी तुरुंगात जाणारे सावकार त्यांना स्वतःइतकेच प्रामाणिक देशभक्त वाटत असत. हृदयपरिवर्तनानंच विषमता नष्ट होणार अशी त्यांची श्रद्धा असल्यामुळं जगनशेटांच्या पेढीवर गुमास्ता म्हणून राबून पुन्हा देश-भक्तीच्या गोष्टी करणं यांत त्यांना दोष दिसत नव्हता.

यावलभागांत मामलेदार म्हणून असतांना त्यांचं लक्ष्य भिल्ल-पावऱ्यांच्या दुर्दशेकडं वेधलं गेलं होतं. अवलोकनापलीकडं या बाबतींत ते कांहीच करूं शकले नव्हते. जगनशेटनी त्याना ती संधि प्राप्त करून दिली. जंगल सेटलमेंट मधील नी बाहेरील खेड्यांतील भिल्लपावऱ्यांची स्थिति सुधारण्यासाठी न् त्यांच्यात 'नीतिप्रसार' करण्यासाठी त्यांनी सेटलमेंटच्या हद्दीबाहेर मुलकी हद्दींत वैजा-पूरला भिल्लसेवामंडळाची स्थापना केली. जगनशेट, कन्हूशेट, हिरालालशेट, भुकनशेट, जेटमलशेट वगैरे बड्याबड्या खादीधारी देशभक्तांनी त्यांना पाठिंबा देऊन मंडळाच्या कार्यासाठी लागेल तितका पैसा पुरवण्याचं आश्वासन दिलं. तें त्यांनी कृतींत उतरवलं.

गुमास्त्याचं काम लगेच सोडून भाऊ भिल्लसेवामंडळाचे आचार्य बनले. पण त्यांचं भाऊ हेंच टोपणनांव चालू राहिलं. काँग्रेस मंत्रिमंडळ आल्यावर त्यांनी खटपट करून सेटलमेंटमधील गावांत खेडायला शेती मिळवली. जगन-

शेटच्या उभारीमुळें त्यांना पाटीलकी सुद्धा मिळाली. शेतकरी, पाटील आणि मंडळाचे आचार्य या तिन्ही नात्यांनी त्यांची भिल्ल-पावऱ्यांत नी इतर मागासलेल्या वर्गांत छाप वाढत होती.

मुंदऱ्या भिल्लाची पूर्वीची ओळख त्यांना या कामीं फार उपयुक्त ठरली. मुंदऱ्यानं भिवसन कुणबी, वजऱ्या भिल, झिंग्या भिल, जयसिंग पावऱ्या, भीमसिंग पावऱ्या, या खंबीर माणसांना भाऊंच्या विश्वासू मंडळींत आणून मंडळाचं काम जोरानं व्हायला मदत केली.

शेती किंवा हातमजुरी या धंद्यांत भिल्लांची गती अजिबात नसते; ढोरक्याचं काम, शेतीराखण आणि चोऱ्याचपाट्या हेच धंदे त्यांना परवडतात. एवढच आजवर भाऊंना दिसत होतं; परंतु त्याच्या या धंद्याचीं आणि स्वभावाचीं कारणं शोधायच्या भानगडींत ते पडले नव्हते. सामान्य गांधीवाद्याप्रमाणे 'वाईट प्रवृत्तींचा' निषेध नी 'चांगल्या प्रवृत्तीं'चा पुरस्कार एवढंच ते करीत आले भिल्लपावऱ्यांना साक्षर केलं पाहिजे; स्वच्छ कसं राहावं हे त्यांना शिकविलं पाहिजे; चोऱ्याचपाट्या करणं पाप आहे याची त्यांना जाणीव करून दिली पाहिजे; धर्म, सत्य, प्रामाणिकपणा, उदारता, प्रेम, या गोष्टींचा त्यांच्यांत उपदेश करून प्रसार केला पाहिजे; हें त्यांना पटत होतं. व्यापकदृष्टीनं सांगायचं म्हणजे, त्यांच्यांत नीतिप्रसार करायला ते उद्युक्त झाले होते. माणसांत ह्या 'नीती'चा प्रसार झाला म्हणजे जगांतली विषमता आणि दुखं नष्ट होतील अशी त्यांची खात्री होती. आश्चर्य हें की, या त्यांच्या 'नीतिप्रसारा'च्या कार्याला जगनशेठ, कन्हूशेटसारखे गरिबांच्या माना मुरगळणारे आणि देशभक्तीची टोपी घालून मिरवणारे सावकार उदार हातांनी आर्थिक मदत करींत होते!

आणि भाऊंना वाटायचं, पाहा, पिढ्यान्‌पिढ्या सावकारीपाशानं रयतेची नाडणूक करणारे हे सावकार देशप्रेमानं केवढे उदार झाले आहेत! निरक्षर, अडाणचोट नी भामटेगिरी करीत आलेल्या भिल्लांच्या सुधारणेसाठी हे केवढाल्या रकमा पाण्याप्रमाणे ओतीत आहेत! यांचा पूर्ण हृदयपालट होऊन श्रीमत—गरीब, मालक-मजूर, सावकार—कुणबी, यांच्यांत प्रेमाचे संबध निर्माण

झाले तर जगांत दुःख आणि विषमता हीं राहिलींत कुठं? गरिबांनी न् मजूरांनी श्रीमंत मालकांना आदरानं पाहावं नी श्रीमंत मालकांनी गरीब रयतेवर प्रेम करावं, उदारपणें त्यांच्या हिताची काळजी वाहावी,—बस्स! यापेक्षा रामराज्याची दुसरी कल्पना ती कोणती असणार? आजच्या दुनियेचीं दुःखं या सलोख्याच्या, बंधुप्रेमाच्या, अभावींच निर्माण झालेलीं आहेत. श्रीमत मालक गरीब रयतेला तुच्छ लेखतात, गरीब रयत श्रीमंत मालकांचा हेवा नी द्वेष करते; माझं-तुझं हा भेद बोकाळल्यामुळं सर्वत्र असंतुष्टता निर्माण झाली आहे. अशा या दुनियेंत बंधुप्रेमाच्या प्रसाराशिवाय गत्यंतर नाही. श्रीमंतांची श्रीमंती गरिबांना मिळाली, गरीब श्रीमत झाले, किंवा आर्थिक स्थिति सुधारली, तरी जगांत रंचना दिसणार नाही. जगांत स्वार्थी प्रवृत्ति शिरजोर झालेल्या आहेत; सात्विक भावनांचा लोप होत चालला आहे; कलह, द्वेष, असत्य, हिंसा, या प्रवृत्ति वाढत आहेत; श्रद्धा, निष्ठा, वगैरे दिव्य सद्गुणाचा ऱ्हास होत चालला आहे; यागोष्टी थांबवल्या पाहिजेत. बाह्य जगांत कितीहि उलथापालथ केली तरी कार्यभाग होणार नाही; मानवी मनांतच क्रांति केली पाहिजे, तिच्यानंच जगांत विश्वबंधुत्वाचा खराखुरा उदय होणार आहे.

भाऊंचं राष्ट्रकार्याचं एकंदर तत्वज्ञान हें अशा प्रकारचं होतं, तालुका कॉंग्रेस कमिटीचे अध्यक्ष जगनशेट यांच्या नी इतर 'देशभक्त' सावकारांच्या पैशाच्या बळावर त्यांनी भिल्लसेवामंडळाचा व्याप वाढवायला सुरुवात केली. आरंभी त्यांनी भिल्लांची भाषा पूर्णपणें आत्मसात् करायचा प्रयत्न केला. त्यांच्या झोपड्यांभोवती रानवांगीं, कुऱ्या, आघुरडा, देवळ्याचे वेल, निर्गुंड, या झुडपांची कचकण असे ती काढून टाकण्याच्या कामीं त्यांनी त्यांना प्रवृत्त करावं; पण पुन्हा कचकण कायम राही. एकदोनदा भाऊंनी स्वतां हातांनी दूर केली, पण उत्तरोत्तर भिल्लांना त्यांत स्वारस्य वाटत नाहीसं त्यांना दिसून आलं. त्यांनी साक्षरतेच्या प्रसारासाठी वर्ग उघडला. भिल्लांनी उत्तर दिलं, "जीभू, शिकीशी का नोकरी करानी स आम्हिन्ले? ज्यंगली राज्या सत आम्हू. आम्हिन्ले काय करनं स? येय बी स कोनले? ज्यगलमा ज्याव्वो, आरकळ-बरकळ खाई लेव्वो, आनि तन्नाई देव्वो. शिकाना उपेग स तुम्हिन्ले. × × ×. (जीभाऊ, शिकून का नोकरी करायची आहे आम्हांला? जंगली राजे आहोंत आम्ही. आम्हांला काय

करायचं ? वेळ तरी असतो कुणाला ? जंगलांत जावं, अरकड-बरकड खाऊन घ्यावं, आणि तणावून द्यावी, झालं, शिकायचा उपयोग तुम्हांला. ×××. )"

त्यावर भाविक मुद्रा करून भाऊ बोलूं लागत, ( अर्थात् भिलाऊ भाषेंत! )—"असं म्हणून कसं चालेल ? आपल्या देशावर इंग्रजांचं राज्य आहे. आपण अडाणी राहिलों म्हणून देश परक्यांच्या हातांत गेला. आपण शहाणे होवूं या, मग आपले आपणच राजे बनूं. त्यासाठी लिहितां वाचतां आलं पाहिजे. लिहिणारा माणूस ग्यानी होतो. तो लबाडी, चोरी करायला भितो. पापाला भितो अभिमानानं जगतो त्याला पापपुण्य कळतं, खरं-खोटं उमजतं. त्याची नीति सुधारते. त्याला कळूं लागतं कीं घाणेरडा राहूं नये. स्वच्छ राहावं. डबक्यांतलं, नाल्यांतलं पाणी पिवूं नये. गावांत घाण ठेवूं नये. तोंड धुवावं, आंग धुवावं, कपडे घालावे, शिव्या देऊं नये. आदरानं बोलावं. हें सगळं करायची बुद्धि त्याला होते. "

क्षणभर भाऊंच्या महात्मेपणाबद्दल—भिल्लांच्या भावनेंत सांगायचं म्हणजे, साधूपणाबद्दल—आश्चर्य व्यक्त करून ते सगळे सारं कांही विसरून जात. तेलकट कागदावर कितीहि लिहिलं तरी तो कोराच राहतो, तसाच प्रकार होई.

एकदा सकाळीं सहज हिंडत भाऊ जंगलांतून भिल्लांच्या वस्तीकडं गेले. एका खोपटाजवळ झाडाखालीच सगळं बिढार असून तिथंच पोवलाद नी त्याची बायको यांनी तोंड खाकरून घाण केलेली त्यांना दिसली. प्यायच्या पाण्याची घागरहि तिथंच होती. विशेष म्हणजे घागरीलाहि घाण लागलेली होती. त्यांनी त्या दोघांना खूप उपदेश केला. त्यांना वाटलं, आता या दोघांवर याचा चांगला परिणाम होईल. तोंच पोवलादनं जोरानं जागच्याजागींच शेंबूड शिंकरून हात पोटरीला पुसला ! भाऊनं दोन शब्द सुनावतांच तो म्हणाला, "स काय जीमू त्याम्हा ! बोलाले च्यांगलं स. आम्हना भिलटाना जलम स. लाहानपनपाईन ज्यंगलमा दिन ग्यात ( काय आहे जीभाऊ त्यांच्यांत ? बोलायला चांगलं आहे. आमचा भिलट्याचा जन्म. लहानपणापासून जंगलांत असेच दिवस गेले. ) "

उ.ड्या घागरीवर पाणी म्हणतात तें असं.

कधी कधी तर कांही भिल्लांच्या तोंडून बिगररानटी लोकांच्या स्वच्छते-बद्दल नी नाजूकपणाबद्दल उपहासाचे उद्गार भाऊंना ऐकायला मिळत. पण त्यांचं कार्य चालूच होत. कांग्रेस मत्रिमंडळाच्या आमदानींत (जंगल खातं राखीव असलं तरीसुद्धा ) त्यांना जंगल सेटलमेंटमध्ये चांगले स्थायिक होता आलं. शिवाय पाटीलकीचा लाभ झाल्यामुळ भिल्ल-पावरे नी कोळीकुणबी यांच्यावर त्यांचं वजन बसत होतं. देशभक्तीपेक्षा या दुसऱ्या वतनामुळंच त्यांचा प्रभाव वाढला होता. कॉंग्रेस मंत्रिमंडळानं युद्धविषयक वितुष्टामुळं राजीनामा दिल्यावर भाऊंच्या विरुद्ध रेंजर नी कारकून यांनी कारवाया सुरू केल्या. त्यांची पाटीलकी गेली, बंदुकीचा परवाना गेला. सेटलमेंट सोडून जावं लागेल म्हणून त्यांना या ना त्या कारणावरून दोन तीनदा इशारे मिळाले. भिल्लसेवामंडळ सेटलमेंटच्या हद्दींत नव्हतं. शिवाय सेटलमेंटच्या हद्दीबाहेर जायला पाटलाची परवानगी लागतं, बिगारीसाठी हजर राहावं लागतं. म्हणून भिल्लसेवामंडळाचं कार्य मंदावू लागलं. जगनशेटांनी जयराम नावाच्या एका कार्यकर्त्याला मंडळाचं काम सोपवून दिलं. भाऊहि सल्लामसलत देत होतेच.

या एवढ्या ' नीतिप्रसारा 'च्या व्यापांतच सावकारांविरुद्ध चिथावलेल्या मजुरांना उपदेशाचे डोस पाजायचं काम भाऊंकडं अनायासं आलं. १९३९ सालीं युद्ध सुरू झाल्यावर त्याच्या झळा बाहेरून हिंदुस्थानला लागू लागल्या तशाच आतूनहि. धान्याचे भाव वाढले, एवढंच नव्हे तर तें दुर्मिळ झालं. हंगाम चांगले येऊनहि खळयांतली मळणी संपते न संपते तोंच धान्य दुर्मिळ होई. खेड्यापाड्यांतील सगळं धान्य ' मोठ्या खटल्यांतले बाप्पा ' आणि चोपड्याचे सावकार, यांच्या घरीं गडप होऊं लागलं. कर्जापायीं स्वस्त भावांत मुबलक धान्य रयतेपासून घ्यावं; लगेच पोट भागवण्यासाठी रयतेला नू मजुरांना तेंच धान्य दुप्पटीच्या भावानं द्यावं; ते पैसे कर्जाऊ म्हणून दिढी-दुप्पटीच्या करारांत लिहून घ्यावे; औतफाटा, बीं-बिजवाड, कपडालत्ता, यासाठी रयतेनं पुन्हा कर्ज काढावं, पुन्हा हंगाम आल्यावर सगळं धान्य नी माल गटवून दुप्पट कर्ज शिल्लक दाखवावं नी पुढील गरजांसाठी रयतेला नवं कर्ज देतांनाच जमीनजुमला, घरंदारं, वगैरे खरेदी करून घ्यावं; असा सावकारांचा

धंदा जोरांत सुरू झाला. जगनशेट, कन्हूशेट, भुकनशेट, जेठमलशेट, हिरालालशेट, येंका बाप्पा, कवतिक नाना, हे बापजन्मीं नव्हते त्याच्या दसपटीनं गबर झाले.

या धंद्याखेरीज या बाप्पांना न् सावकारांना दुसरेहि धंदे युद्धकाळामुळं करायला फावल. सातपुड्यांतल्या भिल्लपावऱ्यांना देशावर चाललेल्या या 'तेजीच्या धंद्याची' अजिबात कल्पना नव्हती. ते परस्पराशी देवाणघेवाणीचे व्यवहार अगदी समान दर्ज्यावर करीत. देशावर धान्याचा भाव ६ सहा आण्याचा पाच रुपये झाला तरी ते कुणाहि गिऱ्हाइकाला फार तर आठ आणे भावानं ज्वारी विकीत. याच सुमाराला चलनवाढ झाली. धातूचीं नाणीं दुर्मिळ होऊन कागदी नोटांचा प्रसार झाला. पिढ्यान्‌पिढ्या सातपुड्याच्या रांगांत हयात काढणाऱ्या भिल्लपावऱ्यांना कागदी नोटा कःपदार्थ वाटल्या तर नवल काय? नाण्याखेरीज ते कांहीहि घेईनात. एक रुपयाचा नोट घेण्यापेक्षा बारा आण्यांचीं नाणीं घेणं त्यांना अधिक आवडणार! म्हणून गावोगांवचे बाप्पा आणि चोपड्याचे सावकार सुंदऱ्या भिल्लासारख्यांना हाताशी धरून सातपुड्यांतून आडमार्गानं ज्वारी मागवूं लागले. रोख नाणीं मिळाल्यास ज्वारी सहासात आणे भावानं द्यायला भिल्लपावरे तयार असत. सुंदऱ्यासारख्या मध्यस्थाकडून नऊदहा आणे भावांत सगळं धान्य गटवून बाप्पा आणि सावकार त्याचा चोपड्यांत नी चोपड्याबाहेर पाच ते सात रुपये भावानं काळा बाजार करीत. गुदामांत लपवलेलं स्वस्त दराचं कापड सातपुड्यांत नेऊन तिथं त्याचा काळाबाजार करण्यांतहि या कपटी लोकांना चांगलीच कमाई होत होती.

धान्याचा न् कापडाचा बेहद्द काळाबाजार, संसाराच्या गरजेच्या वस्तू पाचपट महागलेल्या नी दुर्मिळ, कर्जाचं दडपण वाढत चाललेलं, अशा वेळेस शेतमजूर नी वाऱ्यावर हिंडणारे भिल्ल हे टोळ्या करून डाके घालूं लागले. खेड्यापाड्यांतील सर्व चांदीसोन्याचे दागिने चोपड्याच्या सावकारांच्या कोठड्यांत येऊन गडप होत होते. पण टोळ्या करून डाके घालणाऱ्या या भुकेकंगाल भिल्लकोळयांना चांदीसोनं नको होतं, कारण चांदीनं चंदीची भूक भागवता येत नसते नी सोन्यासारखीं लेकरं सोन्यानं मढवून जगवतां येत नसताव.

पोटाची आग शमवण्यासाठी या टोळ्यांनी दरोडे घालावे नी धान्यच तेवढं लांबवावं, कपडेहि लांबवावे, असे अनेक प्रकार होऊं लागले. कन्हूशेटचं घर गल्लीच्या मध्यभागीं, चोपड्यांत; पण बाजूच्या सहा घरांच्या भिंती फोडून शेटजीच्या घरांत नी तिथून तळघरांत शिरून चोरांनी ज्वारी-गव्हाचीं साठ पोतीं लांबविलीं. देशभक्तीचा शेंदूर फासून पापं झाकणाऱ्या सावकारांनी पोटासाठी एवढी तोहमत पत्करणाऱ्या या धाडशी टोळ्यांना चोर म्हटलं, पोलिसांत वर्दी दिली. पण रयतेच्या पोटाला लागलेली आग मालवण्याची बुद्धि एकाहि 'देशभक्ता'ला झाली नाही.

डाके-दरोडे घालून कन्हूशेटचीं कोठारं भरणारा सुंदऱ्या भिल उकडलेले मोहू फांगेच्या भाजींत घालून खाऊन राहात होता! मोहूंच्या गरमाईन त्याची दोनदिवशी बायको एकाएकीं दुपावली नी त्या प्रसंगांत योग्य काळजीच्या अभावीं तिचा अंत झाला! सुंदऱ्याच्या अडाणी मनांत खोल खोल दडून राहिलेली स्वातंत्र्याची भावना उसळी मारून वर आली नी—भिल्लसेवामंडळावर कायमचा बोळा फिरण्याचा प्रसंग येऊन ठेपला.

बेचाळीसच्या दडपशाहीमुळं देशभर दंगलीचा धुमाकूळ उसळला तेव्हा काँग्रेसचे कार्यकर्ते म्हणून जगनशेट, हिरालालशेट, वगैरे लोकांना अटक झाली. देशभर जर्मनी-जपानला अनुकूल असलेल्या पंचमदळ्यांना सरकारी दडपशाहीचा फायदा घेऊन ब्रिटिशविरोधी भावनांना दंगलीचं नी मोडतोडीचं स्वरूप आणण्यांत यश आलं असलं तरी महागाई, कर्जबाजारीपणा, काळाबाजार, याखेरीज मातपुड्यांतील भिल्लपाड्यांच्या वसाहती नी लगतचा देशावरचा भाग यांत सगळीकड आलबेल होतं. भुकेकंगालांच्या धान्यदरोड्यांचा मात्र सुकाळ झाला होता.

याच सुमारास एक महत्वाची घटना घडून आली. जागतिक युद्धाचं फासिझमविरोधी स्वरूप नी फासिस्ट हुकूमशाहीच्या नाशासाठी आंतरराष्ट्रीय लोकशाही चळवळींनी कमरा कसून युद्धांत भाग घ्यायची आवश्यकता लक्ष्यांत घेऊन हिंदी कम्युनिस्ट पक्षानं सोवियेत रशियावर हल्ला होतांच साम्राज्यशाही

युद्धाचं फासिझमविरोधी युद्धांत पर्यवसान होतांच युद्धानुकूल भूमिका जाहीर केली. हिंदी कम्युनिस्ट पक्षावरील बंदी उठल्यामुळं त्यांतले कार्यकर्ते युद्धाच्या फासिझमविरोधी कार्यासाठी उत्पादनवाढ, निर्धोक दळणवळण नी राष्ट्रीय सरकारासाठी पुढाऱ्यांची सुटका. या कार्यक्रमाचा पुकार करीत दूरवर पसरले. देशांत बोकाळलेला धान्याचा न् कापडाचा काळाबाजार त्यांच्या कार्यातून निसटणं अशक्य होतं. काळ्या बाजाराविरुद्ध त्यांनी प्रचंड प्रचाराची मोहीम उभारली.

भांडवलशाही 'नीती'चा भाऊंचा उपदेश जिथं पालथ्या घागरीवरील पाण्याप्रमाणे निष्फळ टरला होता, तिथंच पोटाच्या हाकेला वाचा फोडणारे लाल बावट्याचे वीर जाऊन भिडतांच, शतकानुशतकं अज्ञानात खितपत पडलेले नी पिळले-भरडले जाणारे गोरगरीब कुणबी-कोळी, भिल्लपावरे, सगळे खडबडून जागे झाले.

भाऊंच्या दृष्टीनं सर्वांत मोठं आश्चर्य हं की, एकतीसच्या सत्याग्रहांत भाऊंना आदरार्ह वाटलेले श्रमवीर मिठाराम नी झिपरू हे या भागांत लाल-बावट्याचे खंदे कार्यकर्ते म्हणून वावरू लागले होते.

बंधुप्रेम, नम्रता, श्रद्धा, वगैरे नीतिगुणां'ची ज्यांना शिकवण देण्याचं कार्य आपण करीत आहोंत अशी भाऊंची 'प्रामाणिक' समजूत होती, त्या खेडुती कुणब्या-कोळ्यांत नी भिल्लपावऱ्यांत भिल्लसेवामंडळाचा प्रभाव होता नव्हता तो सगळा नष्ट होऊन किसानसभेच्या लाल झेंड्याखाली ते संघटित होऊं लागले होते; सावकारांना शिव्या देऊ लागले होते; झोपड्यांत, रस्त्यावर, नाल्यावर, झाडावर, शेतावर, सगळीकडं त्यांच्या तोंडीं किसानसभेचीं गाणीं बसलीं होतीं.

'सावकार पुंजीवादी,
जुलमी चिरडूं गादी,
यारे सारे अन्यायाला देऊं ठोकर—
धरतीचीं आम्हि लेकरं!'

हं आणि असलीं गाणीं त्यांच्या तोंडून ऐकून भाऊंना कळून चुकलं की या गरीब रयतेंत सावकार—जमिनदारांचा प्रखर द्वेष पसरत आहे. वर्गसलोख्याचं नी सर्वोदयाचं आपलं

स्वप्न वाऱ्यावर उडून चाललेलं त्यांना दिसत होतं. आणि रयतेला वर्गद्वेषाची शिकवण मिठाराम नी झिपरू यांच्या साथीदारांकडून दिली जात असल्याचं त्यांना स्पष्ट दिसून आलं. याच वेळेला राष्ट्रीय पुढारी तुरुंगांतून सुटून आले आणि कम्युनिस्टविरोधाची साथ मोठ्या प्रमाणावर उसळली. देशांतल्या राजकारणाचा सातपुड्याच्या दऱ्याखोऱ्यांत पडसाद उमटणं शक्य नव्हतं. जगापासून आणि राष्ट्रीय चळवळीपासून पूर्णपणें अलग पडलेल्या या भागांत लाल बावट्याचे श्रमवीर येऊन पोचले आणि गांजलेल्या रयतेची संघटना उभारूं लागले. तेव्हापासून रयतेच्या जीवनांत प्रचंड लाट उसळल्याचीं चिन्हं दिसूं लागलीं होतीं. 'कम्युनिस्ट—लाल बावटेवाले हे देशद्रोही आहेत, रशियाचे हस्तक आहेत' वगैरे थापांचे कारखाने देशभर फार तेजीनं चालले असूनहि चोपड्याभोवतालचा भाग सोडल्यास या प्रदेशांत त्या कारखान्यांतला तो नकली माल खपत नव्हता. आपल्या दुःखांना नी दुर्दशेला वाचा फोडण्याचं आणि आपणांला प्रतिकारासाठी धीट बनवण्याचं काम कोण करीत आहे हें रयतेला दिसत होतं. रयत त्यांच्यामागं जात होती.

आणि भाऊंचं मन उत्तरोत्तर व्यथित होत होतं. देशाचे पुढारी तुरुंगांत खितपत असतां स्वता माफी मागून बाहेर आलेले जगनशेट, राजरोस रयतेच्या मुंड्या मोडणारे कन्हूशेट, रयतेची शेती गडप करीत युद्धकाळामुळं ताजे होत आलेले अनेक बाप्पा, हे सगळे काँग्रेसचे आणि देशाचे 'पुढारी' बनले होते. कम्युनिस्टांना नी लाल बावट्याला शिव्या देणं हीच देशभक्तीची कसोटी ठरल्यामुळं पापाच्या राशी करणारे खादीधारी बगळे देशभक्त म्हणून मिरवूं लागून काळ्याबाजारांत मिळवलेल्या नफ्यांतून कम्युनिस्टांना न् लाल बावट्याला नेस्तनाबूद करण्यासाठी पैसा ओतीत होते. भाऊंना हाताशी धरून रयतेंत रुजत चाललेला लालबावटा उखडून काढण्यासाठी भिल्लसेवामंडळाचा ते उपयोग करीत होते.

भाऊंच्या डोळ्यांवर अंधश्रद्धेची नी अंध वर्गसलोख्याचीं झापड बसलेली होती. हे लालबावटेवाले रयतेंत स्थिर झाले तर आपण नी आपलं भिल्लसेवामंडळ यांची वाताहत होईल या शंकेनं ते अलीकडं बेचैन होऊं लागले होते.

गिलक्याजवळच्या मचीवर पडल्या-पडल्या भाऊंच्या डोक्यांत हेंच विचार घोळत होते. रात्र खूब लोटली होती. भाऊंना वाटलं, आपलं डोकं आता विचारांनी फुटून जाणार; त्यावर कुणी हातोडयानं घावच घालीत आहेत जणू. तो हातोडा—लालबावटा—

अस्वस्थपणे ते तापलेलं डोकं दाबून घरीत उठले नी घरांत आले. गोड्या तेलाचा दिवा शोधून ते लावूं लागले. पण तेलच वातीसह जळून गेल्याचं त्यांच्या लक्षांत आलं. युद्धकाळ त्यांना जाणवला. कन्हूशेटनं गुपचूप दिलेला घासलेटाचा टीप दोन दिवसांपूर्वीच संपला होता. आता चोपड्यास जातांच त्यांच्याकडे दुसरा मागायचा—हा विचार मनांत येतांच त्यांना त्या स्थितींतहि स्वताची लाज वाटली. रयतेचे नी आपल्या माहात्म्याचे प्रश्न फार वेगळे आहेत याची अस्पष्ट जाणीव त्यांना झाली, त्यांनी तेलवात घालून दिवा पेटवला आणि घरोटाजवळ सत्रंजी टाकून ते बसले. झोप येणं शक्यच नव्हतं. छप्पराच्या टोकराकडं त्यांचं लक्ष्य गेलं. टोकराच्या वेच्यांत कांही पत्रं नी चिठ्या खोवून दिल्या होत्या. अर्धवट उठून त्यांनी त्यांतली दोन पत्रं खाली ओढलीं. त्यावरचा खकाणा झटकला आणि ते वाचूं लागले. करमत नसलं म्हणजे जुनीं पत्रं वाचावीशीं वाटतात. पहिलं पत्र त्यांनी अक्षरावरूनच ओळखलं-जगन शेठनी पाठवलेली चिठी होती त्यांत.

"चोपडा, ता० ×× १९४५.

"रा. रा. रामभाऊ, 'भिल्लसेवामंडळाचे आचार्य, यांस अनेक जय-गोपाल. बालाजी कृपेंकरून आनंद आहे. तुम्हांस गेल्या रविवारी न भेटतांच परत जावं लागलं म्हणून गुमास्त्यांनी सांगितलं. मी जळगांवी महत्त्वाच्या कामासाठी गेलों होतों.

"आपले पूज्य कार्यकर्ते श्रीयुत पांडुरंग गुरूजी यांना त्यांच्या आज-वरच्या देश सेवेबद्दल कृतज्ञता म्हणून बारा हजार रुपयांची थैली अर्पण करायची होती. याबद्दल मागं तुम्हांला सांगितलं होतंच. खरं म्हटलं, तर जिल्हा कॉंग्रेस कमिटीचे अध्यक्ष श्रीयुत गोपीचंदन शेठ यांच्याविरूद्ध मीच नव्हे

तर बरेचसे देशभक्त पुढारी एक योजना आखीत होतो. व्यक्तिशः त्यांचा मी द्वेष करीत होतो किंवा आहे अशांतला भाग नाही; तथापि पुढारीपणांत खांदे-पालट होणं आवश्यक असतं, शिवाय मीं जिल्हा कमिटीचा अध्यक्ष व्हावं अशी बऱ्याच जणांची इच्छा आहे. येथील स्थानिक देशभक्त (तुम्हांला म्हणून सांगतो, याची वाच्यता करूं नका) माझ्या विरुद्ध आहेत. मी प्राईस कंट्रोल बोर्डाचा अध्यक्ष आहें, सरकारी अधिकारी कोणत्याहि बाबतींत सल्ल्यासाठी मला बोलावीत असतात, शिवाय काँग्रेस मधील आज कालचीं कम्युनिष्टांना अनुकूल असणारीं कांही माणसं काढून टाकणं इष्ट आहे हें माझं मत आहे. म्हणून या सर्व वजनाचा सदुपयोग करून श्रीयुत पांडुरंग गुरूजी यांना हात द्यायला मी उपयुक्त झालो. जिल्हा कमिटीचे अध्यक्ष माझ्याशी चांगले बोलले नसले तरी गुरूजींना थैली देण्याच्या योजनेवर त्यांचा प्रकट बहिष्कार नाही. आम्हीं सर्व व्यापारी नी धनिक वर्गातून हुकमी प्रेमानं हजार, पाचशे, दोनशे रुपयांच्या अशा रकमा मिळवल्या. व्यापारी वर्गापाशी पैसा भरपूर आहे, शिवाय धनिक वर्गाच्या पैशावाचून राष्ट्रीय चळवळ कशी चालवतां येईल? मात्र या रकमा देणाऱ्या व्यापाऱ्याचा प्रश्न एकच—"या बारा हजारांचा उपयोग कसा करणार?" आता, भाऊ, तुम्हांला का सांगायला पाहिजे! पांडुरंग गुरूजी हे त्या देशघातकी आणि वर्गद्वेषी कम्युनिस्टांशी सहकार्य करीत होते तोवर त्यांच्या बऱ्यावाईटाची पर्वा आम्हांला नव्हती. आतां ते आमच्यांत आले आहेत; कम्युनिस्ट म्हटला की त्यांच्या नसा थाडथाड उडूं लागतात. आता, तुम्हीच सांगा, अशा थोर राष्ट्र सेवकाला आम्हीं पोसूं नये तर कुणीं? त्यांना देण्यात येणारे पैसे लालबावट्या—विरूद्ध लढण्याच्या कामीं खर्च केले जाणार असं सांगतांच व्यापाऱ्यांनी भराभर रकमा दिल्या. आणि गुरूजींचा वेगळा का उद्देश आहे? कामगारांतून लालबावट्याल हाकलून लावून राष्ट्रीय कामगार संघांत असल्या कामगाराना ओढण्याच्या कामीं त्यांचे हे पैसे खर्च होणार आहेत. यासाठी ते तनमनाची खंत बाळग-णार नाहीत. वर्गसलोखा त्यांना हवा आहे. कुणालाहि तो हवासा वाटेल. हे लालबावटेवाले कामगार शेतकऱ्यांत वर्गद्वेष फैलावतात, रशियाची तळी उचलून धरून देशाचा घात करतात; यांना काँग्रेस मधून आता बाहेर पडावं

लागलं आहे. खानदेशांतून लालबावटा हाकलून देण्याच्या कामीं तुम्हीं आम्हीं एक झालं पाहिजे.

"हे लालबावटेवाले धूर्त आहेत. पांडुरंग गुरुजींना थैली अर्पण केली त्याच्या दुसऱ्याच दिवशीं त्यांनीं सभा घेऊन सांगितल की, "गुरुजींना मिळालेले पैसे जनतेनं दिलेले नसून भांडवलदारांनी दिलेले आहेत आणि लालबावटेवाल्यांचीं डोकीं फोडण्यासाठी त्यांचा उपयोग केला जाणार आहे" वगैरे वगैरे. दुसऱ्या दिवशीं आम्हीं सभा घेऊन त्या बेट्यांना अशा शिव्या हासडल्या म्हणतां! आता, त्यांनी सांगितलेलं तरी खोटं आहे असं थोडंच? त्यांचं मरण त्यांना कळलं एवढंच.

"भाऊ. तुम्हांला भिल्लसेवामंडळाच्या कामांत आजकाल जो व्यत्यय येत आहे त्याचं कारण तरी हे लालबावटेवालेच. अनेकदा तुम्हाला हेंच नाही का सांगितलेल? या लोकांचा एकदा रयतेंत पाय रोवला गेला की त्यांना हुसकावून लावणं शक्य नसतं. म्हणून म्हणतों, आतापासून जागृत राहून यांचा काटा काढण्याच्या उद्योगाला लागलं पाहिजे. कॉंग्रेसच्या मार्गातील हीं धोंड उपलब्ध अशा सर्व मार्गांनी दूर करण्यांत कसूर व्हायला नको. त्यांत पाप नाही किंवा अहिंसेचा भंग नाही. लाल बावटेवाल्यांपासून रयतेला वाचवण्याकरता पैसा, माणसं. लाठ्या, पोलीस, या सर्व प्रकारची सिद्धता करण्यासाठी आम्ही केव्हाहि तयार आहोंतच. तुम्हांला याहून धीर देणारी अशी दुसरी कोणती गोष्ट असणं शक्य आहे!

"भाऊ. मिठाराम आणि झिपरू नावाचे दोन लालबावटेवाले तुमच्या परिचयाचे आहेत असं ऐकतो. ते कधीं कधीं तुमच्याकडं येत असतात हेंहि मला समजलं आहे. तुम्हींच नव्हतं का सांगितलं? यांच्याशी कोणाहि कॉंग्रेस कार्यकर्त्यानं संबंध ठेवूं नये. अजून या भागांत त्यांचे पाय भक्कमपणें रोवले गेले नाहीत. लवकरच ते कांहीतरी चळवळ सुरू केल्याशिवाय राहणार नाहींत. त्यापूर्वीच त्यांचा काटा काढणं इष्ट आहे. तुम्ही त्याना फार सौजन्य दाखवू नका. कम्युनिस्टांचा नायनाट करणं हा कॉंग्रेसचा अधिकृत आदेश आहे.

पांडुरंगगुरुजींचा आदर्श डोळ्यांसमोर ठेवा. वर्किंग कमिटीचे मान्यवर सदस्य डॉ. पट्टाभी सीतारामय्या यांनी देखील " लाठ्या हाणून देखील कम्युनिस्टांचा नायनाट करा " असा आदेश दिलेला आहे. तेव्हां साशंक नसावं. लाल-बावट्यामागं जाणाऱ्या कुणब्याकोळ्यांना पैसे, प्रचार आणि दहशत यांपैकीं आवश्यक त्या मार्गांनी फोडलं पाहिजे. दुसरा मार्ग नाही.

" तुम्हांला मागील वेळेस लुगडीं आणि कापड द्यायला गुमास्त्यांना सांगून ठेवलं होतं. पण तुम्हीं एकच लुगडं स्वीकारलंत. खरं म्हणायला, कोळ्या-कुणब्यांत नी भिल्लपावऱ्यांत कार्य करण्याच्या दृष्टीने तुमचं दारिद्र्य सोयीचं असलं तरी आम्हांला तें बघवत नाहीं, तथापि तुम्हांला जें जें लागेल तें केव्हाहि द्यायला आम्ही तयारच आहोंत. तुमच्यासारख्या थोर कार्यकर्त्याची पात्रता आम्हांला कळते म्हणूनच श्रीमंती विसरून तुमच्या ठायीं शीर नम्र करवतं. आपण सगळे देशभक्त आहोंत. बाह्य परिस्थिति भिन्नभिन्न असली तरी प्रेमानं आपण एकच आहोंत. तुमच्या भिल्लसेवामंडळासाठी वाटेल तितका पैसा ओतायला सगळेजण तयार आहेत. विशेषतः पसरूं लागलेलं लालबाव-ट्याचं प्रस्थ नष्ट करण्याच्या कामीं तुम्हांला सर्व प्रकारचं साहाय्य करायला सगळे बद्धपरिकर आहोंत हें पुनरुक्ति करून सांगत आहें. कळावें.

आपला
**जगन शेठ**

"**ता० क०**—वीरवाड्याच्या धुडकू कोळयाची आणि इरभान माणिकची अदमासें एकूण पंधरा बिघे शेती आहे. ती जर पंचवीस रुपये बिघ्याप्रमाणे मिळत असेल तर साधून घ्यावं नी तसं कळवावं. त्या दोघांना पैशाची गरज आहे. शिवाय ती शेती त्यांनाच खेडायला देऊं. नाहीपक्षीं मागील कर्जाची भरपाई म्हणून जमी न्यावी लागेल. शेती मिळत असल्यास कर्जाचा नवा कागद करून घेऊं म्हणून सांगावं. धुडकूची मुलगी वारल्याचं कळतं, म्हणून तो भेटला नसावा. तरी सगळा तपशील कळवणं.

" सुंदऱ्या भिल ढोरं चारीत असतो असं कळतं. त्यानं जर घाटावरून किफायतशीर भावानं धान्यधुन्य आणून दिलं तर त्याला चांगला मोबदला देऊं. तसं त्याला सांगावं. पण बेटा लालबावट्याच्या नादीं लागला नसेल ना?

आपला
**जगन शेट "**

दुसरं पत्र झिपरूचं होतं. तें ओळखतांच पूर्वीच्या सगळ्या स्मृति भाऊच्या मनांत गर्दी करत्या झाल्या. राजकीय बिचारप्रणालीच्या भेदांतून भाऊ आणि झिपरू-मिठाराम यांच्या जीवनाला फाटे फोडणारा तो कमतवाडीचा प्रसंग त्यांच्यापुढं उभा राहिला. आजकाल ते इतरांप्रमाणेच कम्युनिस्टविरोधी राजकारणांत सामील झालेले असले तरी त्या दोघां श्रमवीरांची पात्रता त्यांना कळलेली होती. विशेषतः कार्यातला निरलसपणा,' संघटनेंतील चातुर्य, आत्मविश्वास वगैरे त्यांचे गुण आपल्या टायी अगदीच कमी प्रमाणांत असल्याचं भाऊ स्वताशी कबूल करीत. परंतु कॉँग्रेसमधील गांधीवादी गटाच्या अंधश्रद्धाळू परंपरेंत सापडल्यामुळ कॉँग्रेसच्या वरिष्ठ नी कनिष्ठ अशा सर्व " पुढाऱ्यां " नी अंगीकारलेल्या कम्युनिस्टविरोधी राजकारणाचा विचार करायचं त्यांना कारणच नव्हतं. त्यांची दृष्टी चोखंदळ नव्हती, झिपरू-मिठाराम हे राष्ट्रीय चळवळीचे डोळस सैनिक असं स्वःताला म्हणवीत. भाऊंना सैनिकी बाणा नी डोळसपणा या दोहोंचा समन्वय शक्य वाटायचा नाही. त्यांनी झिपरूचं पत्र घेऊन तें वाचायला सुरवात केली.

" जळगांव, दि. × × १९४५.

" परम पूज्य श्रीयुत भाऊ यांना अनेक सादर प्रणाम (लाल प्रणाम असं म्हटल्यानं कदाचित् आजकालचा फॅशनेबल कम्युनिस्टविरोध जागृत होऊन, देशभक्तानं सरकारी पदवी नाकारावी त्याप्रमाणं आपण आमचे प्रणामहि परत पाठवाल अशी भीति वाटल्यावरून पक्षाचा शिष्टाचार मोडून ' सादर प्रणाम ' असं लिहिलं आहे !)

"आपल्या मनाचा थोरपणा आणि इतर नफेबाज 'देशभक्तां' त दिसून येणाऱ्या स्वार्थी कुटिलत्वाचा आपल्या ठायीं असलेला अभाव, या दोन गोष्टींमुळेच अजूनहि आपला संबंध थोडा बहुत कायम राहिला आहे यांत शंका नाही. विशेषतः एका महान् राष्ट्रीय संस्थेचे वरिष्ठ नी दुय्यम पुढारी भाषणांतून आमच्या विरुद्ध शिमगा करीत असतांना नी 'चलाव लाठी' म्हणून आदेश देऊन राष्ट्रीय संघटनेला काळोखी फासत असतांना, आमच्याशी समक्ष किंवा पत्रद्वारें संबंध ठेवण्याची आवखात कुणाहि कार्यकर्त्याला झाली नसती पण आपण त्याला अपवाद आहांत ही समाधानाची गोष्ट आहे. प्रामाणिक देशसेवकांबद्दल, मतभेद असूनहि, आम्हांला नेहमीच आदर वाटतो.

"आपणांला लिहायच कारण दुहेरी आहे. आपणाबद्दलचं प्रेम मनांत असल्यामुळं आपण आमचे विरोधक असूनहि संघटनविषयक विचारविनिमय करावा असं वाटलं, शिवाय किसान सभेच्या कार्यालयांत आलेल्या एका तक्रारीशी आपला संबंध पोचतो, म्हणून लिहिणं अगत्याचं वाटलं.

"चोपडे तालुक्याला कर्ज निवारण कायदा लागू झालेला आहे हें आपणांला माहीतच आहे. त्याबाबतींत आम्ही कार्य करीत आहोंतच, काही महत्त्वाच्या मुद्याबाबत जिल्हा कार्यालयांतील कार्यकर्त्यांचा सल्ला घेण्यासाठी मी जळगांवीं आलों आहें. दोनचार दिवसांत परत येईन. वास्तविक शेतकऱ्यांचं कर्ज निवारायचं म्हणजे तें सगळंच्या सगळंच कायद्यानं रद्द झालं पाहिजे, इतक्या हलाखींत शेतकरी सापडले आहेत. परंतु वर्गसलोख्याचा पुरस्कार करणाऱ्या राष्ट्रीय सभेच्या मंत्रिमंडळानं त्या धर्तीवर हा कायदा करून ठेवला आहे. तदनुसार सरासरी चाळीस टक्के सूट शेतकऱ्याला मिळणार. पण यानंतर शेतकऱ्याला पैशासाठी सावकारांचेच उंबरठे झिजवावे लागतील याची काय वाट? शेतकऱ्यांना लागवडीसाठी पैसे देण्याची जबाबदारी सरकारनं स्वीकारली तर कर्जनिवारणाला कांही अर्थ राहील. पण तें शक्य नाहीं. तथापि शेतकऱ्यांच्या डोक्यावरील थोडा तरी भार हलका करण्याच्या दृष्टीनं या कायद्याचा फायदा घेण्याचं आम्हीं ठरवलं. गावोगाव किसानसभा स्थापन झालेल्या आहेत नी होत आहेत. या संघटनेमार्फत शेतकऱ्यांनी कर्जनिवारण कायद्याचा फायदा घ्यावा म्हणून शेतकऱ्यांचे अर्ज आम्ही गोळा करीत आहोंत.

"कायदा आधीच तुटपुंजा; तशांत आम्हांला देशद्रोही म्हणून लाञ्यांनी नी चाकूसुऱ्यांनी नामोहरण करूं पाहणारे नी देशभक्तीचा मक्ता स्वःतांकडंच असल्याचा बहाणा करणारे चटसारे 'देशभक्त' या कायद्याच्या अंमलबजावणीच्या बाबतींत डोळे मिटून बसले आहेत. कामकरी शेतकरी राज्याच्या घोषणा एकीकडं करायच्या आणि तुटपुज्या कर्जनिवारण कायद्याचा फायदा शेतकऱ्यांना मिळूं नये म्हणून धाकदपटशा करून शेतकऱ्यांना अर्ज करण्यापासून परावृत्त करायचं, हा आजच्या 'देशभक्त' सावकारांचा डाव पाहिला म्हणजे वाटतं की एवढी यातायात करण्यापेक्षा सरळ कर्ज वसुली विरूद्धच किसानांना उठवलं तर बरं होईल. पण त्यांतलं कांहीएक आज करायचा आमचा मानस नाही. सावकार नी आपण यांत कसलाहि कर्जाचा वांधा नाही असं शेतकऱ्यांना सांगायला लावून कर्जाच्या तडजोडीचे अर्ज करण्यांत व्यत्यय आणण हा चोपडयाच्या नी गावोगावच्या सावकारांचा डाव अपेक्षेप्रमाणे उधळला जात आहे. विरोधाला न जुमानतां शेतकरी किसानसभेकड अर्ज आणि तक्रारी आणीत आहेत. शेतकऱ्यांच्या हिताच्या या कामांत लक्ष्य घालून अबिरतपणें प्रचार नी कार्य करण्यांत लालबावट्याच्या कार्यकर्त्यांखेरीज दुसरं कुणीच नाही. भाऊं, आम्ही सैनिक असूनहि डोळस आहोत. कामकरीक्रांतीचं तत्त्वज्ञान एका हातांत घेऊन दुसऱ्या हातानं कामकरीशेतकऱ्यांची वर्गसंघटना बांधायच कार्य आमचंच आहे. वर्गसलोख्याचं तत्त्वज्ञान स्वप्नाळु मनाला कितिहि गोंडस वाटलं तरी वर्गविग्रहाच्या राजकारणावांचून कामकरी-शेतकरी राज्याची स्थापना होणं शक्य नाही. परकीय साम्राज्यशाही आणि स्वकीय सावकारभांडवलशाही या दोहोचं पूर्ण उच्चाटन केल्याशिवाय समतेचं स्वप्न प्रत्यक्षांत उतरणं कसं शक्य आहे? म्हणून कामकरी-शेतकऱ्यांचं राजकारण हें मालकशाहीच्या न् सावकार-जमीनदारशाहीच्या पूर्णपणें विरोधी असल्याखेरीज त्याच्यांत अर्थ उरणार नाही.

"एवढं सांगायचं कारण, वीरवाडयाच्या धुडकू कोळी नी हरभान माणिक या दोन्ही शेतकऱ्यांनी इतरांप्रमाणेच कर्जनिवारणासाठी अर्ज भरले असून जगनशेठनं त्यापूर्वी त्यांना पुष्कळ धाकदपटशा दाखवून त्यापासून परावृत्त करायचा प्रयत्न केला, हें होय. "आज कर्जनिवारण होणार, पण पुढं तुम्हाला

पैसे देणार कोण ? पाहून घेईन " या धमकीच्या भाषेनं बिचारे हवादिल झाले होते; पण किसानसभेचे ते सभासद बनले; त्यांनी ताबडतोब अर्ज भरले. लाल-बावट्याच्या किसानसभेवरील त्यांचा दुर्दम्य विश्वास पाहून सावकारांना नाहाप वाटला पाहिजे. जगनशेटनं आजवर भरमसाट रकम घशांत घालूनसुद्धा त्या दोघांवर बेसुमार कर्ज दाखवलं आहे. विशेषतः भाऊ, त्याची उरलेली जमीन गिळंकृत करायच्या जगनशेटच्या कुटिल डावांत आपणदेखील सामील झालांत या गोष्टीच आश्चर्य करावं की आपली कीव करावी हेंच समजत नाही. गरीब रयत आधीच दरिद्री; तशांत युद्धकाळांतील महागाईनं हवालदील झालेली; काळाबाजार नी नफेबाजी करणारे नी 'देशभक्त' म्हणून मिरवूं लागलेले धूर्त खादीधारी बगळे त्यांच्या मानगुटीवर अधिकाधिकच घट्ट पकड मारीत असलेले; असं असतां धुडकू नी इरभान या दोघांना त्यांची जमीन अगदी स्वस्तांत जगन-शेटला देऊन टाकायचा सल्ला आपण दिला आहे असं त्यांनी मोठ्या दुःखानं सांगितलं. एकेकाळीं त्यांना " गांधीबाप्पाचा अवतार " वाटणारे आपण आज अशा प्रकारचं जनताद्रोही राजकारण खेळूं लागलां आहांत ही गोष्ट भविष्य-काळांत आपल्यापुढं कोणतं नशीब वाढून ठेवणार आहे हें सांगणं कठीण नाही. भाऊ, आपण प्रवाहपतितांप्रमाणे या दूषित राजकारणाचा अवलंब करून रयतेपासून स्वताची फारकत करून घेत आहांत. भिल्लसेवामंडळाचा जर असा उपयोग होऊं लागला तर त्याच्या मागील आपल्या पवित्र भावनेला काय किंमत ? आपण आपल्या मातुश्रींनी नी वडिलांनी जमवून ठेवलेल्या पैशावर अगोदर हें मडळ उभं केल्याचं आम्हांला सांगितलं होतं, तें विसरलांत. मंडळाच्या स्थापनेचा इतिहास कितीहि उच्च भावनेनं झाला असला तरी आज त्याचीं आर्थिक नी राजकीय सूत्रं गबर सावकार नी जुलमी जमीनदार यांच्या हातीं आहेत. आपण त्यांचे केवळ सांगकाम्याचं काम करणारे हस्तक ठरलां आहांत. ही आपली भूमिका अत्यंत गर्हणीय नी शोचनीय असून तिच्यापायीं शेवटीं रयतेंत आपली खिर्डीच होणार यांत शंका नांही. धुडकू नी इरभान यांच्या आणि इतरहि शेतकऱ्यांच्या बाबतींत सावकारांच्या वतीनं आपण करीत असलेलीं मध्यस्थी हेंच सुचवते. कदाचित् आपल्या आदर्श " वर्गसलोख्या " चं हें उच्चतम प्रात्याक्षिक असेल !

" स्पष्ट सांगण्याचा राग मानूं नये. आम्ही आपले हितचिंतक आहोत. आपलेच, सावकारांचे नव्हत. रयत हीच आमची कॉंग्रेस. रयत हीच आमची माता. तिच्या हितांतच देशसेवा. तिचा द्रोह तोच देशद्रोह. अशीं आमचीं साधीं बाळबोध समीकरणं आहेत. तदनुसार आम्ही लालबावट्याचे किसान कार्यकर्ते कसल्याहि विरोधाची तमा न बाळगतां शेतकऱ्यांत कर्ज निवारणाचं नी इतरहि कार्य करायचं ठरवलं आहे. आपलं सच्छील, आपला त्याग, देशभक्ति, या सर्व गोष्टी जमेस धरूनहि आपल्या या चुकीच्या भूमिकेला या भागांत विरोध करायचं कटु कर्तव्य पार पाडावं लागेल आम्हांला.

" आपणांला एक अलीकडचंच उदाहरण देतों. श्रीयुत पांडुरंग गुरुजी यांना आपण ओळखतांच. त्यांचं आत्मिक बल, त्यांचा त्याग, सच्छील, देशहिताची कळकळ, या गोष्टींविषयीं कुणालाहि शंका नाही. आमचे ते विरोधक असूनसुद्धा आम्हीं त्यांचे हे गुण मान्य करतों. त्यांच्यापासून हेच गुण आम्हीं घेतले आहेत. ते आमचेहि राजकारणांतील गुरु आहेत. कामगार शेतकऱ्यांत संघटनाकार्य करायची दीक्षा आम्हीं त्यांच्यापासूनच घेतली असं का म्हणाना. पण एकेकाळीं कामगार शेतकऱ्यांचे लाडके पुढारी झालेले पांडुरंग गुरुजी आज कुठं आहेत ? आज त्यांना कामगार शेतकऱ्यांत स्थान नाही. त्यांचं नाव ऐकतांच खानदेशचा कामगार सनकेसरशी दांत ओठ खाऊं लागतो. राजकारणाची दिशा चुकली आणि पूर्वीचं रयतेंतलं स्थान अजिबात नष्ट झालं. कामगार शेतकऱ्यांत कम्युनिस्टांच्या खांद्याशी खांदा लावून लढणारे गुरुजी आज कम्युनिस्टविरोधी राजकारणाच्या भोवऱ्यांत सापडले. कामगारांनी संप केला की त्यांत गुरुजींना कम्युनिस्टांची चिथावणी दिसूं लागते नी ते संपाला विरोध करूं लागतात. शेतकऱ्यांनी चळवळ उभारली की तिच्यांत त्यांना कम्युनिस्टांचा राजकीय स्वार्थ दिसूं लागतो नी ते तिला विरोध करतात, लालबावट्याला शिव्या देत फूटपाड्या प्रतिस्पर्धी संघटनांना कवटाळूं लागतात. मालकशाहीच्या आहारीं जातात. " तिरंगी झेंडा हिंदुस्थानचा आहे पण लालबावटा अख्ख्या जगांतल्या कामकरी जनतेचा आहे " असं गर्जणारे एकेकाळचे गुरुजी यामुळच आज " तिरंगी झेंडा हा जनतेचा, लालबावटा हा रशियाचा " असं बरळूं लागले आहेत. उच्च भूमिकेवरून एकेक पायरी खाली येत त्यांचा आज

पूर्ण राजकीय अधःपात झाला आहे. कामकरी रयतेंतून ते सर्वांशीं फेकले गेले आहेत. आणि एवढं झाल्यावर त्यांच्या अंधश्रद्धाळू आणि हळव्या मनानं अशी सोयिस्कर समजूत करून घेतली आहे की कम्युनिस्टांनी त्यांच्यापासून रयतेला फोडलं म्हणून !

"परवा पांडुरंग गुरुजींना थैली अर्पण करण्यांत आली. "जनते"च्या नावानं दिलल्या या थैलींतली पै न् पै काळाबाजारवाल्या नफेबाज व्यापाऱ्यांकडून गोळा केलेली होती. शिवाय पैसे जमवण्यासाठी तरी जनतेंत जायची या "देशभक्तां"ची तयारी आहे कुठं ? अर्थात् व्यापाऱ्यांच्या इच्छेनुसार "लाल-बावट्याला नेस्तनाबूद करण्यासाठी" आणि गुरुजींच्या शब्दांत सांगायचं म्हणजे "काँग्रेसला विरोध करणाऱ्यांच्या नी देशद्रोह करणाऱ्यांच्या" "दमनासाठी" या पैशाचा विनियोग होणार ! भाऊ, राजकारण कसंहि असो, तें प्रकट तरी असावं. या दांभिक "देशभक्तां"नी थैलीऐवजी लाठ्या तरी गुरुजींना अर्पावयाच्या होत्या ! म्हणजे आमच्यावर त्या चालवायचा स्पष्ट आदेश तरी दिला गेला असता !

"पण लालबावटेवाल्यांचीं डोकीं फोडून त्यांचं तत्त्वज्ञान मारतां येत नसतं; रशियाचे हस्तक म्हटल्यानं त्यांच्या संघटना दडपून टाकल्या जात नाहीत; गुंडगिरीनं किंवा शिवीगाळीच्या शिमग्यानं विधायक राजकारणाशी स्पर्धा करतां येत नसते. अनुभवानं हें सर्वांना पटायचं आहे. तेच पांडुरंग गुरुजी आणि आपण आज कर्जनिवारण कायद्याचा प्रचार करण्यासाठी शेतकऱ्यांत हिंडलां असतां तर कामकरी शेतकरी राज्याच्या घोषणांना कांही अर्थ उरला असता. पण तें कार्य आमच्यासाठीच आहे. आम्हीच तें करून दाखवणार. भाऊ, पांडुरंग गुरुजीं प्रमाणे आपली शोचनीय अवस्था होऊं नये अशी माझी मनापासून आमना आहे. विचार करणं आपल्या स्वाधीन.

"ज्यांच्यापासून आम्हीं राजकारणाचे धडे गिरवले, त्यांच्याशी विरोधी भूमिका पत्करतांना आम्हांला यत्किंचितहि खंत वाटत नाही. कारण व्यक्तीपेक्षा चाळीस कोटींच्या जीवनाची किंमत अधिक आहे. आमचा पक्ष न्यायाचा आहे. निःपक्षपातीपणाचा बुरखा आमच्यापाशी नाही. आम्हीं रयतेचे पक्षपाती

आहोंत. भांडवलवाले, सावकार, नफेबाज, यांना आमच्याकडून दयेची किंवा "न्याया"ची अपेक्षा करतां येणार नाही. गांजलेल्या रयतेचा न्याय तोच आमचा न्याय. आम्हांला आदरणीय व्यक्तींना तोंड द्यावं लागलं तरी त्यांत आमचा निरुपाय आहे एवढंच. न्यायासाठी, सत्यासाठी आणि हक्कासाठी वीर अर्जुनानं आदरणीय अशा द्रोणाचार्यांशी दोन हात केले. तोच आदर्श आमच्या समोर आहे. विजय आमचाच आहे. कारण आम्ही रयतेंत आहोंत. रयतेंच्या आर्थिक लढ्यांशी आमचं राजकारण एकजीव झालेलं आहे.

"भाऊ, आपल्या भिल्लसेवामंडळानं मिंधेपणा सोडून अशा धर्तीच्या कार्यांत भाग घ्यावा असं आम्हाला वाटतं. तमाम कुणबी-कोळी नी भिल्लपावरे मार्गदर्शनाची वाट पाहात आहेत. किसान सभा त्यांच्यांत आत्मविश्वास उत्पन्न करून त्यांना स्वतांच्या पायांवर उभी करील. ही रयत उठल्याशिवाय खरं कामकऱ्यांचं राज्य जन्माला येणं शक्य नाही.

"आपले बिलंदर चिरंजीव नामू यांना अनेक उत्तम आशीर्वाद. आपल्या-पेक्षा नामूच लालबावट्याला अधिक उपयोगी पडेल असं दिसतं. वीरवाड्याला धोंडू चौधरींच्याकडं तो पंधरा दिवस होता. तेव्हा लालबावट्याची गाणीं त्याच्या मुखात बसलीं होतीं म्हटलं! कळावें.

आपला
कॉ. झिपरू कोळी."

---

## ४

शिलावे करून सत्तेच्या गुमींत रयतेला नाडणारे रेंजरसाहेब कुऱ्हाडबंद भिल्लपावऱ्यांच्या पहाऱ्यांत मुकाट्यानं जंगल चिरीत चालले होते. भोवताली गर्द झाडी आणि अंधारमुडुप रात्र, त्यामुळं दगडाधोंड्यांतून पाउंडं टाकतांना त्यांना ठेचाळल्यासारखं होत होतं. एका खोल थळावर आल्यावर ते सारे थांबले. भिल्लपावरे पाणी प्याले. " सायेब, पानी पेवानं स ? " असा सुंदऱ्याचा मिष्किल आवाज पाठीमागून येतांच साहेब चरकले. त्यांनी अवतीभोवती नजर टाकण्याचा प्रयत्न केला. " जामण्या पाणी " म्हणून प्रसिद्ध असलेली जागा ती हीच हें त्यांनी ओळखलं. कितितरी वेळां घोड्यावरून जातांना त्यांनी तो भाग पाहिला होता. तिथलं तें ठिकठिकाणीं साचून राहिलेलं पाणी, अधूनमधून लोळत पडलेले रानडुकर, पाण्यावरचं शेवाळ, डोक्यांवरल्या डंगावरचीं बिलबांदरं,—सगळा देखावा त्यांच्या डोळ्यांपुढून सरकून गेला. पण त्यावेळेस त्यांतलं कांही एक दिसणं शक्य नव्हतं. त्याच भागांत वाघांच्या नी बेंबटांच्या अडगळींतल्या घमा

त्यांनी अडपझडप पाहिल्या होत्या. येणाऱ्या-जाणाऱ्यांच्या पाचावर धारण बसवणारा थळ तो हाच. पण तिथलं पाणी पिण्याची कल्पनाच त्यांना कशीशी वाटली. बरोबरचे सगळे भिल्ल पावरे पाणी पिऊन ताजेतवाने झाले होते. साचलेलं शेवाळांतलं पाणी प्याल्यानं पान्थरी वाढते, रोग होतात,वगैरे तत्त्वज्ञान रेंजरसाहेबांच्या दृष्टीनं ठीक होतं. भिल्लांना त्याचं काय? मानसशास्त्र, आरोग्य-शास्त्र, वैद्यकशास्त्र, वगैरे बेसुमार पिकलेल्या शास्त्रांचीं फळं चाखण्याचा त्यांना हक्क नव्हता. पिढ्यान्‌पिढ्यां अज्ञानात नी जुलमांत पिचणाऱ्या त्या रयतेला जगांतली झाडून सगळी माणुसकी अज्ञात होती.

साहेबांची अडचण सुंदऱ्यानं ओळखली. तो बाजूला असलेल्या शेवडी-पाशी गेला नी आंतली रेती उपसून काढून साहेबांकरता पाणी निथळ करून त्यांना घेऊन गेला. साहेबांनी मौन स्वीकारलेलं होतं. ते मोठ्या कष्टानं पाणी प्यायला बसले. दोन पसा पाणी पिऊनहि त्यांची टीस भागली नाहीं. इथवर मुकाट्यानं जंगल चिरीत आलेले भिल्ल-पावरे आता आपापसात गप्पा गोष्टी करूं लागले. हेतु असा की, गप्पागोष्टींचा सासूल ऐकून वाघबीघ मार्गातून निघून जावेत.

टेकाडांच्या पायथ्यांशी उंचशा जागांवर लोधड्यांचे टाव बसले होते. सासूल येतांच त्यांची सळसळ होई. मधूनच एखादं तडसं ओरडे; त्यासरशी "× × × काय कोकास जिवान जंगलमा ( × × × काय ओरडतो जवान जंगलांत )!" म्हणून एक गोडशी गाळी देऊन ते हासतखिदळत पुढं जात. एकान रस्ता काढीत ते चालले होते.

लिसडी खोऱ्याची कचकन किती भेसूर. इकडून वाघ येतो का तिकडून लिसडी येते, अशा धाकधुकींत बरोबरच्या भिल्लांनामुद्धा साहेब विसरले घटकाभर आपलं आतां काय होणार या विचारानं त्यांना बेचैन केलं होतं. खोलाण सोडून ते जेव्हां चढण चढूं लागले तेव्हा भोवतालचे ते कडे नी मार्गा-वरच्या गाडरस्त्या सारख्या पुसट चक्र्या पाहून साहेबांना त्यांनी वाचलेल्या एक ग्रंथाची आठवण झाली. खानदेशचे माजी कलेक्टर सिम्‌कॉक्स् यांनी खानदेशांतील भिल्लांच्या पलटणीचा इतिहास लिहिलेला त्यांच्या वाचनांत आलेला होता. घाटाच्या याच भागांत औट्रमच्या शिपायांनी भिल्लांना काबूंत

आणण्यासाठी मोहिमा आखल्या होत्या. याच भागांत भिल्लांचा शेवटचा उठाव मोडून काढण्यांत आला होता. जुन्या सुनाट घाटाच्या वरच्या बाजूस थोड्या अंतरावर "आंब्या पाण्या"चा पडाव. त्याच पडावावर मेजर इव्हान्सच्या नेतृत्वाखालील तुकडीचा तळ होता. भिल्ल-पावरे गप्पा मारीत चालले असतां साहेब मात्र अर्धवट तंद्रींतच तो इतिहास उजळीत होते.

खानदेश हा अत्यत सुपीक प्रदेश. नवापूर या भागांत सगळ्या हिंदुस्थानांत उत्कृष्ट प्रतीचा तांदूळ होत असे असा तावर्नियर या फ्रेंच प्रवाश्याचा १७ व्या शतकांतला उल्लेख आहे. कुणबी, भिल्ल, गोंड हे इथले मूळचे रहिवाशी. सुपीकपणामुळं इथले लोक जात्याच सुस्त आणि एकटायी बनले. बाहेर जाऊन नशीब काढायची किंवा मर्दुमकी गाजवायची आकांक्षा कुणाच्याहि मनांत निर्माण झाली नाहीं. गवळी, हिंदु, मुसलमान, मराठे सरदार, वगैरे लोकांच्या ताब्यांत हा भाग असे. कुणींहि यावं खंडणीं वसूल करावी, हा प्रकार चालू राही विशेषतः सावकारीचा व्यवहार फार तेजींत होता. अंमळनेर हे ठिकाण इंग्रजी अंमलाच्या सुरवातीनंतरहि कांही दिवस अरब सावकारांचं केंद्र होतं. खंडणीनं न् लुटालुटीनं नाडल्या गेलेल्या रयतेला दिढी दुप्पटीच्या दरानं कर्ज देऊन दंडुक्याच्या जोरावर तें वसूल करावं हा त्यांचा व्यवसाय. पुष्कळ वेळां मुद्दलाच्या दहापट रकम वसूल करायचा परिपाट असे. रयत गांजली जाई, सातपुडा, सातमाळा, बागलाण, नवापूर, अशिरगड, वगैरे भागांतील भिल्ल हे गावराखणीचं किंवा पीकराखणीचं काम करीत. गावोगांव गावांचं रक्षण करणारे भिल्ल नाईक असत. जो गाव आपल्या पोटापाण्याची तरतूद करील त्याची राखण करावी हा भिल्लांचा पेशा असे. पण रयत कंगाल झाल्यावर लुटालुट आणि दरोडेखोरी शिवाय त्यांना धंदा उरला नाही. गावांवर, पिकांवर, यात्रांवर किंवा जंगलांतील वाटांवर, हल्ले करून लूट मिळवण्यासाठी भिल्लांच्या मोठमोठ्या टोळ्या असत. विशेषतः या टोळ्यांना मराठे आणि इतर सरदारांचा पाठिंबा असे. ठराविक रकम आणि संरक्षण देऊन त्यांना आपल्या हद्दीबाहेर पुंडाई करायला ते सांगत. या " हूड " वृत्तीचा बीमोड करण्यासाठी एल्फिन्स्तनच्या सूचने वरहुकूम भिल्ल पलटण तयार करण्याचं काम औट्रमकडे देण्यांत आलं. धरणगांवला मुख्य कचेरी उघडून औट्रमनं पलटणीचं कामकाज चालवलं.

शिकवून तयार केलेल्या भिल्ल शिपायांकडून जंगलांतील भिल्लांवर काबू मिळ-वण्यांत सरकारला यश मिळालं. सिम्कॉक्सनं म्हटल्याप्रमाणे, एक देखील ब्रिटिश मनुष्य हिंदुस्थानांत राहील तोपर्यंत औट्रम चिरंजीव राहिल, हें वाक्य रेंजरसाहेबांना पटलं होतं. ते स्वतः बाटलेले खिस्ती होते, त्यामुळं ब्रिटिश संस्कृति नी राजनीति यांचे ते पूजक बनले होते. त्यांच्या तीनचार पिढ्या खिस्ती धर्मांत गेल्या होत्या.

मूळचे ते भिल्ल जमातींतलेच होते. सुंदऱ्यासारख्या म्हाताऱ्या भिल्लाला थोबाडींत भडकवतांना साहेबांना रक्त आटवलं नाही वा शरम वाटली नाही. सातपुड्यांतल्या पाद्री लोकांना हरतऱ्हेची मदत करून शेकडो भिल्लांना खिस्ती धर्मांत जाण्यास त्यांनी प्रच्छन्नपणें हात भार लावला होता. जंगल सेटलमेंटचा हुकूमशहा या नात्यानं रामभाऊ किंवा मिठाराम-झिपरूसारख्या राजकीय कार्यकर्त्यांना आपल्या हद्दींत मना करूं शकणाऱ्या वर्गीस रेंजरसाहेबांनी खिस्ती पाद्र्यांना मात्र सेटलमेंटमध्ये कोणत्याहि व्यवहाराची मिरासदारी देऊन टाकली होती.

इंग्रज साम्राज्यशाहीनं एका जमातीचा "हूडपणा" कबजांत आणला असेल तर शेकडो जमातांचं आर्थिक शोषण करून देश बेचिराख केला या गोष्टीची जाणीव या अंध पाद्रीभक्ताला कुठून असणार? आणि धर्मान्तरानं भिल्लांची सुधारणा होत आहे असं अभिमानानं सांगणाऱ्या या सत्तेच्या आसु-डाला अलीकडे भिल्लांत होऊं लागलेल्या आर्थिक नी राजकीय जागृतीची मीमांसा कशी करतां येणार? इंग्रज सत्तेनं आणि धर्मान्तरानं जर भिल्लांना "सुधारलं" असेल तर आज प्रत्यक्ष रेंजरसाहेबांना पकडून नेणाऱ्या सुंद-ऱ्याच्या नी त्याच्या साथीदारांच्या "हूडपणा"चा अर्थ काय? त्याला जबाबदार कोण? भिल्लराऱ्यांच्याबद्दल स्वस्त समजुती करून घेणाऱ्या वर्गीस साहेबांना एक धडा मिळावयाचा होता. औट्रमच्या धाडसी मोहिमांची स्वप्नं पाहात ते चालले असतांच सगळ्या भिल्लांच्या अचानक थांबण्यानं ते भानावर आले. एका उंच बरडीच्या पायथ्याशी ते उभे होते. आपल्या स्थितीचा घटकाभर विसर पडल्यामुळं साहेब बोलून गेले, "काय आहे रे इथं टेकडी जवळ?"

" हाइ वघाळी माय स, सायेब. बळ्ळीना वरथे माता स ( ही वघाडी माय आहे, साहेब. वरडीवर आहे माता ). " धुडक्या भिल बोलला.

" वघाडी माय ? म्हणजे काय ? "

आणि लगेच्च साहेबांना आठवलं की हे वन्य जमातीचे लोक आहेत. वाघदेव, नागदेव, वघाडी, सटवाई, ह्या यांच्या देवता असणार. ह्या वघाडी मातेसमोर नवसाचा 'मान' देत असत. कोंबड्या वा बकऱ्या मारून मोटा उच्छाव करायचा नी गावठी दारूची शेरणी वाटायची. हें सगळं धुडक्यानं त्यांना समजावून सांगितलं.

पाटलाच्या घरांत आपण असतां घडलेला प्रकार नी आताचा हा प्रकार पाहून साहेबांना धीर आला. सगळे भिल्ल आता मनमोकळेपणानं बोलत होते. तेव्हा गोड बोलून ढोपर सोलतां आलं तर बरं होईल या विचारानं ते त्यांच्याशी बोलूं लागले. कांहीहि करून आफत टाळायची होती त्यांना. सत्ता ही भेकड असते. जितका भेकडपणा अधिक तितकी अधिक दडपशाही ती करते. पण एकदा का तिला चांगला बडगा दिसला की लगेच सरळ होते.

सुंदऱ्या आणि त्याचे साथीदार जरी लाठ्याकुऱ्हाडी घेऊन आले होते तरी त्यांना कसलाहि घातपात करायचा नव्हता. साहेबांनी स्वताला बाप शोभेल अशा वयोवृद्ध सुंदऱ्याच्या थोबाडींत भडकावल्यामुळं सुंदऱ्याचा स्वाभिमान जागृत झाला नी त्यांना योग्य तो धडा द्यायची त्यानं तयारी केली. शक्य तितक्या लवकर ती त्याला अमलांत आणायची होती.

पावऱ्यांचीं झोपडीं शेतावरच असतात. झोपडीजवळील कुत्र्याचा आवाज ऐकून आपण वस्तीजवळ आलों हें साहेबांनी ओळखलं. कुत्र्याचा आवाज ओळखून एका पावऱ्यानं त्याला " खंड्या " म्हणून साथ घातली. सगळे लवणाच्या बाजूला एका झाडाखाली जमा झाले. लाकडं गोळा करून धुडक्यानं त्यांची आगटी केली आणि जयसिंग पावऱ्यानं चकमक झाडून सगळ्यांच्या चिलमा पेटवल्या आगटीहि पेटली.

मोठ्या आवडीनं सगळे भिल्ल नी पावरे चिलमांचे झुरक्यावर झुरके घेऊं लागले. जगांतील सर्व चैनीच्या नी आरामाच्या वस्तु नी त्यांचीं शास्त्रं या

श्रमवीरांना माहूम नव्हतों. चिलीम हीच त्यांची शांतिदात्री. तीच स्फूर्ति देणारी. झुरके घेतांच हाडाडलेल्या मुद्रा हुशारल्या.

एका दगडावर त्या धगधगत्या प्रकाशांत होईल तें पाहात साहेब बसले होते. त्यांच्या केसालाहि कुणीं धक्का लावला नाही किंवा त्यांची बेइज्जत करण्याचा प्रयत्न केला नाही. खालीपिली शिलावा करणं हा भिल्लांचा मनोधर्म नसतो.

एक अत्यंत अश्लील लावणी, तिच्यांत फरक करून रेंजरसाहेबांना अनुलक्षून बहिऱ्या भिल गाऊं लागला—धुडक्या आणि जयसिंग त्याला साथ देऊं लागले—

आरे ज्यंगलना राजा, तुन्ह पिसळीमा काय स ?
रंजक सायेब स !
ज्यंगलना राजा, तुन्हा रंजक कोठे स ?
मुगा मुगा बठेल स !
रंजकना मनमा कायं निय्यं काय स ?
गुर्भींनं वारं स !
ज्यंगलना राजा, तुन्हा डोकावर काय स ?
धवया धवया बाल स.
रंचकना बाप राजा, कोन्हा माइक स ?
मन्हामाइक स.
द्दोबळी शेकानी त्याले भारी हाउस स.
रंजकले हाउस स.
आतेनी पर्ज्यो निभून नकारी स !
हारामखोरज स !
आरे ज्यंगलना राजा, तुन्ह आंडोरनं नांव स ?
रंजक सायेब स !
रंजक सायेबनी दसा बी काय स ?
दंबळीनी धूंद स !

आता धुडक्या गाऊं लागला आणि बहिऱ्या त्याला साथ घालूं लागला—

आरे रंजक सायेब, तुन्ह पिसळीमा काय स ?

हारामनी कमाई स.

आरे रंजक सायेब तुन्ह खिसामा काय स ?

लाचलुचपत स.

दंबळीना आधिकार—चिरिमिरी स.

रयेतनी कमाई स.

ज्यंगलना राजा तुन्ह बापना गुलाम स.

बिगारवाला स.

होबळी शेकाले तुल्हे सरमबिरम स ?

निर्नाम जायेल स.

कोन्ता भरान्तीमा रंजक सायेब स ?

× × ×"

ही शिवी ऐकतांच साहेबांनी थोडी हालचाल केली. तेव्हां सगळ्यांना स्वस्थ बसवून सुंदऱ्या पुढं आला आणि साहेबांना सवाल करता झाला.

"सायेब तुम्हले वाटत हुई की सुंदऱ्या जीवले दगा करी. पन ध्यानमा आसू देज्यात. हाइ भिलटानी पेहेळ स. इमान राखसूत ते धनीना करता जीव ववाई टाकसूत. पन आपेमान सइन कराना सरोदा नहि स आम्हले. आव्हळा धळा जाऊ पन कोन्हि गाई आयकी नहि. आन आज तुम्हनि मन्हा मोव्हाळामा दोनच्यार ठी दिन्हात, गयची धरी बुक्का मारात. आम्हु बिगारवाला मानसे. तुम्हि सांगशात ते करसूत. तुम्हनं थूक झेलसूत. पन बेइज्जत सइन नहि करसूत. बोलतस का, तोंड स का बोलाले? तुम्हना बाप जित्ता हुई ते मन्ह आव्हळी उंबर हुई त्यान्हि. तुम्हना डोयावरते धूंद चळहेल स. आधिकारना तोरामा रयेतले नाळी न्हायनात तुम्हु. कोफाईन जित्रारी ते कोफाईन मूंग, उळीद, गवत, उकायतस तुम्हू. × × × × आठे लोकस्ले खावानी मारामार स. दिनरात

पोऱ्हे भुक्या पळी ऱ्हातस. बायको बायतीन हुई ते तिल्हे मोहूनी भाकर खावाळनी पळस. आन मंग लेकरू बी मरस आन बायको बी दगावस. आरकळ-बरकळ खाईशी दिन काव्ही ऱ्हायनूत बट्ठा झने. मानूसले दाना नहि, ढोरले चारा नहि. आशि दसा स. आन रंजकसायेब मारे मजा करी ऱ्हायना ! वा रे वा न्याव ! आते तुम्हनाथीनबी मी शाहाना स. तुम्हना सम्दा कावा मालूम सत माल्हे. मी इच्यारस त्यान्हा जाब देना भाग स. वाकळं बोलानं काम नहि. नहि ते कुऱ्हाळबंद भिलटाना संगे गाट स. इच्यार करी ल्या मांघळला नं मोव्हरना. ( साहेब, तुम्हाला वाटत असेल की सुंदऱ्या जिवाला दगा करील म्हणून. पण लक्ष्यांत असू द्या की ही भिलस्याची पेहेड—प्रजा आहे. इमान असं राखू की धन्यासाठी जीव देखील ओवाळून टाकूं. पण अपमान सहन करायचा सराव नाही आम्हांला. एवढा म्हातारा झालों पण कुणाची शिवीसुद्धा ऐकून घेतली नाही आणि आज तुम्हीं माझ्या तोंडांत दोनचार ठेवून दिल्या, मानगुटी धरून धक्के मारले ! आम्ही बिगार करणारीं माणसं. तुम्ही सांगाल तें काम करूं. तुमची थुंकीसुद्धा झेलूं पण बेइज्जत झालेली मात्र सहन करणार नाही. बोलतां की नाही ? तोंड आहे ना बोलायला ? तुमचा बाप जिवंत असेल तर तो खात्रीनं माझ्या वयाचा असेल. तुमच्या डोळ्यांवर धुंदी चढलेली आहे. अधिकाराच्या तोऱ्यांत तुम्ही रयतेला नाडत आहांत. कुणापासून ज्वारी तर कुणापासून मूग, उडीद, गवत, उकळताहां. × × × इथं लोकांना अन्नाची मारामार आहे. रात्रंदिवस पोरं उपाशी पडलेलीं असतात. बायको बाळंतीण असली तर तिला मोव्हाची भाकर खाऊं घालावी लागते. मग लेकरू मरतं नी बायकोहि दगावते. आरकड-बरकड खाऊन दिवस काढीत आहोंत सगळेजण. माणसाला दाणा नाही, ढोराला चारा नाही अशी दशा आहे आमची. आणि रेंजरसाहेब मात्र आमच्या जिवावर चैन करताहेत ! वा रे वा न्याय ! आता तुमच्याहूनहि मी जास्त शहाणा झालों आहे. तुमचे सगळे कावे ठाऊक झाले आहेत मला. मी विचारीन त्या प्रश्नांचीं उत्तरं देणं भाग आहे तुम्हाला. वाकडीं उत्तरं देऊं नका. नाहीतर कुऱ्हाडबंद भिल-स्यांशी गाठ आहे. तेव्हा, मागचा-पुढचा नीट विचार करून घ्या. ) "—

नंतर सुंदऱ्यानं साहेबांच्याच खिशांतून डोकावणारी रोजनिशी ओढली नी तिच्यांत दोऱ्यान अडकवलेली पेन्सिल तोडांत घालून तो म्हणाला, " हं, तुम्हु

सांगज्यात, मी लिखस, × ×, तुरुंगमा लिखाले शिकनू तें आतें काम उनं. हाड्याचिळीरना पाय का हुई ना, लिखता ते येस. ( हं. तुम्ही सांगा, मी लिहितों. × ×, तुरुंगांत लिहायला शिकलों तें आता उपयोगांत येतं आहे. हाड्यांचिड्यांच्या पायासारखं का होईना, लिहितां तर येतं ! ) " आणि मोठ्या समाधानानं त्यानं साहेबांची घमेलीवजा टोपी आगटीसमोर ठेवून त्यावर रोज-निशींत लिहायची तयारी केली. सत्तेनं झिंगलेल्या त्या हुकूमशहाच्या पापांची जबानी नोंदण्यासाठी सुंदऱ्यासारखा दुसरा लायक न्यायाधीश मिळणं शक्य नाही. न्याय-अन्यायाचा निवाडा अशिक्षित रयतेलाच अचूक करतां येतो. प्रिव्ही कौन्सिलच्या मानकऱ्यानं देखील न ऐकलेले माणूसकीचे कायदे सुंदऱ्यासारख्या रयतेंतल्या जागृत श्रमवीराच्या तोंडून ऐकायला मिळूं शकले तर त्यांत नवल तें कोणतं ?

सुंदऱ्याच्या इशाऱ्यावरून दोन पावरे नी दोन भिल्ल साहेबांच्या बाजूंना येऊन उभे राहिले. साहेब भयानं टगरमगर पाहूं लागले.

" बोला सायेब, नईन खेतं पाळात ते ह्या पंधरासोया भिल-पावऱ्यासना आर्जं काय म्हनी दाबी धरात ? गरीबले ज्यमीन देवाना कायदा स. सम्दा बिगार कराले तयार व्हतात. ( बोला साहेब, नवीन शेतं ( जमीन तोडून ) पाडलीं तेव्हा ह्या पंधरासोळा भिल-पावऱ्यांचे अर्ज काय म्हणून तुम्हीं दाबून ठेवले ? गरिबाला जमीन द्यावी असा नियम आहे. सगळे जण करायला तयार होते. ) "—सुंदऱ्या, " खोटं बोलूं नकोस. कसले अर्ज नी कुणीं दाबून ठेवले ?" —साहेब, " वा रे वा न्याय ! खोट बोलूं नको म्हनतस. लाचलुचपत आन दाबादाबी करवो तुम्हनि. खरं सांगाले गऊ ते मन्हीस बांडी पळनी का ? बांडायकी कोन्ही स ? माफे पुरावा स ? ( वा रे वा न्याय ! खोट बोलूं नको म्हणे. लाचलुचपत नी दाबादाबी करावी तुम्हीं आणि खरं सांगायला जावं तर माझंच म्हणणं खोटं म्हणे. लबाडी कुणाची आहे ? माझ्या जवळ पुरावा आहे. ) " —सुंदऱ्या.

" येबी उंधायकी तापटीशी काय मिवाऊ स ? हानसू कुऱ्हाड ते देसू दोन तुकळा करी ! (×× उंधायकी तापटून काय मिळणार आहे ! कुऱ्हाड हाणीन तर देईन दोन तुकडे करून ! )"—धुडक्या.

“ देखी त्या साहेब, मान्हे का पयसा [illegible] बोलसू ? एक फलाटना तीनशे रुप्या ! चाईस फलोटेस्ना कितला भेटनात हुई पयसा ! बाप रे ! मन्हा ते डोया गरगर फिरतस नुसतं आयकावरी. ( पाहा साहेब, मला का पैसे थोडेच मिळणार आहेत तर मीं खोटं बोलावं ? एका शेताचे तीनशे रुपये ! चाळीस शेतांचे किती मिळाले असतील पैसे ! बापरे ! माझे तर डोळे गरगर फिरतात नुसतं ऐकून )” सुंदऱ्या “ बोलतस का ? लिन्हात ते लिन्हात. कबूलबी नहि करतस ? हाई देखं ? ( बोलतां का ? घेऊनच्या घेऊन कबूल सुद्धा नाही करत ? हें पाहिलंत का ? )”—बहिऱ्या.

दाटल्यानंतर साहेबांनी कबूल केलं की नव्यानं पाडण्यांत आलेल्या एका सेटलमेंटमधील शेतं सर्रास गरीब अर्जदारांना न देतां ज्यांना दुसरी शेती होती अशांना लाच घेऊन देण्यांत आली. जयसिंग पावऱ्याच्या साल्यापासून नेमाडी बैलांची एक नंब्री जोडी साहेबांनी उपटली हें तिथं सर्वांसमोर जयसिंगनं जाहीर केलं आणि साहेबांनी तें कबूल केलं.

शेतकऱ्यांना पुरेशी जमीन देण्यांत येत नाही. मिळालेल्या शेतांतील उत्पन्न नवराबायकोला देखील उपजीविकेस अपुरं पडतं. असं असूनहि प्रत्येक गावच्या प्रत्येक शेतकऱ्याकडून साहेबांनी ज्वारी, बाजरी, डाळ, कुळीथ, मूग मट, उडीद, वगैरे सगळ्या प्रकारचं धान्य फुकट नी तेंहि सक्तीनं उपटलं. युद्धकाळाचा फायदा घेऊन नफेबाजी करणाऱ्या जगनशेठच्या गोदामांत साहेबांनी तें पोचवलं. त्याबद्दल त्यांना सढळ हातानं किंमत मिळाली अशा धान्याचा हिशेब एकूण पंचवीस मापांपर्यंत गेला. सुंदऱ्यानं दहा बारा ओळींत तें लिहून काढून त्यावर रेंजरसाहेबांची सही घेतली. आणि दातओठ खात तो उद्गारला—“ तो जगनशेठ ? रयतनी रंघती पी न्हायना आन आथा भिलसेवाना करता रुप्या दी न्हायना ! रामभाऊ त्यास्ना बगलबच्चा. वारेवा देसभक्त ! गांधीबाप्पानी हाईस का शिकापन स ! ( तो जगनशेठ ? रयतेचं रक्त प्यायचं नी दुसऱ्या बाजूला भिल्लसेवामंडळाला पैसे पुरवायचे ! आणि ते रामभाऊ त्यांचेच बगलबच्चे. वारे वा देशभक्त ! गांधी बाप्पाची हीच का शिकवण आहे ? ) ”

"न्यान्झू ! देखी लेमूत त्या जगनशेटले बी. जाई कोठे ? (× × ! पाहून घेऊं त्या जगनशेठलासुद्धा. जाईल कुठं ? )"—बहिऱ्या.

भिल्लांच्या वस्तींत कोंडवाडा बांधण्यासाठी मुलकी खात्याकडून दोनशे साठ रुपये मिळाले. सगळ्या वस्तींतील भिल्ल उन्हातान्हांत पंधरावीस दिवस राबले. पण एकंदर सर्व पैसे साहेबांनी आपल्याच खिशांत घातले आणि भिल्लांचं काम बिगारींत गणून त्यांना उपाशीं ठेवलं सुंदऱ्याच्या बडग्यापुढं साहेबांना तेंहि कबूल करावं लागलं

थळावर बावडी बांधायच्या बाबतींतहि असाच प्रकार झालेला होता. जंगलाला लागलेली आग विझवणं, युद्धकार्यासाठी बराकींना नी पेटाऱ्यांना लागणारं सलईचं लांकूड वाहून नेणं, वगैरे कामं दरसाल उन्हाळाभर चालायचीं. त्याबद्दल सरकारांतून मजुरी मिळे ती साहेबांच्याच खिशांत राही. बिगारीच्या नावाखाली हीं कामं फुकट करून घेतली जात. पुष्कळदा कोऱ्या कागदावर कांही जणांची नावं लिहून त्यांवर त्यांचे आंगठे घेतले जात साहेबांची आज्ञा कशी मोडावी हा भिल्लांना पेच. खुद्द पाटलांच्या नी रामभाऊंच्या देखत हे प्रकार झालेले असूनहि कुणीहि भिल्लांना योग्य तो सल्ला दिला नव्हता. मजुरीबद्दल आलेले पैसे आपणांला मिळाले याबद्दलच्याच त्या सह्या असाव्या असा सुंदऱ्याला आता संशय येत होता. तो नुकताच तिकडं राहायला आलेला असल्यामुळं त्याच्या मागं हे प्रकार झालेले होते. मजुरी सर्वांना वेळोवेळीं वाटून दिलेली आहे असं साहेबांनी सांगतांच सगळे चवताळून उठले आणि झालेल्या प्रकाराबद्दल कायदेशीर दाद मागण्याची धमकी देऊं लागले. आपण सहीसलामत सुटणं शक्य नाही, कदाचित् इथंच आपला खुर्दा उडणार हें पाहून साहेबांनी कुरकुरत सर्व गोष्टी कबूल केल्या.

महागाई मी मी म्हणत असतांना सेटलमेंटच्या गावांना मिळणारं रॉकेलाचं नी साखरेचं राशन मध्येंच गडप करून पाटलांशी भागीदारी पत्करण्यांत साहेबांना पूर्ण मोकळीक सापडली होती.

कुणापासून सक्तीनं बोकड, कोंबड्या, गाय, म्हैस वगैरे घेतलं तें साहेबांनी कबूल केलं. हा सर्व खटला पाहून विशिष्ट हेतूस्तव पूर्वयोजना

आखून हा प्रकार चालला आहे हें साहेबांच्या लक्ष्यांत आलं. अगदी बारीक सारीक माहितीसुद्धा सुंदऱ्यानं विचारून घेतली.

पण साहेबांना आशा होती की, आपण इथून सुटतांक्षणींच अत्याचाराचा आरोप ठेवून या सर्वांवर तोहमत आणूं शकूं. पण सुंदऱ्यानं हें जाणूनच की काय सांगून टाकलं की पोलिस फिलीस असे छप्पन्न आपण पाहिले असून कुणालाहि दाद देणार नाही. एकंदर सर्व प्रकार एखाद्या धडाकेबाज बोलपटां-तल्याप्रमाणे चालला होता. सुनावणी झाल्यावर बहिऱ्यानं मध्येच टूम सोडली, "आने इतला गुन्हास्ले काय शिक्शा जोयजे ? ( आता, इतक्या गुन्ह्यांबद्दल कोणती शिक्षा द्यायला पाहिजे ? ) " त्यावर सुंदऱ्यान तुच्छतेचा कटाक्ष टाकून सांगितलं, "आरे शिक्शा शिक्शा कसानी स ? ज्यान्ह त्यान्ह करमवरी मरस जो तो. आपले काय करानं स ? ( अरे, शिक्षा शिक्षा कशाची घेऊन बसलांत ? जो तो आपापल्या कर्माप्रमाणे मरतो. आपल्याला काय करायचं ? )"

बिगारींत कोळी–कुणब्यांना नी भिल्ल-पावऱ्यांना नाडणारे आणि त्यांच्या कष्टांवर ताजे झालेले साहेब आता सुतासारखे सरळ होऊन गुडघ्यांत घोण घालून बसले होते. पूर ओसरल्यावर थडीवर राहिलेल्या गाळांत उतरण्याची माणसांची वा ढोरांची आवखात नसते, एकदम पाय फसायचा भेव वाटतो. पण एका आठवड्यानंतर त्याच्याच खपल्या उचडूं लागतात. ढोरं जाऊं लागलीं की तोच गाळ करकरा मोडूं लागतो. तशांतलीच गत ही.

आगटीभोंवती जमलेल्या त्या सर्व खेडुतांनी साहेबांच्या खिशांत गेलेले आपले निढळाच्या घामाचे पैसे परत मिळवायचा निर्धार बोलून दाखवला. एवढंच नव्हे तर उठल्यासुटल्या वाटेल त्या कामाची बिगार करणार नाही असं साहेबांना बजावलं. उन्हातान्हांत कोसगणतीं अंतर अनवणी तुडवून साहेबांच्या बंगल्यावर जावं, दिवसभर बंगल्याबाहेर ताटकळत उन्हांत उभं राहावं, माणसांना भाकर नाही, बैलांना चारा नाही, आणि रात्रीं थकूनभागून पुन्हा परत एवढं अंतर तुडवीत जावं, या गोष्टींचा त्यांना पुरा कंटाळा आलेला होता. सेटलमेंट सोडून एकदोन दिवस बाहेरगावीं जायलासुद्धा पाटलांची किंवा साहेबांची परवानगी

लागायची ! यापेक्षा तुरुंगांतली सक्तमजुरी बरी. " आयकं का सायेब, आज-पाईन ढोरहुमाला बंद. गईर बिगार बंद. कोन्हा गुलाम नहि सत आम्हु. आन जुलुम करशात ते आसा छप्पन रेंजक उळाई लावसूत. दिन पालटी ग्यात. आते कोई कुन्बी, भिल-पावऱ्या, समदा एक हुईशी न्याव लेती. सत कोन्ता भरान्तीमा ? लालबावटा खानदेसमा यी ग्या, थोळा दिनमा शेटलमेनमाबी लालबावटा यी. सुंदऱ्याना जाब स. शावकार वान्यानी आन आधिकारीनी सद्दी आते संपामा स, यादगिरी येस की इतला दिन डाखा पाळामा ग्यात पन लाल बावटानं काम नहि के. सप्पत लेस की लालबावटा हातमा लिशी मरसू. ( ऐकलं कां साहेब, आजपासून ढोरहुमाला बंद. गैर बिगार बंद. कुणाचे गुलाम नाही आहोंत आम्ही. आणि जुलूम कराल तर असे छप्पन रेंजर उडवून लावूं दिवस बदलले आहेत. आता कोळी-कुणबी, भिल्ल-पावरे एक होऊन न्याय मिळवतील आहांत कुठल्या भ्रांतींत ? लालबावटा खानदेशांत येऊन थडकला आहे. लवकरच सेटलमेंट मधेहि लालबावटा येईल. सुंदऱ्या बोलतो आहे. सावकार-वाण्यांची नी जुलमी नोकरशहांची सद्दी आता संपायची आहे. केवढं वाईट वाटतं मला कि डाकेदरोडे घालण्यांत हयात गेली आणि लालबावटयाचं काम हातून झालं नाही. लाल-बावटा हातांत घेऊन मरेन अशी शपथ घेतों. ) "

सुंदऱ्याचं हें वाख्यान ऐकून साहेबांनी तर डोळेच विस्फारले. आपणाला वाटते तितकी रयत आता दुधखुळी राहिलेली नाही; पिढ्यान्‌पिढ्या पिळणूक करणारे सावकारवाणी, जमीनदार आणि अरेराव नोकरशहा यांच्याविरुद्ध वाटणाऱ्या असंतोषाला अत्यंत तीव्र स्वरूप येत असून संघटनेच्या योगानं त्याला तोंड फुटायची वेळ आलेली आहे हें त्यांना समजायला हवं होतं; पण वर्गसलोख्याच्या भ्रामक विचारावर अंधश्रद्धा ठेवणाऱ्या नी पर्यायानं पिळणूक करणाऱ्या वर्गाच्या हातांतलं बाहुलं बनलेल्या रामभाऊंच्या जसं तें लक्षांत आलेलं नव्हतं, तसंच सत्ता आणि स्वार्थ हीं आयुष्याच्या नदीचीं दोन्ही तीरं मानून अरेरावी गाजवण्यांत पुरुषार्थ मानणाऱ्या निर्बुद्ध साहेबांनाहि तें कळत नव्हतं.

तुरूंगाबाहेर येतांनाच सुंदऱ्यांत मोठा बदल झालेला होता. विशेषतः मिठाराम आणि झिपरू याच्याशी संबंध आल्यावेळेपासून त्याला आपल्या

पिळणुकीची फार तीव्र जाणीव झाली होती. पोट भरण्यासाठी तो ढोरं चारीत होता. वीरवाडं, आडगांव, वडती, अडावद, यावल, चोपडा, वगैरे भागांत किसान सभेचे कार्यक्रम त्यानं पाहिले होते. तमाम शेतकरी किसानसभेच्या लाल-बावट्याखाली संघटना उभारीत असतां सुंदऱ्या नी त्याचे जातभाई यांच्यावर त्या गोष्टीचा थोडातरी परिणाम होणं साहजिक होतं. असंच कांहीतरी भिल्लांत-सुद्धां व्हावं असं सुदऱ्याला वाटूं लागलं होतं. मिठारामशी बोलण्याचे जे कांही प्रसंग आले होते त्यांच्यामुळं त्याच्या या जागृतीला निश्चित वळण लागण्याची लक्षणं दिसूं लागलीं होतीं. रेंजरसाहेबांवरील दुर्धर प्रसंग याचाच द्योतक होता. वास्तविक अशा रीतीनं साहेबांना पकडून नेणं हें मिटाराममला किंवा कुणाहि लाल बावट्याच्या कार्यकर्त्याला पसंत झालं नसत. पण एकतर सुंदऱ्या नी त्याचे जातभाई यांच्यांत लालबावट्याची संघटना रुजली नव्हती. जागृत परंतु मार्ग-दर्शनाची उणीव असलेले असे ते असल्यामुळं झाला तसे प्रकार होणं अपरिहार्य होतं. तरीहि साहेबांना थोडासुद्धा दगा न देतां त्यांना हळूच डोळे बांधून आंब्या-पाण्यावर नेऊन सोडण्याचा नी आपण नष्यात व्हायचा मनसुबा सुंदऱ्याच्या साथीदारांनी तडीस नेला.

खोदरीच्या बाजूला तशा स्थितींत उभे राहून साहेब इकडं तिकडं रस्ता धुंडाळण्याचा विचार करीत आहेत तोंच कांही अंतरावर माणसांचा घेघाट झाला. केकाट्या ऐकूं येऊं लागल्या. काय झालं आहे याचा विचार करण्या-पूर्वीच बलम घेऊन दौडणारे भिल्ल साहेबांच्या बाजून पिसाटासारखे जातांना त्यांना दिसले. तशा काट्याकुट्यांच्या नी झाडीच्या ढासणींतूनहि ते धावत होते.

आणि कांही बायांचं रडणं त्यांच्या कानांवर आलं. "व माळी, मन्हं लेकरूं लई ग्या तो खळ्या ! मन्हं लेकरू व माय ! ( अगाई ग ! माझं लेकरू पळवून नेलं त्या खड्या वाघानं ! माझं लेकरू ग आई ! ) " आपल्या विरूद्ध कांही-एक हालचाल नाही हें लक्ष्यांत येऊन साहेब ढासणींतून मार्ग काढीत नी व्हकारा देत पुढं आले. कांही भिल्ल त्यांच्याकडं आले. बाकीचे दौडत गेलेले परत येत होते.

वाघानं केकाट्यांनी भेदरून तोंडांतलं मूल तसंच टाकून दिलं होतं. पण त्याचा जीव निघून गेला होता. मोठ्या कष्टांनी भिल्लांना तें मिळाल. पांड्या भिल तें लेकरूं घेऊन आला. आता सर्वांच लक्ष्य साहेबांच्याकडं वळल. भलत्या रात्रीं त्यांना तिथं आलेले पाहून कुणाला अचंबा वाटला नाहीं, कारण जंगल खात्याचे ते अधिकारी होते. अचंबा एवढाच की बंदूक आणि घोडा न घेतां ते आलेले होते ! पण झालेली फजिती सांगण्यांत साहेबाचीच नालायकी प्रदर्शित होणार होती. चोरड्याला पोलिसांना कळवून सुंदऱ्याला न त्याच्या साथीदारांना बडगा दाखवणं त्यांना कठीण नव्हतं. पण या प्रकरणांतून आपली अनेक कुलंगडीं वर येतील आणि मग नोकरीला, त्याचप्रमाणे अब्रूला मुकाव लागणार या विचारानं त्यांनी झालेला प्रकार गुप्त राखण्याच ठरवल. चोपड्यास पोचतांच कसल्याशा सबबीवर रजेचा किंवा बदलीचा अर्ज करावयाचा विचारहि त्यांनी मनाशी करून टाकला.

घोडा आणि बंदूक पुढं पाठवून आपण जवळच कांहीं खिस्ती पाद्र्यांच्या तळावर मुक्काम ठोकला होता असं साहेबानी या भिल्लाना सांगून टाकल आणि रात्र उलटल्यामुळ हळुहळू सेयाण्या वेळेस जायला निघालों होतों, तोंच हा घेघाट एकूं आला, या त्यांच्या बतावणीवर त्यांचा विश्वास बसला पण एवढी विचारपूस झाल्यावर दोन भिल्ल साहेबापाशी बोलत उभे राहून बाकीचे खड्या वाघाच्या तोंडातून सोडवून आणलेल्या तान्ह्या मुलाची व्यवस्था करायला लागले. बायकांच्या गलबल्यांत मुलाची आई--झडी भिलीण--हिचा आक्रान्त फार मोठ्यानं ऐकूं येत होता.

याच वेळेस रामप्रहरच्या थंड वाऱ्याचं सुख अनुभवीत पोवलाद भिल्लाच्या बाजूला गोणत्यावर पडल्या-पडल्या, वैजापुरात मिटाराम गेल्या दोन दिवसांतल्या गोष्टींचा विचार करीत होता.

× × × ×

पावऱ्यांच्या " भोंगऱ्या बाजारा'ची ऐकीव माहिती मिटारामला होती. हा बाजार प्रत्यक्ष पहावा ही त्याची फार वर्षांपासूनची आमना. पण संघटनेच्या

कामामुळं त्याला ती संधि मिळाली नव्हती. किसान सभेच्या कार्याला जोडोन म्हणून सातपुड्यांतल्या खानदेशी भिल्ल-पावऱ्यांच्या आर्थिक नी सामाजिक परिस्थितीची सूक्ष्म पाहणी करून तिची नोंद तयार करण्यासाठीं तो वर आलेला होता. ही नोंद तयार झाल्यावर भिल्लांचा नी त्यांच्या वस्तीतील इतर खेडुतांचा प्रश्न हातीं घ्यायचा विचार नी त्याची दिशा ठरवण्याचं काम कांही प्रमुख किसान कार्यकर्ते करणार होते. पोवलाद भिल संगतीं घेऊन सिटाराम भोंगऱ्या बाजार पाहायला आलेला होता.

पावऱ्यांच्या जमातींत मुलांमुलींना लग्नाचं स्वातंत्र्य असतं. कांहींचीं मनं अगोदरच जुळलेलीं असतात तर काही भोंगऱ्या बाजारांत हिंडून परस्परांची निवड करतात. बाजार उठायच्या म्हणजे संध्याकाळच्या वेळेस आपापल्या निवडीच्या मुलींना हात धरून पकडून न्यायची शिकस्त वराकडून होते. अशा "पराक्रमा" नं वधूला पळवून नेल्यावर एक महिनाभर वधू वराच्या घरीं राहते. तिथलं वातावरण पसंत पडलं तर वधू लग्नास तयार होते नी नंतर लग्न होतं. असा हा रिवाज आहे. विवाह स्वातंत्र्याच्या बाबतींत पाश्चात्य समाजालाहि मागं टाकणारा हा रिवाज पाहून सिटारामला कमालीचं कौतुक वाटलं. पोवलाद नी डोंगऱ्या भिल त्याला सर्व माहिती देत होते गावोगांव महिना पधरा दिवस हे बाजार भरवण्यांत येत असतात.

पूर्वीच्या स्वयंवराच्या पद्धतीचीच ही पुष्कळशी सुधारलेली आवृत्ति आहे यांत शंका नाहीं. बाजाराच्या दिवशीं प्रत्येक शेतावरल्या झोपडीबाहेर दिसणारे पावरे ऐपतीप्रमाणे चांगले पोषाख घालून तयार झाले होते. ज्यांना वधू मिळवायला जायचं होतं ते सगळे तरुण ऐटबाज पोषाखांत दिसत होते. प्रत्येकाच्या कानांत कुडक्या, कुडत्याला चांदीच्या साखळीसह गुंड्या, कमरेला छानसा शेला, हातांत नखरेबाज पुन्हाण्याची काठी. कमरेला बांधलल्या शेल्याचा सोगा पुढं लोंबकळत ठेवलेला. मांड्या पीळदार नी आकर्षक.

भोंगऱ्या बाजाराच्या दिशेनं निघालेल्या गावोगावच्या गाड्यांचा देखावा किती मनोवेधक! चित्रविचित्र नी रंगीबेरंगी घागरे नेसलेल्या स्त्रिया नी

गाड्यांसमवेत चालणारे ऐटबाज पुरुष. प्रत्येक गावच्या गाड्यांचा स्वतंत्र मेळावा दिसे. प्रत्येक गावचा मोठासा ढोल गावांतल्या प्रमुखशा इसमाच्या गाड्यावर ठेवलेला दिसायचा. जितका ढोल मोठा, तितका त्या गावच्या त्या इसमाचा रुबाव नी दर्जा मोठा समजण्यांत येतो. बाजाराच्या दिशेन हा सगळा मेळावा चालला होता. मोठी जत्राच जमली त्या ठिकाणीं.

दुपारीं अकरा-बारा वाजण्याच्या सुमारास बाजारांत ढोल वाजूं लागले. ज्या त्या गावचा मोर्चा वेगवेगळ्या बाजूस असायचा हें ठरलेलं. वधू शोधणाऱ्या मुलांत दहा वर्षांपासून तीसपस्तीस वर्षांपर्यंत सर्व वयाचे दिसत होते. हातांतली काठी ऐटीनं हालवीत ढोलाच्या तालावर सर्वजण नाचत होते. नाचतांना जवळपास वावरणाऱ्या मुलींतून पसंत असलेल्या मुलींकडं साभिप्राय बघण, हासणं, असे प्रकार चालत. मुलीहि आपणास पसंत असलेल्या मुलावर पाळत ठेवीत फिरत आणि बाजाराच्या गर्दीत रुधि साधून इष्ट वराचा मुखडा गुलालीनं माखून हास्यविनोद करायची संधि साधत. अशा वेळेस त्यांनीहि उलट मुलांना खेसर करून हासवावं. ज्या मुलींना वर शोधायचे असत त्यांनी चेहऱ्यावर घुंगूट घ्यायचा नाही. म्हाताऱ्या नी लग्न झालेल्या बायकांनी घुंगूट घेऊन फिरायची प्रथा असल्यामुळं घोटाळा व्हायचा संभव नसतो. दिवसभर ढोल वाजवीत, नाचत नी असल्या लपडावात भाग घेत मिरवणाऱ्या पुरुष मंडळींला मनमुराद दारू पितांना मिठारामनं पाहिलं तेव्हा तर त्याला आश्चर्याचा धक्काच बसला. एवढ्या प्रमाणावर दारू पिण्याचे प्रसंग त्यानं कधींच पाहिले नव्हते. शिवाय या ठिकाणीं दारू पिणं हा लग्नासारख्या सामाजिक नी सांस्कृतिक विधीचा आवश्यक भाग होऊन बसलेला. भिल्ल-पावऱ्यांच्या प्रश्नांत याहि प्रश्नाचा विचार अवश्य कर्तव्य म्हणून त्यानं त्याची नोंद करून घेतली. ढोल वाजवीत जाणाऱ्या मिरवणुकीच्या अग्रभागी उंच काठीवर मनुष्याकृति असून तिच्यावरील शिस्न नाचणाऱ्याच्या हालचालींबरोबर दोरीनं सारखं वरखाली हालत राहून लग्नासाठी जमलेल्या मुलांमुलींच्या मनांत लैंगिक विचार प्रदीप्त करण्यास कारणीभूत होत होत. लग्न हा केवळ लैंगिक करार आहे या प्राचीन भावनेचा हा अवशेष या जमातींत शिल्लक राहिला असावा असं मिठारामला वाटलं. नाहीतर सुधारलेले म्हणवणारे आपण लग्न या विधीला गोंडस स्वरूप देत देत त्याच्या मूलभूत

लैंगिक हेतूंपासून नी स्वरूपापासून इतके दूर गेलों आहोंत की लग्नसंस्था ही केवळ शाद्बिक ढोंगबाजी होऊन बसली आहे. लग्नाचे मूलभूत नैसर्गिक उद्देश नी स्वरूप विवाही जोडप्यापासून लपवून ठेवण्यामुळं लैंगिक बाबतींतलं अज्ञान, संततीबद्दलच्या कर्तव्याची नेणीव, दांपत्यसुखाच्या मर्माचं अज्ञान, प्रपंचाच्या इतिकर्तव्यापासून पराङ्मुखता, इत्यादि कटु फळ आपणांला चाखावीं लागतात आणि त्यांचा एकंदरींत समाजस्थैर्यावर अनिष्ट परिणाम होतो. भोंगऱ्या बाजारांतील मुलांमुलींच्या वयोमानाबद्दल बेफिकिरी, दारुपिण, वगैरे गोष्टी मिठारामला जरी आवडल्या नाहीत तरी त्याची ही दुसरी बाजू त्याला विशेष विचार करण्यासारखी वाटली....वन्य जमाती हीं लहानलहान राष्ट्रं आहेत नी त्याच तत्त्वावर त्यांची प्रगति होणं इष्ट आहे या गोष्टीची जाणीव त्याला झाली. भाषा, समाज, संस्कृति, रीतिरिवाज, वगैरे बाबतींतील वैशिष्ट्य हेंच राष्ट्रीयत्वाचं लक्षण त्याला मान्य असल्यामुळ पिढ्यान्‌पिढ्या मागासलेल्या स्थितींत राहिलेल्या भिल्ल-पावऱ्याची सुधारणा नुसत्या दयेच्या किंवा उपदेशाच्या मलमपट्ट्यानी होणं शक्य नाही हं त्याला कळून चुकलं. त्यांच्या प्रगतीसाठी त्याना स्वतंत्र राजकीय स्थान प्राप्त झालं पाहिजे चाळीस कोटींच्या स्वातंत्र्यासाठी झगडणाऱ्या अनेक पक्षांनी या वन्य जमातींना राष्ट्रीयत्वाचे हक्क प्राप्त करून देण्याकरतां झटणं आणि यासाठी त्यांचे आर्थिक लढे उभारणं हा एकच मार्ग आहे. एका बाजूला भिल्लसेवामंडळासारख्या पोचट सस्था काढून नामधारी बंधुप्रेमाचा उपदेश करणारे नी सावकार—जमीनदारांच्या हवालीं या रयतेचं भवितव्य सोंपवणारे महाभाग देशभक्त मिठारामला दिसत होते, तर दुसरीकडं असलं कांही एक न करतां गुलामगिरांत नी अज्ञानांत खितपत पडलेल्या या जमातींचे आर्थिक लढे हातीं घेऊन नी त्यांचं नेतृत्व स्वीकारून सावकार-जमीनदारांच्या तावडींतून त्यांना मुक्त करणारे लालबावट्याचे श्रमवीरहि त्याला दिसत होते. पहिले 'सर्वोदया'चा डागोरा पिटीत अत्यत बुरसटलेल्या जुनाट सरंजामदारी दुनियेंत या जमातींना कायम ठेवण्यास हातभार लावीत होते तर दुसरे अडाणी नी गुलाम रयतेच्या स्वातत्र्यप्रेमावर विश्वास ठेऊन तिची आर्थिक नी सामाजिक गुलामगिरी प्रत्यक्ष लढे उभारून नष्ट करीत होते. नाडल्या गेलेल्या रयतेच्या आर्थिक लढ्यांकडं वर्गविद्रोहाच्या सरशेल चुकीच्या भूमिकेंतून पाहिल्यामुळं पहिल्यांना

त्यांतला लोकशाहीचा अंकुर दिसूं शकत नव्हता, तर दुसऱ्यांना परकीय साम्राज्यशाहीप्रमाणेच स्वकीय सावकार-जमीनदारशाहीचं उच्चाटन केल्यावाचून खरंखुरं रयतेचं स्वातंत्र्य अस्तित्वांत येऊं शकेल ही कल्पनाच हास्यास्पद वाटत होती नी म्हणून ते प्रत्यक्ष वर्गलढ्याची भूमिका स्वीकारून राजकारण करीत होते.

भोगऱ्या बाजारांतच स्वकीय भांडवलशाहीचे नमुने मिटारामला पाहायला मिळाले. पिढ्यानपिढ्या अज्ञानांत नी दारिद्र्यांत खितपत पडलेल्या पावऱ्यांच्या जिवांवर ताजे झालेले चोपड्याचे सावकार आपलीं दुकानं थाटून त्याहि ठिकाणीं बसले होते. भोगऱ्या बाजारांत प्रत्यक्षपणें कापडाचा काळा बाजार चालू होता. भरमसाट किंमती आकारून पावऱ्यांना कापड विकण्यात येत होतं. लहानसहान वस्तु त्या जत्रेंत सोन्याच्या मोलानं खपत होत्या. संध्याकाळीं परत जातांना भिल्ल-पावरे बरोबर आणलेले उभ्या ह्यातींतले पैसे या नफेबाजांच्या हातीं देऊन हात हालवीत गेले.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं मिटाराम आंब्यापाण्यावरील पडावावर गेला. तिथं त्याला काय दिसलं? जंगलांतल्या लाकडाचे नी बिड्यांच्या पानांचे मक्तेदार खोऱ्यानं पैसा ओढीत असून देखील लांकूडतोड करणाऱ्या नी बिड्यांचीं पानं तोडणाऱ्या भिल्लांच्या हातीं दोनचार आण्याहून अधिक मजुरी पडत नसे. आंब्या पाण्यावरल्या त्या पडावावर झाडांना झोळ्या टांगून पोराबाळांना त्यात झोपवून बायामाणसं टेंभुरणीचीं पानं तोडण्यांत गुंतलीं होतीं. थोडीं लहान मुलं झोळींतल्या तान्हुल्यांना झोके देत भिलाऊ बोलींतलीं गाणीं म्हणत होतीं. त्यांच्या अंगावर कपडे नव्हते, धडूतसुद्धां नव्हते. आपाद मस्तक उघडीं नागडीं नीं शेंबडामातीनं बरबटलेलीं मुलं पाहून मिटारामला त्यांच्या त्या दशेचा उबग आला. जगांत सुखसोयींची समृद्धि करण्याचा टेंभा मिरवणारी भांडवलशाही या अडाणी पोरांसाठी कापड तयार करीत असते असं म्हणतां येईल का? हरवडी वैद्यक शास्त्रांत लागणारे शोध नी तयार होणारीं शेकडोवारी छापांचीं औषधं यांचा त्यांना काय उपयोग होता? पडावावर सडलेल्या गाळातून हलुहळू वाहणारं पाणी पिऊन पान्थरीचे ढलपे वाढल्यामुळं ढेरपोटीं झालेलीं हीं मुलं कोणत्या आधुनिक सुधारणेचा लाभ घेऊं शकत होतीं?

मिठाराम त्यांच्यात फिरला. कांही अगदी लहान मुलांनासुद्धा फार दिवसांचा जुनाट हिवताप जडला असल्याचं त्याला आढळून आलं. दोनचार भिल्ल नाल्याच्या बाजूलाच हुडहुड करीत लोळले होते. हिवतापाची कसर काबूंत ठेवण्यासाठी दोनचार पोरं त्यांच्या अंगावर कुदून बसलीं होतीं दोनचार महिने आंघोळ न केल्यामुळं भिलांच्या अंगावर कमावलेल्या कातड्यासारखा रंग चढला होता. दातांना बुरशी आलेली होती. आणि त्यांच्या बायांना आकसून बसणाऱ्या फाटक्या चोळया नी तीनचार प्रकारच्या तुकड्यांना जोडून केलेलीं फडकींवजा लुगडीं अर्ध्या मांड्यापर्यंत आलेलीं, अशा वेषांत अब्रू झाकावी लागत होती. चोपड्या-जळगावांत जिवाची मुंबई करणाऱ्या नफेबाज मक्तेदारांनी जिवाचं रान करून पानं नी लांकडं जमवणाऱ्या या भिल्लांना दोन आणे मजुरी देण्याचं औदार्य दाखवलं होतं !

भिल्लसेवामंडळाचे आचार्य रामभाऊ यांची आठवण होतांच मिठारामला त्यांचा चांगलाच राग आला. भिल्लांचं दारिद्र्य, त्यांची उपासमार, त्यांची कपड्यावाचून होणारी दैना, त्यांचं अज्ञान यातली एकहि गोष्ट रामभाऊंना दिसली नसावी का ? आणि दिसली असल्यास ती नाहीशी करण्यासाठी त्यांनी काय केलं होतं ? भिल्लांचे आर्थिक लढे त्यांना उभारतां आले नसते का ? मग ते आर्थिक लढे उभारू पाहणाऱ्या लालबावट्याच्या श्रमवीरांना नेस्तनाबूत करूं म्हणणाऱ्या सावकार जमीनदारांना साथ द्यायचं विश्वबंधुत्वाचं ( ! ) कार्य ते कसे पार पाडीत होते ?

साऱ्या गोष्टी उद्वेगजनक होत्या. भिल्ल मजूर न्याहारीसाठी बसले असतांना मिठाराम त्यांच्याशी बोलत होता. त्यांतले बरेचसे त्याच्या परिचयाचे होते. सातपुड्याच्या पायथ्याशी देशावर चाललेल्या किसानसभेच्या चळवळी भिल्लांनी पाहिल्या होत्या. लालबावटा ही चीज त्यांना पाहून नी ऐकून माहीत होती. मिठारामला त्यांच्याशी बऱ्याच महत्त्वाच्या बाबतींत बोलतां आलं. न्याहारीची वेळ साजरी करण्यासाठी भिल्लांपाशी काय होतं ? धान्य दुर्मिळ नी बेसुमार किंमतीमुळं घ्यायला अशक्य असल्यामुळं एखाद्याच्याच सुडक्यांत अर्धीउर्धी भाकर दृष्टीस पडे. फांगेचा पाला वा चिंचेचा चिघूर मिठांत उकळून केलेली

भाजी, रात्रीं चोरून आणलेल्या बाजरीज्वारीच्या कणीकोंड्याच्या रोट्या भाकरी आणि मोहू, अशा प्रकारची ती न्याहारी.

आठ दिवसांच्या दोन बाळंतिणीहि त्यांच्यांत मजुरीला होत्या. चामडी हाडांला चिलगलेली नी तोंडांचं बोळकं झालेलं, असे कांही म्हातारे त्यांत होते. दहाबारा वर्षांचीं पोरंहि होतीं. इतक्या उपाशी जिवांच्या कष्टांवर ताजे झालेल्या मक्तेदारांना वटणीवर आणायला संपाचं शस्त्रंच योग्य आहे हें मिठारामला कळून चुकलं हा मनसुबा काहीजणांना सांगतांच त्यांनी संमति दर्शवली. कांहींनी पोटासाठी नाखुषी व्यक्त केली. पण एकंदरींत कांहीहि करून संप करायला हरकत नाही असा सर्वांचा सूर वाहू लागला.

रामभाऊंना हें कळलं असतं तर "हे लालबावटेवाले वर्गद्वेष पसरवतात" या जगनशेटांच्या वाक्याचा उच्चार त्यांनी खास केला असता, पण मिठारामच्या दृष्टीनं आर्थिक पिळणुकीविरुद्ध संपाचं शस्त्र उगारण्यांत भिल्ल श्रमवीरांचं स्वातंत्र्यप्रेम नी राष्ट्रीय चळवळींतील लोकशाहीचा अंश हा एवढा अर्थ त्याच गोष्टींत भरलेला होता. या भागांतील एकंदर अवलोकनाचा अहवाल तो वरिष्ठ कार्यकर्त्यांस सादर करणार होता नी त्यानंतर आर्थिक लढ्याची रूपरेषा आखली जाणार होती. तिसऱ्या प्रहरानंतर तो वैजापुरास परतला. पोवलाद भिल त्याच्याबरोबर होताच. तो किसान सभेच्या कामांत त्याला मदत करीत होता. अनेर नदीवरून एक चक्कर मारून संध्याकाळीं झिंग्याच्या भाजीचं त्यांतल्या त्यांत खमंगस जेवण करून तो पोवलादबरोबर डोंगऱ्या भिलाच्या टपरीबाहेर मेचीवर झोपेसाठी लवंडला.

लालबावट्याचा कार्यकर्ता म्हटला म्हणजे त्याच्या आयुष्यांत प्रणय आणि झोप या दोन गोष्टींचा दुष्काळच असायचा, मिठारामच्या राजकारणाच्या व्यापामुळं त्याची बायको फारकत घेऊन दुसरं लग्न करून निघून गेली होती. कार्याच्या व्यापामुळं झोप देखील त्याला जेमतेमच मिळायची. आजहि भोंगऱ्या बाजाराच्या नी आंब्यापाण्यावरील दृश्यांमुळ त्याला झोप लागत नव्हती. तो सारखा विचार करीत होता. झोप घ्यायचा प्रयत्न करावा, पण विचारचक्र

अजीबात थांबूं नये. पुरांतून वाहून आलेलं लांकूड नदीच्या उसूंत शिरावं नी तिथल्या तिथंच थोडा वेळ गिरक्या खाऊन परत पुराच्या लोटाबरोबर वाहूं लागावं, तसंच झालं होतं त्याचं अगदी.

भिल्लांच्या प्रश्नांचं स्वरूप अगदी उघड होतं नी तो सोडवण्याचे मार्गहि अगदी सरळ होते. परंतु त्या भागांतील प्रत्यक्ष अडीअडचणींचा विचार करणं भाग होतं. रामभाऊंचा पूर्वीचा स्नेह बाजूला सारून त्यांचा विरोध पत्करण्याचा प्रसंग येऊन ठेपला होता. लोकसेवेची खरीखुरी कळकळ असून देखील भौतिक घडामोडींकडं चुकीच्या दृष्टिकोनांतून पाहिल्यामुळं रामभाऊ रयतेच्या, विशेषतः भिल्ल-पावऱ्यांच्या, प्रगतीला बाधक अशा मार्गांचा अवलंब करीत होते. सर्वोदयांत त्यांना विश्वाचा उद्धार दिसत होता. परंतु मालकांचा उत्कर्ष नी पिळल्या जाणाऱ्या कामगार-मजूरांचा उत्कर्ष यांचं व्यस्त प्रमाण आहे हें त्यांना कळूं शकत नव्हतं शेतकऱ्यांची गांजणूक जितकी अधिक तितका सावकार-जमीनदारांचा उत्कर्ष अधिक; कामगाराची पिळणूक जितकी अधिक तितका भांडवलदारांचा उत्कर्ष अधिक, हें साधं भौतिक गोष्टींचं गणित त्यांना उमगत नव्हतं. मालक-मजूर, शेतकरी-सावकार नी खंडकरी-जमीनदार यांच्यांत बंधु-भाव निर्माण करणं कसं शक्य असणार? या दोघांतलं विषम नातं ज्यामुळं निर्माण होतं त्या भौतिक विषमतेच्या म्हणजे पिळवणुकीच्या अर्थव्यवस्थेवर घाव घालून विषमता नष्ट करण्याऐवजी "मानवी मनांत क्रांति" करण्याच्या गोष्टी भाऊंसारखे देशभक्त करीत होते. जगांतलीं दुःखं नी असमाधान हीं भौतिक विषमतेंतून उद्भवलीं नसून वर्गद्वेषामुळं नी असंतुष्ट मनोवृत्तींमुळं निर्माण झालेलीं आहेत असं म्हणणं म्हणजे इतिहासाचं नी मानवी जीवनाच्या प्रवाहांचं अज्ञान व्यक्त करण्यापलीकडं दुसरं कांही नाही. शेतकरी-कामकऱ्यांच्या आर्थिक लढ्यांकडं लोकशाहीच्या दृष्टिकोनांतून एकेकाळीं पाहणारे पांडुरंग गुरुजी या चुकीच्या भूमिकेमुळच भाऊंप्रमाणे रयतेपासून अलिप्त पडले होते. आणि या सर्व स्वप्नाळु आध्यात्मिकांनी अशी सोयिस्कर समजूत करून घेतली होती की लालबावटेवाल्यांनी जनतेला त्यांच्यापासून फोडलं! पण भौतिक घडामोडीचं सत्य कुणाला नाकारायचं असलं म्हणून इतिहासाची गति थांबत नसते. म्हातारीनं कोंबडा टोप्याखाली झाकून ठेवला म्हणून

पहाट होतांच तो बांग दिल्यावाचून थोडाच राहणार आहे? मालक-मजूर, सावकार-शेतकरी, सर्वांनी मिळून बंधुभावानं नांदाव या भ्रामक उपदेशाला एका कानानं ऐकून दुसऱ्या कानानं वाट देणाऱ्या रयतेची आर्थिक नी सामाजिक लढ्याच्या दिशेनं प्रगति होतच होती. पांडुरंग गुरुजी किंवा रामभाऊ शीलानं नी कळकळीनं कितीहि मोठे असले तरी इतिहासाच्या गाड्याचीं चाकं उलट्या दिशेनं फिरवणं त्यांना शक्य नव्हतं. माणसं येतात नी जातात, पण नदी आपला मार्ग आक्रमीत असतेच. या इंग्रजी सुभाषिताप्रमाणे अनेक पांडुरंग गुरुजी नी रामभाऊ येतात नी जातात, पण रयतेच्या लोकशाहीच्या प्रवाहांची गति या काळांत तरी अखंडपणें चालू राहणारच यांत शंका नाही.

नी तशी ती चालू राहिली होती. नुकताच ठाणा जिल्ह्यांत वारली जमातीनं उभारलेला लढा मिठारामच्या डोळयांसमोर उभा राहिला. वारली नी भिल्ल याच्या परिस्थितींत फरक अजिबात नाही. लग्नासाठी किंवा घरगुती कामासाठी सावकार-जमीनदारांकडून चाळीस पन्नास रुपये घेतल्यावर त्यांची आयुष्यभर शतपटींनी फेड करायची नी त्यासाठी फुकट गुलाम म्हणून राबायचं हा प्रकार वारल्यां प्रमाणेच भिल्लांतहि त्याला दिसला. मुंदऱ्या भिलाची कहाणी याहून वेगळी नव्हती. असेच कैक भिल्ल जवान नी म्हातारे सावकार-जमीनदारांच्या घरीं फुकट गुलाम म्हणून राबत असलेले त्यानं पाहिले होते. आयुष्यभर या गुलामगिरींतून सुटण्याची त्यांना आशा नाहीं. हें त्यांचं आर्थिक नी सामाजिक शोषण वारल्यांच्याच पद्धतीनं बंद पाडतां येईल असं मिठारामला निश्चितपणें दिसून आलं.

ठाणा जिल्ह्यांतील उंबरगांव नी डहाणू या तालुक्यांतल्या वारली जमातींत कार्य करण्यासाठी बाळासाहेब खेरांच्या अध्यक्षतेखाली नी काँग्रेसच्या आश्रयाखाली आदिवासी सेवामंडळ नावाची संस्था चालवली जात होती. युगानुयुगं अज्ञानांत नी सुधारणेपासून दूर खितपत पडलेल्या वारल्यांच्या "उद्धारा" चं नांव करून निघालेल्या या संस्थेनं तेरा वर्षांत कांहीहि कार्य केलं नाहीं. या तेरा वर्षांत वारल्याची आर्थिक नी सामाजिक गुलामगिरी पूर्वीपेक्षा अजिबात कमी झाली नाही, उलट युद्धकाळाचा फायदा घेऊन सावकार जमीनदारांनी पिळणु-

कीचे फास अधिकच आवळले. किसान सभेच्या लालबावट्याखाली या शेतकऱ्यांनी संघटना उभारीपर्यंत जवळजवळ दीड लाख लोकांचा हा उपेक्षित समाज दारिद्र्य नी गुलामगिरीच्या कोणत्या नरकात पिचत होता याची कुणा-लाहि जाणीव नव्हती. मुंबईपासून जेमतेम शभर मैलावरच्या या भागांत आदिवासी सेवामंडळाच्या आमदानींत देखील मध्ययुगीन बुरसट गुलामगिरीची प्रथा सर्रास प्रचारांत होती.

सावकारांच्या ज्या जमिनीवर आज हे शेतकरी राबतात त्या जमिनी सत्तरऐंशी वर्षांपूर्वी त्यांच्या स्वतःच्या वाडवडिलांच्या मालकीच्या होत्या. अनेक कावे नी शिलावे करून सावकारांनी त्या बळकावल्या, येवढंच नव्हे तर सगळ्या वारल्यांनाहि आपले पिढीजात गुलाम बनवल. हे वारली शेतकरी नावालाच खंडकरी होते. खंडाची जमीन करण्याशिवाय त्यांना सावकाराची इतर जमीन बिगारीनं खेडावी लागे, सावकारांचं गवत नी पीक कापावं लागे. संडास साफ करण्यापासून सावकारांचं सर्व प्रकारचं घरकामहि त्यांना बिगारीनं करावं लागे. त्यांच्या मिळकतीवर नी चीजवस्तूंवर देखील सावकारांची मालकी. सावकार सांगेल तेव्हा आपले बैल धुरावून पडेल तें काम बिगारीनं त्यांना करावं लागे. उन्हाळा, हिवाळा किंवा पावसाळा यांपासून संरक्षणाची अपेक्षा त्यांना करता येत नव्हती. सावकारांच्या गुरांचं दूध काढून दहापंधरा मैलांवर उन्हातान्हांत नी पावसांत तें नेऊन पोचवायचं वारल्यांनी, या कामाबद्दल मोबदला म्हणून एक दिडकीहि त्यांना मिळायची नाहीं!

ही बेकायदेशीर गुलामी, अनन्वित जुलूम नी दंडपशाही यांच्या जोरावर सावकारांनी टिकवून धरली होती. काम करतांना वारल्यांना लाथाबुक्क्यां नी काठ्यांचा मुद्दा मार देणं ही नेहमीचीच गोष्ट होती. पायाच्या आंगठ्याला वारल्याची शेंडी बांधून पाठीवर जाड टेंग्यानं मारणं, हाताच्या आंगठ्यावर मारणं, झाडाला बांधून टिमणं, असे अत्याचार सावकारांकडून नेहमी केले जात. कांही वर्षांपूर्वी एका पारशी सावकारानं आपल्या दोन कुळांना कोळसा तयार करण्याच्या भट्टींत टाकून जिवंत जाळलं होतं. पण त्या सावकारावर खटला मुद्दा झाला नव्हता! बिगार करायचं नाकारल्याबद्दल एका सावकारानं

कुळाचा खून करून त्याचं प्रेत आवारांत पुरलं. तरी सहीसलामत सुटून तो सावकार उजळ माथ्यानं वावरूं लागला होता. देवी आलेल्या जेठ्या नांवाच्या वारल्याला काठीनं फटके मारीत दहा मैलांवरच्या शेतांत कामासाठी नेऊन सावकारानं त्याच्याकडून रक्तबंबाळ स्थितींत दिवसभर काम करून घेतलं— अशा सारख्या शेकडो तक्रारी उंबरगावच्या किसान सभेच्या कार्यालयांत नोंदल्या गेल्या होत्या. वारल्यांच्या बायकांमुलींचं शील सावकारांना खेळण्याची वस्तु वाटतं. बायाबापड्यांवर बळजबरी नी अत्याचार करणं हा आपला हक्कच आहे अशी सावकारांची समजूत. चोपड्याच्या कन्हूशेटनं तरी सुंदऱ्याच्या बायकोला तो तुरुंगांत असतांना आपली संभोगाची वासना तृप्त करण्यासाठी बळी दिलं होतं. असे शेकडो अत्याचार भिल्लांवर होत असलेले मिठारामला माहीत होते.

असे हे सर्व अमानुष अत्याचार सर्रास सुरू असतांना सरकार नी सरकारचं पोलीसखातं डोळ्यांवर कातडं ओढून स्वस्थ बसलं होतं, इतकंच नव्हे तर सावकारांवर पोलिसखात्याची नी सरकारची बहाल मर्जी होती.

बाळासाहेब खेरांच्या आदिसेवामंडळाला करतां येण्यासारखं केवढं कार्य इथं संघटनेची वाट पाहात होतं. पण मंडळानं चळवळ केली नाहीं किंवा संघटना उभारली नाहीं. अत्याचारांचा प्रतिकार करण्याच धैर्य वारल्यांत निर्माण करण्याचं त्यांनी मनावर तर घेतलं नाहीच. उलट ही गुलामगिरी नी अत्याचार याकडं कानाडोळा करून सावकारांचे हितसंबंध पाहण्याकडं त्यांनी लक्ष दिलं. हें मंडळच तिथल्या सावकारांकडून मिळणाऱ्या सालिना पचवीस हजार रुपयांवर चालत असल्यामुळं वारली शेतकऱ्यांना जागृत करणं हें त्याचं ध्येय नव्हतं. कॉंग्रेस सारख्या देशव्यापी संस्थेची माहितीहि वारल्यांना नव्हती. रयतेच्या संघटनांची प्रचंड ताकद पाठीमागं उभी असल्याखेरीज कॉंग्रेसचं सामर्थ्य वाढणार नाहीं ही साधी गोष्ट मंडळाच्या चालकांना कळूं नये ! वारल्यांच्या जागृतीसाठी पैसे द्यायला सावकार कांही दुधखुळे नव्हते ! अर्थात् त्यांनी दिलेल्या पैशाचा अप्रत्यक्ष परिणाम वारल्यांची गुलामगिरी टिकण्याकडंच होणार असल्यामुळं बाह्यात्कारी देशभक्तीचा नी उदारपणाचा आव आणून ते मंडळाला पैसा पुरवीत होते. सावकारशाहीच्या सावलीच्या उन्हांत तडफडणारे दीड लाख वारली

हवालदील झालेले असतांना किसान सभेच्या लालबावठ्यानं त्यांच्या संघटनेचं बिकट कार्य हातीं घेतलं टिटवाळ्याच्या महाराष्ट्र किसान परिषदेनंतर अवघ्या दोन महिन्यांच्या आंतच सबंध उंबरगांव तालुक्यांतली वेटबिगार किसान सभेच्या नेतृत्वानं बंद करण्यांत आली. डहाणू तालुक्यांतहि किसान सभेची चळवळ फोफावून तमाम वारल्यांनी सावकारशाहीविरुद्ध संघटित लढा उभारला. हा लढा मोडण्यासाठी अनन्वित दडपशाही करण्यांत आली. वारल्यांची धरपकड झाली. लालबावठ्याची सभा होणार असून पोलीसांकडून ती मोडली जाणार आहे अशी हूल उठवून वारल्यांच्या जमावावर दगलबाजीनं अमानुष गोळीबार करण्यात आला. लहान मुलांनाहि गोळ्या लागल्या. किसान सभेच्या कार्यकर्त्यांवर खटले भरण्यांत आले. पण दडपशाहीला न जुमानतां वारल्यांनी लढा यशस्वी केला. सहा महिन्यांच्या अवधींत किसान सभेच्या नेतृत्वाखाली दीड लाख लोक असह्य गुलांमगिरींतून मुक्त झाले. मजुरीच्या दरांत वाढ नी विगार बंद करण्याच्या मागण्या मान्य करणं सावकाराना भाग पडलं.

खटल्यांत गोवण्यांत आलेल्या लोकांच्या बचावासाठी नी वारल्यांवरील अत्याचारांची चौकशी करण्यासाठी किसान सभेनं प्रचंड मोहीम उभारली. महाराष्ट्रांतील कामगार वर्गानं मोठ्या उत्साहानं फंडास देणग्या दिल्या.

विशेष म्हणजे राष्ट्रीय म्हणवणारीं चटसारीं भांडवलदारीं वर्तमानपत्रं नी किसान सभेच्या विरुद्ध प्रचार करणारं आदिवासी सेवामंडळ या सर्वांनी वार्तां-वर बहिष्कार घालून मुग्धता स्वीकारली देशांतल्या चाळीस कोट जनतेपैकी आजपर्यंत पूर्ण अज्ञानांत नी मागासलेपणांत असलेली दीड लाख वारली जमात किसान सभेच्या कार्यामुळं जागृत नी संघटित होऊन सर्व जुलमशहांविरुद्ध नेटानं लढायला दंड थोपटून पुढं सरसावलेली पाहून प्रत्येक राष्ट्रभक्ताला आनंद व्हायला हवा होता. वारल्यांच्या लढ्यानं साम्राज्यशाहीच्याहि उरांत धडकी भरली. गव्हर्नरांनी खास दरबार भरवून पाहिला, पण वारल्यांनी त्यावर बहि-ष्कार घातला. पोलिस ठाण्यांची संख्या वाढवण्यासारखे उपाय नोकरशाहीकडून वारल्यांची चळवळ चिरडून टाकण्यासाठी अमलांत आणण्यांत येऊं लागले. पण जागृत वारली आता दबणारे राहिले नव्हते.

किसान सभेच्या झेंड्याखाली वारली शेतकऱ्यांची संघटना जास्त जास्त बळकट होत जाऊन देशाच्या स्वातंत्र्य लढ्यांतील ती एक प्रभावी शक्ति बनणार याविषयी किसान कार्यकर्त्यांना शका नव्हती. सातपुड्यांतल्या भिल्ल-पावऱ्यांच्या दलित समाजांतहि अशीच संघटना उभारतां येईल याबद्दल मिठारामलाहि आत्मविश्वास वाटूं लागला. मार्गांतले अडथळेहि त्याला दिसूं लागले. वारल्यांच्या संघटित चळवळीचं स्वागत करण्याऐवजीं तिला आळा घालण्याचे प्रयत्न बाळासाहेब खेर यांच्या नेतृत्वाखालील आदिवासी सेवामंडळाकडून नी इतर खादी पांघरून देशभक्त बनलेल्या कॉंग्रेस पुढाऱ्यांकडून झाले. लालबावट्याच्या श्रमवीरांनी जिवाचं रान करून वारल्यांची सघटना उभारली ही गोष्ट मुद्दाम डोळ्याआड करून ते लालबावट्याला शिव्या द्यायला प्रवृत्त झाले. वारल्यांना लालबावटेवाले अत्याचारांची चिथावणी देतात असा खोटा आरोप करून त्यांनी पर्यायानं ब्रिटिश सत्ताधाऱ्यांना वारल्यांवर दडपशाही करण्यास उत्तेजनच दिलं. त्यांची भिस्त वारली खेडुतांच्या जागृतीवर नी संघटनेवर नसून सावकारांचा 'हृदय पालट' होण्यावर होता! त्यांचं आदिवासी सेवामंडळ सावकारांच्या नी बड्या भांडवलदारांच्या देणग्यावरच जगत होतं. अर्थात् तें वस्तुतः 'सावकार सेवामंडळ' बनलं होतं यांत नवल काय? सावकारांवर नी भांडवलदारावर सर्व मदार राखणाऱ्या पुढाऱ्यांना रयतेच्या आर्थिक लढ्यांची नी त्यांतून उदय पावणाऱ्या लोकशाहीची कदर ती काय असणार? रयतेच्या आर्थिक लढ्यांचं नेतृत्व स्वीकारून मजबूत लोकशाही संघटना बांधणाऱ्या लाल श्रमवीरांनी खादीचे बुरखे घातलेल्या भोंदू देशभक्त सावकार—जमिनदारांचा त्याचप्रमाणे आदिवासी सेवामंडळाच्या प्रतिष्ठित चालकांचा विरोध सहन करून गुलामगिरीच्या अंधारांतून प्रकाशाचा नी उन्नतीचा मार्ग रयतेला दाखवून दिला होता. लालबावट्याविरुद्ध आदिवासी सेवामंडळानं चालवलेल्या खोडसाळ प्रचाराचे बारा वाजले. वारल्यांनी मंडळाच्या आचार्यांना बजावलं—
"आतापर्यंत आम्हाला कोणी वाली नव्हता. आता लालबावटा मिळाला आहे. तुमच्यापासून आम्ही पाच मैलांवर असून तुमचा लढाआम्हाला दिसला नाहीं. पण लालबावटा आल्याबरोबर सहामहिन्यांत आमची वेठबिगार बंद झाली. आमच्या टोलेजग सभा व्हायला लागल्या."

लालबावट्यानं केलेली जागृते सावकारांच्या कारवायांनी मरत नसते, पोलिसांच्या दडपशाहीनं मरत नसते, पांडुरंग गुरुजी किंवा रामभाऊंसारख्या प्रतिष्ठित पुढाऱ्यांच्या थापेबाजीमुळं मरत नसते, किंवा राष्ट्रीय म्हणवणाऱ्या भांडवलदारी वर्तमानपत्रांच्या प्रचारानं मरत नसते. या कारवायांनी लालबावटा उखडून टाकण्याचं स्वप्न हें स्वप्नच ठरलं. प्रतिगाम्यांच्या कृष्णकारस्थानांच्या अडाणी पण जागृत रयतेच्या एकजुटीच्या जोरावर चिंधड्या उडाल्या. गुलामगिरी नष्ट करण्यासाठी वारल्यांनी स्वतांचं रक्त सांडलं होतं. त्याचं फळ त्यांना मिळालं होतं.

हा सारा चित्रपट मिठारामच्या डोळ्यांसमोरून सरसर सरकत होता. हीच कामगिरी भिल्ल-पावऱ्याच्या नी कोळीकुणब्यांच्या या सातपुड्यांत पूर्ण करण्याचं यश आपण संपादावं अशी आकांक्षा त्याच्या मनांत उद्भवली.

भिल्लांच्या उन्नतीसाठी म्हणून एकीकडं थोडी रकम ओतणारे जगनशेट दुसरीकडं काळ्याबाजारांत नफेबाजी करून फावड्यानं पैसा ओढीत होते नी सावकारीपाशांनी रयतेच्या नरड्या आवळून इस्टेट वाढवून गबर होत होते. भावनियंत्रण समितींत काम करतांना रयतेच्या प्रश्नाकडं पूर्णपणें दुर्लक्ष करून आपला नी व्यापारीवर्गाचा खिसा गरम करण्याकडं कटाक्ष ठेवीत होते. भिल्लांना नीति शिकवूं पाहणारे कन्हूशेठ दुसऱ्या बाजूला भिल्लांना दरोडेखोरी करायला लावून दरोड्याचा माल बिनबोभाट पचनीं पाडीत होते. देशभक्तीचीं स्तोत्रं गाणारे हिरालाल शेट राजरोसपणें रयतेचे मुडदे पाडून देशद्रोह करीत होते. वर्गावर्गांत बंधुभाव नांदावा म्हणून टाहो फोडणारे रामभाऊ सावकार जमीनदारांना अप्रत्यक्षपणें साहाय्य करून रयतेची उपासमार नी असंतोष वाढवीत होते. भिल्लांच्या 'उन्नती'साठी झटणारं म्हणून ऐकिवांत असलेलं सावकारांचं भिल्ल-सेवामंडळ भिल्लांच्या आर्थिक नी सामाजिक लढ्यांना खीळ घालून त्यांची गुलामगिरी नी अज्ञान टिकवून धरण्यासाठी झटत होतं. भिल्ल-पावरे नी कोळीकुणबी यांची मजबूत संघटना किसान सभेच्या झेंड्याखालीं निर्माण झाल्याशिवाय त्यांचे प्रश्न सुटणं शक्य नाही हा मिठारामचा ठाम सिद्धान्त त्यानं रामभाऊंना मागंच सांगून टाकला होता. आता प्रत्यक्ष अटीतटीच्या सामन्याचीच वाट बघायची होती.

मोठ्या पहाटेलाच भाकर कांदा फडक्यांत बांधून घेऊन मिठारामनं वैजापूर सोडलं. सुंदऱ्या भिलाची नी त्याची अलीकडं प्रत्यक्ष भेट झालेली नव्हती. पण मागं एकदा किसान सभेला येऊन मिळण्याबाबत सुंदऱ्यानं त्याला गुप्त संमति दिलेली होती. त्याची भेट घेण्यासाठी मिठाराम निघाला होता. त्यानंतर वीरवाड्याच्या बाजूला किसान सभेच्या कामासाठी तो जाणार होता. जळगावाहून लवकर निघून येण्यासाठी त्यानं झिपरूला लिहिलं होतं. आतापर्यंत झिपरू वीरवाड्याकडं आला असावा हा त्याचा तर्क होता.

सेयाण्या वेळेस जंगलांतून चालतांना एक प्रकारची हुशारी वाटत होती. अंधार थोडासा असल्यामुळं कांही ठिकाणचे लोघड्यांचे टाव अजून पसार झालेले नव्हते. मध्येच एकादा रोही जंगलाबाहेरील शेतांतून मगम होऊन डोंगरांतून चाललेला दिसत होता. मोरांचे टाहो ऐकूं येत होते. जांभळांच्या नी कडेच्या झाडांवर विलबांदरांची चुळबूळ सुरू झाली होती या उभारीच्या वातावरणानं मिठाराम चांगलाच हुशारला. खैराच्या फुलांचा मंद सुवास त्याची उभारी वाढवीत होता. ढोरक्या पक्षी "कुठं पाहूं—कुठं पाहूं" असा झाडींतून विचारीत होता. मध्येच एखाद्या बरडीवर डोकावणारा पालीदार झाडाचा शेंडा बाईच्या डोक्यावरील सोनफुलासारखा शोभत होता. मक्तेदारांचीं लांकडं वाहून नेणाऱ्या गाड्यांचा खडखडाट खोलाणींतल्या गाडरस्त्याकडून कानांवर येत होता. "जामण्यापाण्या" पर्यंत अशा उभारींत मिठाराम येऊन पोचला असेल तोंच समोरून एका तुटक्या घोड्यावर स्वार होऊन येत असलेले रामभाऊ त्याच्या आढळांत आले. नमस्कार-चमत्कार झाल्यावर, रेंजरसाहेबांच्या शोधासाठी पाटलानं आपणांला विगारीवर पाठवल्याचं रामभाऊंनी त्याला सांगितलं. रात्रीची सगळीं हकीकतहि सांगितली. दोघे जण थोडावेळ घोडा खैराच्या धुडाला अडकवून एका खडकावर बसले.

थोडावेळ रात्रीच्या धांदलीबाबत त्यांचं बोलणं चाललं होतं, इतक्यांत रामभाऊ आले होते त्याच रस्त्यांन एक इसम हातांत ठेंगा घेतलेला चालत येत असतांना दिसला. गावांतला कामदार महार होता तो. त्यानं वाकून जोहार केला आणि रेंजरसाहेब सुखरूप येऊन पोचल्यामुळं भाऊंना परत बोलावलं असल्याचा

निरोप सांगितला. रेंजरसाहेब ताबडतोब चोपड्याला रवाना झाल्याचं त्याच्या हकीकतीवरून भाऊंना कळलं. परत येतों म्हणून सांगून भाऊनी कामदाराला वाटेला लावलं. कामदार जोहार करून निघून गेला. जातांना त्यान मिठारामकडं हेतुपूर्वक नजर टाकली. भोंगऱ्या बाजारांत हाच मनुष्य पोवलादबरोबर हिंडून कांहीतरी लिहून घेत होता नी बोलत होता हें कामदारानं पाहिलं होतं. भोंगऱ्या बाजार पाहायसाठी म्हणून तोहि जाऊन आला होता.

मिठाराम आणि त्याचा राजकीयपक्ष यांशी विरोध हें जरी काँग्रेसचं राजकारण आणि पर्यायानं जगनशेटजींचं नी रामभाऊंचं धोरण होऊन बसलं असलं तरी व्यक्तिशः मिठारामचा तिरस्कार करण्याइतके भाऊ कडवे नव्हते. त्यांच्या स्वभावांत बालपणापासूनच थोडी नरमाई होती. वडिलांच्या नी उखर्डू मास्तरांच्या शिकवणीचे संस्कार बसल्यामुळं त्यांच्याठायीं एक प्रकारचा मनमिळाऊपणा होता. त्यामुळंच ते असत्यापासून नी लाचलुचपतीपासून अलिप्त राहून नोकरी करूं शकले. नोकरी सोडण्याची कृति पुत्रप्रेमामुळं नी देशभक्तीमुळं त्यांच्या हातून घडली. वडिलांच्या मृत्युप्रसंगीं आपणांला मिळालेला आदेश आपण विसरलों नाहीं असं नेहमीच त्यांना वाटे. " पोरा, मन्सारामबोवांचा मुलगा म्हणून तुला सर्वांनी नावाजावं हीच माझी शेवटची आमना आहे " असं बोवांनी शेवटचं वाक्य उच्चारून त्यांना आयुष्यासाठी संदेश दिला होता. तो आपण पाळीत आलों असल्याचं समाधान ते नित्य भोगीत होते. मामलेदारी करीत असतांनासुद्धा त्यांनी स्वार्थाकडं मुद्दाम दुर्लक्ष करून रयतेचं हित पाहिलं होतं. तुरुगांतून सुटून आल्यावर त्यांनी सेटलमेंटमधील शेती मिळवली नी जगनशेट प्रमुखांच्या साहाय्यानं भिल्ल-सेवामंडळ काढलं. मंडळ उभं करण्यासाठी त्यांनी आरभीं स्वतांची सातआठशे रुपयांची रकम खर्च केली होती. ती रकम मन्सारामबोवांनी भाऊंच्या आईची ठेव म्हणून मरणप्रसंगीं भाऊंच्या हवालीं केली होती. तिचा सदुपयोग करण्याची भाऊंची प्रतिज्ञा भिल्ल-सेवामंडळाच्या उभारणीनं सफळ झाली. त्यामुळं भिल्ल-सेवामंडळाकडं मातृसेवेचं प्रतीक या दृष्टीनं भाऊ पाहात असत. मंडळाचे आर्थिक व्यवहार शेटसावकारांच्या मोहबतीवर चालू लागल्यामुळं आणि भाऊंच्या वर्गसलोख्याच्या भ्रामक विचार-सरणीमुळं मंडळ हें केवळ सावकार सेवेचं ब्रीद अंगीकारणारी प्रतिगामी संस्था

होऊन बसलं. हें भाऊंना उमजत नव्हतं. मंडळावरील त्यांचं प्रेम त्यांना भवि-
तव्याविषयीं साशंक बनवीत होत. लालबावट्याच्या चळवळींनी नी संघटनांनी
भिल्ल-सेवामंडळाचा प्रभाव कमी केला असा चुकीचा ग्रह ते उराशी बाळगून
असल्यामुळ जगनशेटजींच्या कम्युनिस्टविरोधी राजकारणाला ते साथ घालीत
होते. त्याना मंडळ कायम ठेवायच होतं नी तं वर्गसलोख्याच्या तत्त्वानं चाल-
णारं असंच त्यांना टिकवायच होतं. या दोन्ही गोष्टी बदलत्या जगाच्या लोक-
शाही चळवळींशी विसंगत होत्या. भाऊंपुढं दोनच मार्ग होते. एक मागासलेल्या
भिल्ल–पावऱ्यांच्या नी कोळी–कुणब्यांच्या आर्थिक लढ्यांचं नेतृत्व स्वीकारून
स्वकीय सावकार जमीनदारशाही विरुद्ध लोकशाही संघटनेची आघाडी उभारून
स्वातंत्र्य लढ्याला जोम आणणं, नी दुसरा, सावकार जमीनदारांची साथ करीत
रयतेच्या लढ्यांशी विरोधी भूमिका धारण करण. मधला मार्गच नव्हता. त्यामुळं
ते नाखुषीन नी कांहींसे अप्रत्यक्षपणेंच दुसऱ्या गोटांत प्रविष्ट झाले होते. देश
हिताची कळकळ नी शीलाचं सामर्थ्य असूनहि त्यांचा राजकीय अधःपात झाला
होता. " मन्साराम बोवांचा मुलगा " म्हणून आता त्यांना कुणीहि ओळखीत
नव्हतं. भिल्ल-सेवामंडळाचे आचार्य म्हणून खादीधारी भोंदू देशभक्त सावकार
जमीनदारांच्या गोटांत ते सन्मानिले जात नी सावकारशाहीचा एक श्रद्धाळु नी
प्रतिगामी हस्तक म्हणून लोकशाही संघटनेच्या कार्यकर्त्यांकडून त्यांची संभावना
होई. लालबावट्याला शिव्या देणं हाच कॉंग्रेसचा कार्यक्रम नी हीच देशभक्तीची
कसोटी ठरण्याचा प्रसंग आल्यावर अनेक निष्क्रिय नी दांभिक त्याप्रमाणेच
मवाली गुंड देखील देशभक्त होऊं लागले आणि सगळीकडं लाल बावट्या
विरुद्ध शिमगां साजरा होऊं लागला, तंव्हा भाऊंना वाटल, " पाहा, जनतेचा
सात्त्विक संताप जागृत होत आहे. या लालबावटेवाल्यांना दडपलंच पाहिजे. "

यानंतर कडवी पक्षांधता अंगीं येणं एवढंच रामभाऊंच्या बाबतींत बाकी
राहिलं होत. चुकीच्या भूमिकेवरून घसरत त्यांचा एवढा अधःपात झाल्याबद्दल
त्यांचे पूर्वींचे स्नेही मिठाराम नी झिपरू यांना मनापासून खेद होई. भाऊंना
आपला अधःपाताचा मार्ग जितक्या लवकर ओळखूं येईल तितकं चांगलं
म्हणून ते हरघडी आशा बाळगून होते. विशेषतः भाऊंच्या स्वभावांतल्या नर-

माईमुळं ही आशा बळावण्यास सबळ कारण होतं. पण अखेरीस मिटारामची निराशाच होणार होती.

"मग आता तुमचा प्रमुख कार्यक्रम कोणता आखला आहे तुम्हीं ?" भाऊंनी चाह्र् पद्मामोडींना स्पर्श करून आपला प्रश्न टाकला.

"कार्यक्रम पूर्वी होता तोच आहे नी त्याच्यांत प्रमुख नी गौण असा प्रकारहि नाही," मिठाराम उतरला "कामकरी रयतेच्या भांडवलशाही विरोधी वर्गसंघटनांचीं कामगार संघ आणि किसान-सभा हीं दोन प्रमुख अंगं आहेत. किसान सभेच्या संघटनेला मी लागलों आहे सध्या. तें तुम्हांला माहूम आहेच. शेकडो वर्षांत कुणालाहि शक्य न झालेली निरनिराळ्या जातीजमातींची अभेद्य एकजूट किसान सभेच्या लाल झेंड्याखाली निर्माण होत आहे. कामगार वर्गाच्या पुढारीपणाखाली ही तमाम रयतेची एकजूट पणाला लागून जुनाट जमीनदारी नी सावकार-भांडवलदारांची मिरासदारी यांचा पूर्ण उच्छेद होईल तोच सुदिन-त्या दिवसाच्या साहित्यसाधनेचा संघटना हा पहिला कार्यक्रम आहे. किसान सभेच्या झेंड्याखाली विविध जातीजमातींची होणारी बळकट एकजूट पाहून आम्ही रयतेंत द्वेषभावना पसरवतों हा तुमचा आरोप कुणालाहि हास्यास्पद वाटेल." "पण आमचा आरोप अगदीच अकारण नाहीं. शांततेच्या मार्गानं मालक-मजुरांतले नी सावकार-शेतकऱ्यांतले वांधे परस्पर सहकार्यानं सोडवावेत हें आमचं मत आहे. तुम्ही एकदम अटीतटीच्या सामन्याला ऊभे राहतां. मालक म्हटला म्हणजे तो वाईटच, सावकार म्हटला की तो अत्याचारीच, अशी तुमची भूमिका आम्हांला ती मान्य नाहीं."

"तसं आम्ही म्हणत नाही. व्यक्तींवर आमचा रोख नाही. तर ज्या समाजपद्धतीमुळं नी अर्थव्यवस्थेमुळं व्यक्ति ह्या पिळणूक करणाऱ्या बनतात त्या-समाजपद्धतीचा नी अर्थव्यवस्थेचा आम्ही पराकाष्ठेचा द्वेष करतों. पिळणुकीवर नी विषमतेवर आधारलेल्या या "व्यवस्थे" ची, किंवा खरं सांगायचं झाल्यास 'अव्यवस्थे' ची तरफदारी करून ती कायम ठेवण्यास जमीनदार नी भांडवल-दार झटत असतात. त्यांचे स्वार्थी हितसंबंध ते सोडायला तयार नसतात, म्हणून वांधा उत्पन्न होतो. तो अटीतटीच्या सामन्यावाचून मिटत नसतो.

समजा, तुमच्या म्हणण्याप्रमाणे एखाद्या सावकाराला रयतेची दया आली नी त्यानं आपले सर्व कर्जरोखे फाडून टाकले किंवा शेतकऱ्यांना कर्जात थोडी सूट दिली. म्हणून जगांतली सावकारशाही म्हणून जी पोलादी अर्थव्यवस्था आहे तिच्या पायांतला एखादा तरी दगड खिळखिळा झाला असं म्हणतां येईल काय ? शिवाय सावकारांच्या दयेनं हे प्रश्न सुटणारे नाहींत आजचे जागृत कामगार आणि शेतकरी हं जाणतात की, हजारों कामगारांच्या श्रमावर आयतोबाप्रमाणे, भरमसाट नफा कमवणं नी कामगारांना उपाशीं ठेवणं, त्याचप्रमाणे करोडों शेतकऱ्यांनी रक्ताचं पाणी करून केलेली कमाई कर्जाच्या नी व्याजाच्या रूपानं खिशांत घालणं, ही जगांतली सर्वांत मोठी गुन्हेगारी आहे.

आजचे कामगार आणि शेतकरी हेहि जाणतात की जगांत शेवटचा एकच लढा आहे. काळे, गोरे, पिवळे, वगैरे सर्व वर्णाच्या नी वंशांच्या कामगार–शेतकरी रयतेचे प्रश्न भिन्न भिन्न नाहीत. एकाच प्रकारची भांडलदारी नी जमीनदारशाही या सर्वांच्या दुर्दशेस कारणीभूत झालेली आहे. त्यामुळ जागतिक कामकरी वर्गसंघटना हीच जगातील पिळणूक नष्ट करूं शकेल आणि समतेचं रयतराज्य निर्माण करू शकेल यांत त्यांना शंका वाटत नाही. इतिहासाचा हाच अनुभव आहे नी तोच आम्ही शिकवणार. यासाठी तुम्हीं भलभलते आरोप केल तरी जगांतले सर्व कामगार–शेतकरी सोवियेत राज्यसंघाचाच आदर्श उचलल्याशिवाय राहणार नाहींत. क्रांतीपूर्वीच्या रशियाचं उत्पन्न किती तुटपुंज होतं नी तेंहि अत्यंत अमानुष पिळणूक करणाऱ्या जमीनदार–मिरासदारांच्या घशांत जात होतं. बहुसंख्य जनता गुलामगिरींत नी अज्ञानांत होती. रशियन साम्राज्यांतच रशियन लोक ताजिक–उज्बेकां इतकेच गुलाम होते. पण क्रांतीनंतर कामगारसत्तेच्या अभेद्य संघटनेच्या नेतृत्वाखाली तिथल्या जनतेनं सगळ्या जुनाट जमीनदारांचं, सावकारांच, भांडवलदारांचं नी सरदार दरकदारांच समूळ उच्चाटन केलं अवघ्या वीस वर्षांत त्या देशांचं उत्पन्न पाचपटींनी वाढलं. रयतेच्या उन्नतीचे पालक म्हणून दंभ मिरवणाऱ्या जमीनदार भांडवलदारांना, देशाची उन्नति करतां आली नाही. पण क्रांतीनंतर सोवियेत देशांतल्या रयतेनं लाखों वर्षे बर्फानं आच्छादलेल्या पामीर पर्वतावर कपाशीचे मळे निर्माण केले. गोठलेल्या ध्रुवप्रदेशांत धान्याची लागवड केली. यांत्रिक शोधांचा उपयोग

पिळणूक करणाऱ्या वर्गाच्या स्वार्थाकडं न होतां रयतेच्या सुखसोयींकडं होऊं लागला. लालबावट्याच्या नी कम्युनिस्ट संघटनेच्या नेतृत्वामुळंच हें आपणांला शक्य झालं याचा सोवियेत रयतेला अभिमान वाटतो. सोवियेत रयतेच्या प्रगतीचा जगांतल्या कामकऱ्यांनाहि अभिमान वाटतो."

"हें सर्व खरं. पण मी म्हणतों, तुम्ही सर्व भौतिक पिळणूक नाहीशी केली, सुखसोयी निर्माण केल्या, म्हणून मनुष्य सुखी होईल असं तुम्हांला वाटतं कां? कितीहि सुखसोयी असल्या तरी मानवी मनाला त्याचाहि कंटाळा येऊं लागतो. जगांतलं दुःख तुम्ही नष्ट करूं शकणार नाहीं. तें नष्ट करण्यासाठी मानवी मनांतच क्रांति केली पाहिजे. ती आम्ही करूं पाहतो."

"इथंच तुमची सगळी भ्रांति आहे, भाऊ. हें बोलतांना तुमच्यासमोर गाद्यां-तक्क्यांवर लोळणारे आइतगव्वू आहेत. श्रम न करणाऱ्या व्यक्तीला चैनीचा, ऐषारामाचा कंटाळा येईल हें खरं. पण आजच्या जगांत श्रम ही गुलामगिरी होऊन बसली आहे. श्रम करावे अनेकांनी नी त्याचं फळ घ्यावं तिसऱ्याच एखाद्या आयतोबानं हा प्रकार बंद पडला पाहिजे. श्रमाचं संपूर्ण फळ घ्यायचा श्रम करणाऱ्या व्यक्तीलाच अधिकार आहे. तुमचं 'कर्मण्ये वाधिकारस्ते मा फलेषु कदाचन' हें तत्त्व किती गोंडस असलं तरी श्रम करणाऱ्या रयतेला त्याचा उपयोग नाहीं. पैसे कांही दिवस वापरायला देणारा सावकार चौपट फळ व्याजाच्या रूपानं कापून घेतो, त्याच्या तोंडून रयतेला असा उपदेश मिळाला तर त्यांत आश्चर्य नाहीं; कारण रयतेच्या सगळया श्रमांचं फळ तोच हस्तगत करीत असतो. परंतु जगांत सुखसोयी निर्माण करणं याचा अर्थ चैनबाजीकडं वळणं असा नव्हे. यांत्रिक शोधांनी मनुष्याचे श्रम हलके केलेले आहेत यंत्रांनीच सोविएत देशांतील रयतेला जनावरांतून माणसांत आणलं आहे. सर्व यांत्रिक नी शास्त्रीय शोधांनी रयतेचं जीवन सुसह्य करणं, श्रम हलके करणं प्रवासाच्या नी कष्टाच्या पद्धति सुखावह करणं, आरोग्य सुधारणं समता प्रधान नीतिमत्ता प्रस्थापित करणं, नागरिक म्हणून रयतेच्या प्रत्येक घटकाला सर्वांगीण दृष्टींनी सुसंस्कृत बनवणं, वंशभेदादिकांचं नी सामाजिक विषमतेचं उच्चाटन करणं, प्रजोत्पत्ति निर्दोष होण्यासाठी शिशुसंगोपनगृह,

विद्यालय, शिक्षण, वगैरे गोष्टींची तरतूद करणं, या गोष्टी चैनींत मोडतील असं तुम्ही म्हणूं शकणार नाही. आणि या गोष्टींचा कंटाळा येऊन दुक्खी होणारा जीव फक्त तुमच्याच कल्पनेंत अस्तित्वांत असूं शकेल! या सोयी वाढल्यानं रयत उशांतक्यावर लोळत पडेल ही चुकीची समजूत आहे तुमची. देशातल्या सर्व नैसर्गिक संपत्तीचा रयतेच्या उन्नतीसाठी जास्तींतजास्त उपयोग करणं नी रयतेंत खऱ्याखुऱ्या समतेंतील बंधुभाव दृढ करण, हें कामकरी रयतेच्या वर्गीय संघटनेच्या साहाय्यानंच होऊं शकेल. सर्वांचा उत्कर्ष म्हणजे श्रम करणाऱ्या सर्व जनतेचा उत्कर्ष. श्रम न करणाऱ्या मनुष्याला या नव्या दुनियेंत जगण्याचा हक्क प्राप्त होणार नाही. पिळणुकीचा तर नाहीच नाहीं. श्रम ही आजची गुलामगिरी आहे. आम्ही श्रमाला मान प्राप्त करून देणार आहोंत, श्रमांत स्वर्ग दाखवणार आहोंत. भांडवलशाही नी जमीनदारशाही अर्थव्यवस्थेला नी समाज-व्यवस्थेला पूर्णपणं विरोधी असच आमच धोरण राहील. तुमचा पहिला मुद्दा मी खोडून टाकला आहेच. शिवाय मला असं म्हणायचं आहे की, मानवी मन हें कांही भौतिक परिस्थिती पलीकडली एखादी स्वतःसिद्ध चीज आहे असा तुमचा समज आहे तो संपूर्ण सदोष नी अशास्त्रीय आहे परिस्थितीच्या गुणदोषां वरच मनाचे गुणदोष पोसले जात असतात. मानवी मन हें परिस्थित्यनुसार बदलत आलेलं आहे. या वस्तुस्थितीकडं दुर्लक्ष्य केल्यामुळंच तुम्हांला एका हातानं काळ्या बाजारांत करोडो रुपयांचा नफा मिळवणारे नी कामकऱ्यांचं रक्त शोषून घेणारे आणि दुसऱ्या हातान काँग्रेसला पाच हजार रुपये किंवा भिल्ल-सेवामंडळाला सातआठशे रुपये देणारे गुन्हेगार सावकार-भांडवलदार मोठे उदारहृदयी देशभक्त वाटूं लागतात. युद्धकाळाचा फायदा घेऊन नफेबाजीसाठी देशांतलं सगळं धान्य दडवून ठेवून बंगालच्या चाळीस लाख रयतेचा तळतळाट उघड्या डोळ्यांनी पाहात तिला मृत्युमुखीं देणारे गुन्हेगार साठेबाज वेळ येतांच काँग्रेसचे पुढारी बनूं शकतात नी त्यांच्या अचाट्या सवा देशभक्तीच्या बातांना राष्ट्रीय म्हणवणाऱ्या भांडवलदारी वर्तमानपत्रांत ठळक अक्षरांनी प्रसिद्धि मिळते. उपासमार सहनकरीत देशाला युद्धकाळांतून निभावून नेण्यासाठी उत्पादनवाढ करीत नी वाहातूक कायम ठेवीत जिवाच रान करणाऱ्या कामगारांची देशभक्ति तुम्हांला दिसूं शकत नाही. त्याच्या पुढाऱ्यांना तुम्ही देशद्रोही नी रशियाचे हस्तक म्हणतां. साम्राज्यशाहीशी लढतांना अहिंसा शब्दशः पाळण्याची खबरदारी घेणारे नी नाताळच्या सुटींत

सत्याग्रह बंद ठेवल्याबद्दल गांधीजींचं मोठेपण गाणारे काँग्रेसचे जबाबदार पुढारी डॉ. पट्टाभी सीतारामय्या लालबावटेवाल्यांना ठेचून काढण्यासाठी लाठ्या उचलायचा आदेश देवूं शकतात! भांडवलवाल्यांची ही नीति जगांतल्या कामकरी रयतेचा उद्धार करणार आहे अशी तुमची अजून समजूत आहे. त्यातल्या त्यांत भाऊ, दुःखःची गोष्ट एवढीच की तुमच्यासारख्या शीलानं चांगल्या, कळकळीच्या पण भ्रामक तत्त्वज्ञान उराशी बाळगणाऱ्या कार्यकर्त्यांचाच नेमका त्या गुन्हेगारांना उपयोग होत असतो. तुम्ही काय नी पांडुरंग गुरुजी काय तुम्हांबद्दल एवढं प्रेम दाटायला हे हरामखोर सावकार-जमीनदार फारच प्रेमळ असले पाहिजेत! पांडुरंग गुरुजी तुरुंगांत असतांना हेच चोरडयाचे जगनशेट त्यावेळेला कायदेमंडळाचे सभासद होते. गुरुजींच्या मुक्तीसाठी प्रयत्न करा म्हणून शेठजींना विनवणी करायला गेलेल्या कार्यकर्त्यांत मी आणि झिप्रू होतों तुरुगांत आजारी पडलेल्या पांडुरंग गुरुजींबद्दल जगनशेटनी त्यावेळेस कोंणते उद्गार काढले आहे ठाऊक? "तो इसम मेला तरी त्याची मला पर्वा नाही" असं म्हणून त्यांनी आमची बोळवण केली. कारण त्यावेळेस गुरुजी हे कामगारांत भांडवलशाही-विरोधी पुढारीपण स्थापन करणारे कार्यकर्ते होते. तेच गुरुजी आज मालकशाहीला अनुकूल अशा कारवाया करूं लागतांच नी लालबावट्याविरुद्ध विष ओकायचाच तेवढा उद्योग सांभाळूं लागतांच या देशद्रोही सावकार-जमीनदारांना नी मालकशहांना त्यांच्याबद्दलच्या प्रेमाचा पान्हा फुटला! पण या देशघातकी जुलमशहांच्या गोटांत सापडल्यामुळं गुरुजी आणि तुम्ही रयतेला मुकलां आहांत, हें सूर्यप्रकाशाइतकं स्पष्ट आहे. पण भाऊ, लक्षांत ठेवा, धोरण सुधारल्यास रयत क्षमा करील. रयत अत्यंत क्षमाशील असते, न्यायी असते, प्रामाणिक असते, स्वातंत्र्यावर ती अतोनात प्रम करते, पण पिळणुकीचा द्वेष करते. संघटनेच्या अभावीं रयतेच्या पिळणुकीबद्दलच्या द्वेषाचा निराशेत नी दैववादांत शेवट झाला होता. संघटना निर्माण होऊन एकजुटीची ताकद खडी होतांच त्या द्वेषाचं खरं स्वरूप प्रगट झालं. आर्थिक, सामाजिक नी सर्व प्रकारच्या पिळणुकीचा अंत केल्याशिवाय या वर्गसंघटनांचं अवतारकार्य पूर्ण झालं असं म्हणतां येणार नाही."

"मिठारामभाऊ, तुमच्या बोलण्यांत नी कृतींत कळकळ आहे हें मला एकदम मान्य आहे," रामभाऊ घोडयाकडं वळत बोलले. "पण मला बुवा

तुमच्या चळवळींचा प्रक्षोभक कल पाहून थोडी शंका वाटते. वर्गसंघटना म्हटल्या की संघर्ष आलेच. तुमच्या त्या ठाण्यांतल्या वारली लोकांची चळवळ तरी विचारांत घ्या. कैक वारली बंदुकांना बळी पडले, शेकडो जखमी झाले. एवढा रक्तपात करण्याऐवजी अहिंसक सत्याग्रहानं कार्य झालं नसतं का ?"

"म्हणजे हिंसेचा आरोप तुम्ही वारल्यांवर नी आमच्यावर करतांहां होय ? वारल्यांनी हिंसा केली का ? आम्हीं त्यांना तसला सल्ला दिला का ? बिचारे पिढ्यान्‌पिढ्या चालणारी गुलामगिरी झुगारून देण्यासाठी एक झाले. बिगार करायचं त्यांनी नाकारलं. रोजदारी भरपूर मिळावी अशी मागणी केली. सावकारांचीं घरगुती नी घाणेरडीं काम गुलामाप्रमाणे करणार नाही असा पुकार केला. मारहाण, विटंबना नी अत्याचार सहन करणार नाही असा जबाब दिला. जागृतीचीं हीं चिन्हं सगळीं. त्यासाठी संप म्हणजे सत्याग्रहच केला त्यांनी. पिढ्यान्‌पिढ्या मुकाट्यानं ही बेकायदेशीर गुलामगिरी सहन करण्यांत त्यांची हिंसाबुद्धि व्यक्त झाली होती काय ? त्यांचा लढा अहिंसकच होता. सत्याग्रहच होता तो. पण त्यांची जागृत संघटना नी एकजूट मोडून काढण्यासाठी सावकार-जमीदार आणि ब्रिटिश साम्राज्यशाहीची नोकरशाही यांनी दडपशाही सुरू केली. दगलबाजीनं वारल्यांना एकत्र जमवून त्यांच्यावर गोळीबार नी लाठीहल्ले करण्यांत आले. रक्तपात, जाळपोळ, या दिव्यांतून वारल्यांना जावं लागलं. हा रक्तपात नी हे अत्याचार सावकार-जमीन-दारांनी आणि साम्राज्यशाहीच्या बंदुकांनी वारल्यांची गुलामगिरी कायम राख-ण्यासाठी केले. वारल्यांच्या ढुंगणावर घासलेट ओतून त्याना पेटवून हैराण करणारे सावकार आदिवासी—सेवामंडळाला देणग्या देऊन देशभक्त झालेले होतें ! वारल्यांची नी इथल्या भिल्लांची गत वेगळी नाहीं. इथले भिल्ल सावकार-जमीदारांचे गुलाम बनवले गेलेले आहेत. त्यांचा शेतकरी पेशांत तग लागत नाहीं. सरकार आणि जमीनदार म्हणतात, की भिल्लांना कामधंदा झेपत नाही. पण पोटापाण्यापुरता काम धंदा करायला ते मोकळे नाहींत, गुलामगिरी त्यांच्या मानगुटीवर बसली आहे. सामाजिक दृष्टया ते बहिष्कृत आहेत. त्यांतले कांही जण कंटाळून पोलिस खात्यांत नोकरीला जातात. सावकार-जमीनदारांची पिळ-णूक नष्ट झाली तर, मला वाटतं, भिल्ल सुद्धा चांगले शेतकरी म्हणून पुढं येतील.

त्यांना जमिनी मिळाल्या पाहिजेत, शिक्षण मिळालं पाहिजे, सामाजिक स्थान प्राप्त झालं पाहिजे. हें सर्व कशानं साध्य होईल? राष्ट्रीय संघटनांचं हें कर्तव्य आहे की भिल्लांना त्यांच्या खऱ्याखुऱ्या उन्नतीसाठी राजकीय हक्क दिले पाहिजेत. राजकीय हक्कांवाचून कसलीहि प्रगति होऊं शकणार नाही. गुलामगिरीचा नायनाट करण्यासाठी राजकीय हक्कांचा ते उपयोग करूं शकतील. बाकीचे कोणतेहि इलाज मलमपट्ट्यांइतकेच निरुपयोगी होत. मागासलेल्या जमातींच्या उत्कर्षाचा फक्त सोविएत देशांचा एकच आदर्श इतिहासांत आहे. उज्बेक, तांजिक, चुकची वगैरे आदिवासी जमातींना स्वतांचीं स्वतंत्र राष्ट्रं बनवण्याचा स्वयंनिर्णयाचा हक्क देऊन सोविएत समाजसत्तेनं अवघ्या वीस वर्षांत त्यांना सुधारणेच्या एका उच्च पातळीवर आणून सोडलं आहे. पिळणूक संपूर्ण नष्ट केल्यामुळ या जमातींना स्वतःची आर्थिक नी सामाजिक संस्कृति विकासाला नेता आलेली आहे. त्यांच्या भाषांत वाङ्मय निर्माण होऊन नव्या समताप्रधान दुनियेच्या जीवनाचा त्यांत स्पष्ट निकाश दिसूं लागला आहे यांत्रिक नी शास्त्रीय शोध सोविएत देशांतल्या कुणाहि नागरिकांप्रमाणे त्यांच्याहि सुखांत भर घालीत आहेत. नैसर्गिक नी औद्योगिक संपत्तीचे ते सर्व समान वाटेकरी झाले आहेत. ही आदर्श प्रगति समताप्रधान अर्थ व्यवस्थेंतून नी राजकीय राष्ट्रघटकाच्या दर्ज्यांतून निर्माण झाली आहे. सातपुड्याच्या या भागांत भिल्ल, तडवी, पावरे, यांचीं एक दोन जमातराष्ट्रं निर्माण होऊं शकतील. रानडुकरांसारख्या जनावरांचा नाश करून या भागांत कपाशी नी जोधळा या दोनच धान्याशिवाय गहू, हरभरा, धणे, केळीं, भाजीपाला, तेलधान्यं, ताग, तांदूळ, वगैरे प्रकारचं प्रचंड उत्पादन होऊं शकेल. सतराव्या शतकांत नंदूरबार या भागात सर्व हिंदुस्थानांत उत्कृष्ट प्रतीचा तांदूळ होत असे असं तावर्नियर या फ्रेंच प्रवाश्यानं स्वता पाहून लिहून ठेवलं आहे. त्याशिवाय लाकूडकाम, कोळसा, कागद, कापड, रंग, वगैरे साहित्याचे मोठे उद्योगधंदे सातपुड्यांतल्या उंच पठारावरील भागांत हेच भिल्लगावरे चालवूं लागतील. पिळणुकीच्या अभावीं या जंगलाचं समृद्ध नंदनवन निर्माण होऊं शकेल, भिल्ल-पावऱ्या सारख्या मागासलेल्या वन्य जमातींच्या प्रगतीचा एकच मार्ग आहे. त्यांच्या पिळणूकविरोधी वर्गसंघटना निर्माण करून त्या संघटना राजकीय हक्कांच्या मान्यतेनंतर राष्ट्रीय चळवळींशी जोडून घेणं, हाच तो मार्ग होय. याखेरीज बाकीचे मार्ग निरुपयोगी किंबहुना परागतिकारक होतील.

तुमच्या भिल्ल-सेवामंडळाचं धोरण सर्वस्वीं सावकार-जमीनदारांच्या स्वार्थास पोषक असल्यामुळं भिल्ल-पावऱ्यांच्या उन्नतीच्या मार्गांत अडचणी आणण्याखेरीज दुसरं कांही तें करू शकेल असं वाटत नाही. राग येऊ देऊं नका. राजकारणांत स्पष्ट वक्तेपणा असणं अगत्याचं आहे. थोडं विषयान्तर झालं. तुम्ही समजतां त्याप्रमाणे आमचं कार्य हिंसेला पोषक नाहीं. पिळणूक करणाऱ्या सावकार जमीनदारांकडूनच गुलामगिरी टिकवून धरण्यासाठी हिंसेचा अवलंब केला जात असतो. बारडोलीचा संग्राम डोळ्यांसमोर आणा. आंध्र प्रांतांतील शेतकऱ्यांचा स्वातंत्र्यलढा विचारांत घ्या. वारल्याचा लढा रयतेच्या दृष्टींतून थोडा वेळ पाहा. भिल्लांचे मूलभूत प्रश्न विचारांत घ्या. तुम्हाला दिसून येईल की वर्ग संघटनाखेरीज तरणोपाय नाहीं. लाठीहल्ले नी गोळीबार सहन करून या वर्ग संघटना अशाच पुढं जातील. हृदयपरिवर्तनानं हे प्रश्न सुटणार नाहीत. हृदय परिवर्तनानं हे प्रश्न सुटणार नाहींत. हृदय परिवर्तन हें मूर्खांचं नंदनवन आहे."
"माझा तर हृदयपरिवर्तनावर विश्वास आहे बुवा. त्याला इलाज नाही."
"नी म्हणूनच धुडकू कोळ्याची जमीन जगनशेटजींच्या घशांत उतरावी म्हणून तुम्ही प्रयत्न करीत आहात!"

"चुकतां तुम्ही. सगळं कर्ज माफ करून शेती पुन्हा त्यालाच खेडायला द्यायला शेटजी तयार आहेत."

"केवढं तें कर्ज? आजपर्यंत त्या कर्जाची दसपटीनं फेड झाली देखील. आणि पाचशे रुपयांच्या नखूशा रकमेवर त्याची सगळी शेती शेटजी गिळंकृत करणार! खासा न्याय आहे. शेती त्याला खेडायला देऊन न देऊन होणार काय तर खंडकरी म्हणून अमानुष कर्जदारांत नी गुलामगिरींत शेटजी त्याला पूर्ववत् अडकवून ठेवणार! पण शेटजींचे दिवस भरले आहेत. कर्जनिवारण-कायदा तुटपुंजा असला तरी त्याच्या अंमलबजावणीचा अल्पसा फायदा शेत-कऱ्यांना मिळावा म्हणून प्रयत्न करण्याऐवजी भलतंच राजकारण तुम्ही खेळत आहात. बाकी हृदय परिवर्तनावर तुमचा विश्वास आहे हें विसरलोंच की मी!"

"माझा विश्वास आहे नी मला त्याची लाज वाटत नाही. मी त्याच संस्कारात वाढलों आहें. माझे वडील, त्यांचे हितमित्र नी एकंदर घरगुती वाता-

वरण, सारं याच संस्कारांना पोषक होतं. तेच संस्कार मी आचरणांत आणले. त्याच निष्ठेन मी राजकारणांत पडलों. कदाचित् तुमच्या मतं मी चुकत असेन. पण त्याला माझा नाइलाज आहे. मी कदाचित् पक्का सत्याग्रही बनलों नसेन, पण म्हणून हृदयपरिवर्तनाचं तत्त्व चुकीच ठरूं शकत नाही. प्रत्यकानं प्रामाणिकपणान आपापलं कार्य करीत राहायला माझी हरकत नाहीं."

"तुमच्यासारख्या असंख्य प्रामाणिक अंध कार्यकर्त्यांचा फायदा भांडवलदारांना नी सावकारांना मिळत आहे बुरसलेल्या मध्ययुगीन पिळणुकीच्या आधारावरील गुन्हेगारी समाजव्यवस्थेचे तुम्ही नकळत आधारस्तभ होत आहांत."

"जाऊं या. वादविवादांतून काय निष्पन्न होणार आहे? तुम्हीं कांहीतरी विधायक कार्य केल्यानं मला आनंदच वाटेल. चला जाऊं या."

रामभाऊंनी घोड्याची लगाम खैराच्या बुडांतून काढली आणि हातांत धरून ते मिठारामबरोबर चालूं लागले. सूर्य बराच वर आला होता. जंगलाचा नूर अजिबात बदलून गेला होता. बिड्यांचीं पानं तोडणारे उपाशीपोटी भिल्लांच्या वस्तीचं 'आव्यापाण्या' वरलं दृश्य मिठारामच्या डोळ्यासमोर उभ राहिलं. नी तो स्वताशीच पुटपुटला—"अजून शक्ति पणाला लागायची आहे."

रामभाऊ निसर्गशोभा पाहण्यांत दंग झालें होते.

---

# ५

भडक हिरव्या नी केशरी रंगांच्या भिंतींच्या ओसरीवजा दिवाणखान्यांत जगनशेटजींची अस्वस्थपणें सारखी येरझार चालली होती त्यांची त्रेधा उडायला तसलंच कारण घडलं होतं. आजपर्यंत दृष्टिपातावरोबर भिल्ल-पाव-न्यांच्या नी कुणबी-कोळयांच्या छातींत धडकी भरवणारे त्यांचे डोळे रागानं पण कांहीशा हताशपणानं लालबुंद होऊन त्यांच्या अस्वस्थपणांत भर घालूं लागले. बगलेंतला घाम खादीच्या रुमालानं पुशीत ते हुश्य हुश्य करीत आपल्या एकुलत्या एक सुशिक्षित चिरंजिवाच्या नावाचा उद्धार करीत होते. आपल्या सावकारी धंद्याला शाळा-कॉलेजांतल्या शिक्षणाची काडीइतकीसुद्धा गरज नसून केवळ लोकांत लौकिक गाजावा आणि वैभव खुलून दिसावं म्हणूनच आपण मुलाला इतकं शिक्षण दिलं हें मनानं स्वताशी कबूल करून सुद्धा मुला-च्या अलीकडल्या चाळयांना आपण आळा घालण्याची सावधगिरी बाळगली नाही याचं त्यांना वाईट वाटत होतं नी स्वतावरहि ते दात ओठ खात होते.

शिक्षणाचा परिणाम उधळपट्टींत झाला असता किंवा अनीतीचा अवलंब जरी चिरंजीव महाशयांनी केला असता तरी त्यांनी एक चकार शब्द उच्चारला नसता. कारण श्रीमतीला उधळपट्टी आणि स्वैराचार ही शोभून दिसतात असं त्यांचं प्रामाणिक मत होतं ! विलायतेच्या सफरींत मुलानं पैसा घालवला असता, तरीहि त्यांनी स्वता होऊन त्याचे ते लाड पुरवले असते.

पण मुलाचं तें व्यसन—राजकारणाचं तें घरजाळू व्यसन—त्यांना आज बेजार करीत होतं. तसं म्हटल्यास ते स्वता का थोडं राजकारण खेळत होते ? राजकारण हा त्यांच्या धंद्यांतला एक फार मोठा किफायतशीर भाग होऊन बसला होता. देशभक्तीच्या नावाखाली नी खादीच्या बुरख्याखाली त्यांच्या पिढीजाद सावकारी धंद्याला अपूर्व तेजी आलेली होती. मुलानं असलं राजकारण केलं असतं तर शेटजींना स्वर्ग दोन बोटं देखील उरला नसता. पराड्यावरच्या वेलाचं फळ अलगद तोडून घेणं जितकं कठीण तितकंच मुलाचं घरजाळू राजकारणाचं व्यसन आटोक्यांत आणणं त्यांना कठीण वाटलं. आणि मुलाला राजकारणांत संगत तरी प्रतिष्ठित नी श्रीमंत लोकांची होती म्हणावं तर तसंहि नाहीं. मिठाराम नी झिपरू यांच्या राजकारणांत तो सापडला होता. कम्युनिष्टपक्षाचा तो कार्यकर्ता सभासद झाला होता. पण हें सगळं गुप्त होतं. एक दोनदा सुंदऱ्या भिलाच्या झोंपडींत मिठाराम नी झिपरू यांच्या बरोबर कसल्याशा मसलतींत भाग घेतांना त्याला कन्हूशेटांनी पाहिलं होतं. जगनशेटजींना दोघांचे घा शेटजींनी याबद्दल दोष दिलाहि होता. आपली खिर्डी होणार असं शेटजींना वाटूं लागलं. पण मध्यंतरी चिरंजीव महाशय मुंबईला कसल्याशा निमित्तानं निघून गेले होते, त्यामुळं त्याचे राजकारणाचे चाळे जिरले अशी शेटजींची भावना झाली. पण चिरंजीव परत आले ते एखाद्या क्रांतिकारक नेत्याच्या उत्साहांत ! कर्ज निवारण कायदा लागू झाल्या-मुळं चोपडा-यावल तालुक्यांतल्या शेतकऱ्यांत किसान सभेच्या कार्याचा प्रचार करण्यासाठी तो आला होता. या तालुक्यांतली बहुतेक शेती जगनशेटजींची नी बाकीची कन्हूशेठ, हिरालाल शेठ वगैरे देशभक्त सावकारांची होती.

मुलाचा निर्धार ऐकून शेटजींची अवखात फाटली. त्याला सामोपचारान त्याच प्रमाणे धाकदडपशानं त्या कामापासून परावृत्त करायची त्यांनी कोशीस

केली, पण ती निष्फळ झाली. शेताच्या मेरावर पाऊल टाकावं तोंच एखादा पारडी भुर्रदिशी उडून जावी; पुन्हा थोडं पुढं जावं तों सासूल ऐकतांच ती आणखी पुढं भराऱून निसटून जावी, त्याचप्रमाणे चिरंजीव महाशय शेटजींच्या हातून निसटून गेले. चौदाव्या रत्नाचा प्रसादहि परिणामकारक ठरूं शकला नाहीं. "असलं आत्मघाताचं नी मुक्कड लोकांचं राजकारण खेळायचं असेल तर आताच्या आता चालता हो." ही शेटजींची पडत्या फळाची आज्ञा घेऊन जीवन घरादारावर पाणी सोडून निघाला. खेडोपाडी जाऊन गल्लयांतून ओरडत नी सभांतून गर्जत तो रयतेला सांगू लागला—

"शेतकरी बंधूंनो, तुमची गुलामगिरी पूर्णपणें नष्ट करण्यासाठी तुम्हीं स्वताच्या सामर्थ्यावर किसान सभेच्या झेंड्याखाली अभेद्य एकजूट उभारली पाहिजे. तुमच्या कर्जाचा प्रश्न अत्यंत बिकट आहे. कर्जापायीं आजपर्यंत तुम्हीं सावकारांच्या घरांत इतकी भरपाई केली आहे की तुम्हांला कर्जांतून मुक्त करण्यासाठी सगळं कर्ज रद्द करणाराच कायदा पाहिजे आहे. पण तुमची संघटना नव्हती म्हणून तुटपुंजा कायदा पास झाला. दगडाहून वीट मऊ या न्यायानं या कायद्याचा लाभ तुम्हीं घेतला पाहिजे. सावकारांचे अत्याचार कसकसे असतात हें तुम्हांला कुणी नव्यानं सांगायला नकोत कर्जांत पिचणारे गुलाम या नात्यानं ते तुम्हांला नी एका बड्या सावकाराचा मुलगा म्हणून मला माहीत आहेत. सावकार जमीनदारांची अंडीपिल्लीं तुम्हांला नी मला ठाऊक आहेत. माझ्या वडिलांनी आजपर्यंत कसकशा अन्यायानं तुमची शेतीवाडी, घरंदारं, चीजवस्त जित्रापं, घशांत घालून तुम्हांला नाडलं आहे हें मला ठाऊक असल्यामुळं तुमच्यांत येऊन कार्य करायची माझी इच्छा आहे. माझे वडील देशभक्त काँग्रेस पुढारी म्हणवतात. त्यांची देशभक्ति किती सोज्वळ आहे हें मान घालून बसलेल्या बगळ्याला ज्यांनी पाहिलं असेल ते सांगू शकतील. देशभक्तीचा बुरखा घालून आपलीं पापं झाकावीं, आणि वर लोकांचा उद्धारकर्ता म्हणून मिरवावं हा अनेक सावकारांचा कावा आहे. राजकारण हा त्यांचा किफायतीचा धंदा होऊन बसला आहे. माझ्या वडिलांना या युद्धकाळांत धान्याच्या काळ्याबाजारांत अतोनात नफा झालेला आहे. कापडांत त्याना पूर्वीच्या चौपट म्हणजे साडेसात लाख रुपये नफा झाला. हा नफा फक्त दुकानांतल्या मालावरला आहे. या चार

वर्षांत त्यांनी शेतकऱ्यांचा जमीनजुमला जप्त केला, त्यांच्या पोराबाळांना देशो-धडीस लावलं. मागील कर्जाच्या पायावर कर्जदारी शेतकऱ्यांच्या मानगुटीस बसली आहे एक माप ज्वारीच्या मोबदला दोन बिघे शेती गहाण ठेवल्याचे प्रसंग नमूद आहेत. नागलवाडीच्या कवतिक पुनाची बायको बाळंतीण असताना जप्तींत बाळंतिणाची खाटसुद्धा लिलावांत विकण्यांत आली! चहार्डीच्या एका भिलाच्या झोपडींतली झाडून सगळी चीजवस्त त्याच्या एकदोन जित्रापाबरोबर विकण्यांत आली. वैजापूरच्या कालुसिंग पावऱ्याचे बैल जप्त करण्यांत आले आणि वर उदारपणाचं प्रदर्शन म्हणून त्याला व्याजाची निमपट सूट देण्यांत आली. पण व्याजापायीं आजपर्यंत त्यानं मुद्दलाच्या अडीचपट रकम भरली होती. मी आकडेवारीनिशी सर्व सिद्ध करून देऊ शकेन. शिवाय तुम्ही सर्व शेतकरी हें जाणतां. वीरवाड्याच्या किसन माणकूनं पाच वर्षांपूर्वी पन्नास रुपये घेतले होते. त्यानं आजपर्यंत दीडशे रुपयांची भरपाई करूनसुद्धा कर्जाची बाकी एकशेपंच्याऐंशी रुपये काढण्यांत आली आणि त्याचं दोन बिघ्याचं शेत जप्त करून त्यालाच खेडण्यासाठी देण्यांत आलं. वर उपकार म्हणून त्याला मोडके तोडके बैल घेण्याकरता तीनशे रुपये दिढीच्या व्याजानं कर्जाऊ म्हणून देण्यांत आले. चोरड्याच्या कन्हूशेटनं कर्जापायीं कैक भिल्लाच्या नी कोळी कुणब्यां-च्या बायकांना नी मुलींना आपल्या बिछान्यावर लोळवून त्यांचं शील भ्रष्ट केलेलं आहे. कित्येक ठिकाणीं भिल्लांना सरळ मारहाण करण्यांत आली. सावकारांचा जानीदोस्त रेंजरसाहेब सेटलमेंटमधल्या कोळ्या कुणब्यांना नी भिल्ल-पावऱ्यांना सारखा लुबाडीत नी मारहाण करीत असतो.

"हे सगळे अत्याचार तुम्ही आजवर सहन करीत आलां आहात. तुमची सहनशीलता आणि शांतवृत्ति पाहून प्रत्यक्ष परमेश्वरानं देखील जन्मो-जन्मीं तुमचे पाय चुरत बसावं. पण आता काळ बदलला आहे. पिढ्यान्‌पिढ्या तुम्हांला नागवणारे सावकार-जमीनदार आणि रेंजरसाहेबांसारखे सरकारी नोकरशहा याना धडा शिकवणं तुमच्याच हातांत आहे. तुम्ही किसान सभेच्या लाल झेंड्याखाली एक व्हा आणि पुकार करा की कमानेवाले खायेंगे, सावकार शाही जमीन दोस्त करूं. एक व्हा म्हणजे तुम्हांला दिसून येईल की तुमची गुलामगिरी हळुहळू नष्ट होत आहे. कर्जनिवारण कायद्याचा लाभ घेण्यासाठी

हजारोंनी अर्ज करा. किसान सभेच्या कचेरींत अर्ज दाखल करा, तक्रारी नोंदवा. माझ्या वडिलांचीं जीं कुळं आहेत त्यांनाहि माझं—जगनशेटजींच्या या मुलाचं-सांगणं आहे कीं कर्जापायी तुमची घरंदारं, शेतीवाडी, चीजवस्त नी जित्रापं आम्हीं जप्त केलीं, मुद्दलाच्या दसपटीनं भरपाई करून घेतली, सबब तुमच्या कर्जाचा प्रश्न सुटला पाहिजे. तुम्हांला लुबाडणाऱ्या सावकारांना—त्यांत माझे वडीलहि आलेत —योग्य शासन झालं पाहिजे. माझे वडील तुम्हांला धाकदपटशा दाखवून अर्ज करण्यास मना करतील, तुम्ही त्यांचं ऐकू नका. माझ्याकडे या. किसान सभा तुमची आहे. तुम्ही फक्त अर्ज करा म्हणजे तुमचे प्रश्न किसान सभा शेवटास नेईल. भिऊं नका. उठा, असेल माझा हरी तर देईल खाटल्यावरी ही वृत्ति सोडून द्या. सावकारशाहीला एकजुटीचा गुद्दा दाखवल्या शिवाय तुमची दुर्दशा थांबणार नाहीं. जगन शेटजींचा मुलगा तुम्हांला सांगत आहे—स्वतांची प्रचंड ताकद उभारा. किसान सभेचे सभासद व्हा. मीं किसान सभेच्या कार्याला सर्वस्वीं स्वताला वाहून घेतलं आहे."

गावोगावच्या भिल्ल पावरे नी कोळी—कुणबी शेतकऱ्यांवर जीवनाच्या धडाकेबाज प्रचाराचा प्रभावी परिणाम होऊं लागला. झिपरूबरोबर जीवन खेड्यापाड्यांत हिंडत होता. मिठाराम तोंपर्यंत भिल्ल—पावऱ्यांच्या प्रश्नावर नोंद तयार करण्यासाठीं त्यांच्यांत हिंडून वस्तुस्थितीचं अवलोकन करीत होता. सुंदऱ्या जरी ढोरक्याचं काम करीत होता तरी या प्रचारानं तो भारला गेला होता. पुढंमागं किसान सभेचा कार्यकर्ता व्हायची संमति त्यानं देऊन ठेवलीच होती. या श्रमवीरांनीं शेतकऱ्यांना जागृत केलं किसान सभेच्या कार्यालयंत त्यांची रीघ लागून राहूं लागली

× × ×

लालबावट्याच्या प्रभावी प्रचाराला आळा घालण्यासाठी पांडुरंग गुरुजी जगनशेटजींच्या हस्तकांना घेऊन सभा घेत हिंडत होते. सभावर शेतकऱ्यांनी बहिष्कार घातला होता. पण जे कांही लोक सभांतलीं भाषणं ऐकण्यासाठी जमत त्यांना गुरुजी सांगत कीं, "लालबावटेवाल्यांच्या प्रचाराला भूलूं नका.

हे लोक देशद्रोही आहेत, रशियाचे हस्तक आहेत, स्वतांच्या राजकीय स्वार्था-साठी तुमचा उपयोग करून घेतील, तुम्ही काँग्रेस पुढाऱ्यांवर विश्वास ठेवा. तेच शेतकरी-कामकरी जनतेचं राज्यस्थापन करतील. तुमचे प्रश्न सामोप-चारानं सुटण्यासारखे आहेत. धीर धरा. लालबावटेवाल्यांना तुमच्यांत येऊं देऊं नका. लालबावटा रशियाचा आहे रशियाची हुकमत तुमच्यावर स्थापन करण्याकरता हे लोक तुमची मनं काबीज करतील आणि काँग्रेस विरुद्ध तुम्हांला चिथावतील. हे लालबावटेवाले अत्याचारांना चिथावणी देतात. वारली लोकांना यांनी चिथावून त्या भागांत अत्याचार केले. हे लोक मांसाहार आणि अनीति करीत असतात. खादीची चेष्टा करतात. रशियाकडून यांना पैसा मिळतो. तिकडूनच त्यांचं राजकीय धोरण ठरवलं जातं. देशाची नी देशांतल्या रयतेची यांना बिलकूल पर्वा नाहीं. फसूं नका. लालबावटे-वाल्यांना चोपून काढा. यांचा नायनाट केल्याशिवाय देशाला स्वातंत्र्य मिळणार नाहीं " वगैरे.

एका सभेत जगनशेटजींच्या उचलचोखंड्या पित्त्यांनी मुद्दाम डुकर धुसवून दिलं. त्यासरशी डुकराला हाकलण्यासाठी लोकांनी एकच घेगाट केला नी दगड फेकले. त्यासरशी पांडुरंग गुरुजी तावातावानं बोलूं लागले, " हे लालबावटेवाले सभेत लपून बसतात आणि दगड फेकून सभा मोडायचा प्रयत्न करतात. यांची गुडगिरी झोडपून काढली पाहिजे. या देशद्रोही लोकांना चार पावलं दूर ठेवा. "

कांही गावांत गुरुजींना सरळ शेतकऱ्यांकडून रोखठोक जबाब मिळत. डोंगऱ्या भिल भर सभेत उठून बोलला, " जीमू बोलतस काय त्यामा काही जीव स ? लालबावटा उना म्हनी आम्हु धीट बनन्त. शावकारवान्याना जुलूमन आम्हना सत्यानास करी दिन्हा. आते आखोर काय व्हवाउ स ? लाल-बावटावालास्नी काय तुम्हना घोळा मारात ते त्यास्ले गाया देतस ? मुगामुगा उनात तसा घर जायजात. आठे पीरपीर करशात ते किसानसबाना भिलटानासंगे गाठ स. याद ठी ल्या. बोला लालबावटे की जय. "

आणि खरोखरच सगळी सभा लालबावट्याचा जयजयकार करून उठली. गुरुजींनी वेळप्रसंग जाणून चंबुगबाळं उचललं आणि चोपड्या-यावलकडे

जाऊन सभांतून लालबावट्याविरुद्ध शिमगा सुरू केला. कर्जनिवारणकायद्याच्या प्रचारासाठी गुरुजींनी एक शब्दहि उच्चारला नाहीं. तीच गोष्ट रामभाऊची. शेतकऱ्यांनी किसान सभेकडे अर्ज करूं नयेत म्हणून जगनशेट शक्य त्या सर्व मार्गांनी त्यांना दहशत घालीत होते. थोड्या प्रमाणात कां होईना त्यांना या कामीं यश मिळत होतं. आता त्यांचा मुलगा जीवन हाच किसानसभेला जाऊन मिळाल्यावर त्यांचे प्रयत्न निष्फळ होत चालले. पण भांडवली स्वार्थाला पिता, पुत्र, पत्नी, कन्या हीं नातीं दिसत नसतात. त्या स्वार्थाला निसर्गाचीं हीं पवित्र नातींदेखील सलूं लागतात. मुलाचं तोंडहि पाहणार नाहीं अशी प्रतिज्ञा करून शेटजी आपले कावे खेळतच राहिले. वीरवाड्याच्या भिल्ल शेतकऱ्यांत शेटजींची कर्जदारी होती. त्यांनी त्याच्या घरावर जप्ती आणली. धुडक्या कोळ्याची शेती त्यांनी लबाडी करून घशांत घातली. बहिऱ्या भिलाच्या शेतांत औत घालण्याची त्यांनी धमकी दिली. पण बहिऱ्यानं किसानसभेंत तक्रार नोंदवली होती.

सकाळीं उजाडतांच शेटजींचा गुमास्ता धोंडूशेट शेतावर दाखल झाला. अकरा वाजेपर्यंत उभयपक्षांची बोलाचाल नी घासाघीस चालू होती. शेतावर बहिऱ्या भिल्ल बायकोपोरांसह आला होता. गावांतले पाचपन्नास भिल्ल नी कोळीहि जमा झाले होते. सर्वांना जीवनची नी झिपरूची आठवण होत होती. पण ते दोघे वडतीला प्रचारासाठी गेलेले होते.

धोंडूशेट बरोबर जगनशेटजींचे कांही हस्तकदेखील होते. दोन तर अट्टल मवाली होते. बळजबरीनं औत हाकलून शेत ताब्यांत घ्यायचा शेटजींचा घाट होता.

निष्फळ बोलाचाल झाल्यावर बहिऱ्यानं मोठ्यानं रडायला सुरवात केली. त्याचीं बायकापोरंसुद्धा रडूं लागलीं. औतापुढं जाऊन पडलीं.

"हाकला रे" म्हणून धोंडूशेटचा पुकार होतो तोंच बाजूच्या जंगलांतल्या रस्त्यानं कैकाड्या आंगकाठीचा, खांद्यावर कुऱ्हाड घेतलेला, सुंदऱ्या भिल येतांना सर्वांच्या नजरेस पडला. जमाव पाहूनच सुंदऱ्याला काय प्रकार आहे याची कल्पना आली असावी. त्यानं मेरावरूनच दरडावून आरोळी दिली—"कोन स खेतना ताबा लेनार? मांघळला मोव्हरला इचार देखी ले म्हन्तं! (कोण आहे शेताचा ताबा घेणार? मागचापुढचा विचार पाहून घे म्हटलं!)"

सगळ्या जमावांत एकच उभारीची लाट उसळली. सुंदऱ्याची मर्दुमकी सगळ्यांना ठाऊक होती. जवळ येऊन त्यानं विचारपूस केली आणि परत जायचा सल्ला धोंडूशेटला दिला. " मला काय, मी हुकमाचा ताबेदार आहे." धोंडूशेट डोळे वटारीत बोलला, " शेटजींनी सांगितल तें मला केलंच पाहिजे. त्यांना जाऊन सांगा."

" आरे माल्हम स तो जगन्या. वान्यामा वानी स. पन त्यान्हा आंडोर आते लालबावटामा उना. स कोठे ? भरान्तीमा स का ? शेटले सांग आते तुन्हा कावा तुपे न्हाऊ दे म्हन्तं. मोठा उना दिमाख दखाळाले. घर जावानं स का सुंदऱ्याना ताम्हासा देखस ? ( अरे ठाऊक आहे तो जगन्या. सावकाराहून सावकार आहे बेटा. पण त्याचा मुलगा आता लालबावट्यात आला आहे. आहेस कुठं ? भ्रांतींत आहेस का ? शेटला सांग की आता तुझे कावे तुझ्या-पाशींच राहूं दे. मोठा आलाय् दिमाख दाखवायला. परत जायचं आहे का सुंदऱ्याचा तमाशा पाहतोस ? ) " सुंदऱ्या गरजला. धोंडूशेट अँ अँ करीत पाहूं लागला. तोंड उघडंच राहिलं त्याचं.

जगनशेटच्या मवाली हस्तकांना असल्या प्रकारांची सवय होती. आटमुठे-पणा करून त्यांनी औत चालवायला सुरुवात केली. कुऱ्हाड उचलून सुंदऱ्या पुढं धावतांच एकदोघांनी बाचाबाची करून त्याची कुऱ्हाड हिसकावून घेतली. जमावांत एकच गवेटी उडाली. बहिऱ्याच्या बायकोला एका मवाल्यानं फरफटत औतापुढून बाजूला खेचलं. धाय मोकलीत बहिऱ्या पुढं आला आणि आपल्या तेरा वर्षांच्या पोराला उचलून त्यानं औताच्या दगडावर त्याचं डोकं धाडदिशीं आपटलं. जमावांत एकच आकांत उडाला. पोराच्या डोक्यांतून रक्ताच्या चिळकांड्या उडाल्या. " मर पोऱ्या ! " बहिऱ्या आवाज ताणून गळा काढूं लागला, " शावकारवान्यानि माल्हे जलमभरी नाळ, आते खेतना तुकळाबी त्यान्ह नळ्ळामा घाली देस. जित्ता न्हाशी ते बापले सराप देशी आन म्हनशी की बापनि माल्हे करजदारीमा आटकाळी ठेत्र, शावकारना गुलाम वन्हाई ठेवं. लेकरूना सराप च्युकाळानंकुन्ता त्यान्हा परान ली लिन्हा मन्हि. आते पोऱ्या, देवनाघर जाई सांग की हाइ दुन्यामा किरशान ना वाली कोनि

न [illegible], बाप करज [illegible]कातानं [illegible]न्ता बेटाना जीव लेस. त्या जगनशेटना पाप देवपे लिख्नेल सत. मी आते दुन्यामा सांगसू, कि शावकार वान्यानि मन्हा आंडोर मारी टाका. कोरटमा बी हाइस सांगसू. मरी ग्या पोरगा ! पोरगा मरी ग्या रे मन्हा ! शावकारांन मन्ह आंडोर मारी टाका. आते हुई ज्याऊ द्यात काय व्हवाऊ स ते. बापनि पोरगाले करजदारीमाईन छोळाइ दिन्हं त्यान्हा परान लीं. आनि मन्हा आमना पुरा हुई गइ. सुंदऱ्या, धनसिंग डोंगऱ्या, धुळक्या, तुम्हु साक्सीदार सत. मन्हा पोरगा शावकारनि मारी टाका करज-दारीमा जलमभरी नाळाई गऊ, आत गा नहि ते मन्हा पोरगा त्याम्हाईन सुटी ग्या. देवना घर ग्या तो. हाऊ जगनशेट देवनाघर मन्ह पोरगापे पयसा मांगाले कसा जाई आते ? ( मर पोरा ! सावकारवाण्यानं मला जन्मभर नाडलं, आता शेताचा तुकडासुद्धां त्याच्या नरड्यांत घालून देतों. जिवंत राहाशील तर म्हण-शील, ' बापानं मला कर्जदारीत गुंतवून ठेवलं, सावकाराचा गुलाम बनवून ठेवलं. ' लेकराचा शाप चुकवण्याकरता त्याचा मी प्राण घेतला. आता पोरा, देवाच्या घरी जाऊन सांग की ह्या दुनियत शेतकऱ्याचा कुणीच वाली नाहीं, कर्ज चुकवण्यासाठी बाप बेट्याचा जीव घेतो. त्या जगनशेटची पापं देवापाशी लिहिलेलीं आहेत. मी आता दुनियेंत सांगेन की सावकारवाण्यानं माझा पोरगा मारून टाकला. कोर्टांतसुद्धां हेच सांगेन. गेला. मेला पोरगा. माझा पोरगा मेला रे. सावकारानं माझ्या पोराचा बळी घेतला. आता जें व्हायचं असेल तें खुशाल होऊन जाऊं द्या. पोराला कर्जदारींतून सोडवण्यासाठी बापानं त्याचा जीव घेतला ! आता माझी आमना पुरी झाली. सुंदऱ्या, धनसिंग, डोंगऱ्या, धुळक्या, तुम्ही साक्षी आहांत. माझा पोरगा सावकारान मारला. छान झालं कर्जदारींत मी जन्मभर नाडला गेलों, पण माझा पोरगा तिच्यांतून सुटला, देवाच्या घरी गेला तो. तो जगनशेट देवाच्या घरीं माझ्या पोरापाशी बापाच्या कर्जाचे पैसे मागायला कसा जाईल ? )"

पोटच्या गोळ्याला मिठी मारून ओरडून आकांत करणाऱ्या बायकोला हिसड्यासरशी बाजूला करून बहिऱ्या बोलूं लागला, " व, लळस कसाले ? बापना मांघे जित्ता ऱ्हाता ते करजदारीपाये सराप देता. हाशी ले आते. आपना आंडोर करजमाईन छुटना ते हाशी ले. व येळी, लळस कसाले ? मन्ह आत्माले

संतोस हुई व्हायना ! ( अग, रडतेस कशाला ? बापाच्या मागं जिवंत राहिला असता तर कर्जदारीपायीं शाप देत राहिला असता. हासून घे आता. आपला पोरगा कर्जातून सुटला म्हणून हासून घे !! अग वेडे, रडतेस कशाला ? माझ्या आत्म्याला संतोष होत आहे ! ) "

बिचाऱ्या त्या बाईला पोरगा दगावल्याचं दुःख होत होतं. बहिऱ्याचं अविचारी तत्त्वज्ञान तिला कुठलं कळायला ? वंशपरंपरा चालत आलेलं राजघराणं तख्तावरून पदच्युत होईल पण कर्जाचा भस्मासुर अधिकच सार्वभौम बनत जातो, त्या भस्मासुराला आपल्या मुलाच्या कैक पिढ्यांच्या शिरावरून पदच्युत करण्यांत बहिऱ्यानं यश मिळवलं होतं.

बायकामाणसांचा आकांत नी घेवाट पाहून सुंदऱ्यानं मारामारी सुरू केली. जगनशेटच्या हस्तकांनीहि दोन हात केले. एकच गबेटी उडाली. धोंडूशेट चोट लागून ढेकळांत पडला. मवाली हस्तकांनाहि जखमा झाल्या. जमावांतल्या भिल्लांचा नी कोळयांचा संताप अनावर होऊन त्यांनी शेटजीच्या पि[illegible]यांना चांगलेच टिमकाडलं.

सावकारशाहीनं बहिऱ्याच्या संसाराचा नी माणुसकीचा पुरेपूर बळी घेतला !

× × ×

मिठाराम रामभाऊंच्या घरून निघाला तो गाडरस्यानं बजेबजे चालत अंतर कापीत होता. खोदऱ्या ओलांडून सपाट माथ्यावर आल्यावर त्याला बहिऱ्याच्या शेतांतला अत्याचार कळला. डोंगऱ्या भिल नी कालुसिंग पावऱ्या या दोघांनी त्याला सगळा प्रकार घडला तसा सांगून टाकला. आता मोठीच तोहमत ओढवली या विचारानं तो क्षणभर विचारांत पडला. बहिऱ्यानं जरी स्वतां होऊन मुलाला औतावर आपटून त्याचा जीव घेतला होता तरी सावकारशाहीच्या पिळणुकीचाच तो अनेकांपैकीं एक परिणाम होता. प्रकरण कोर्टांत चांगलं रंगणार याविषयीं त्याला शंका राहिली नाहीं. बहिऱ्याच्या पोराला जगनशेटच्या हस्तकांनीच मारलं असा जाब देण्याबद्दल गावांतल्या लोकांचा मनसुबा झाला होता. बिकट पेच येऊन ठेपल्यामुळं काय करावं हें मिठारामला

सुचेना. तो डोंगऱ्याला घेऊन तसाच पुढं गेला. गावांत सगळ्या लोकांना त्यानं एका निंबाच्या झाडाखाली जमवलं आणि भावी संकटाची सूचना दिली. बहिऱ्याच्या मुलाच्या प्रेताचा पाटलानं पंचनामा करण्यासाठी तें चावडीवर नेलं होतं आणि पोलीस मागवले होते. संध्याकाळपर्यंत पोलीस येतील अशी त्याला खात्री होती. कर्जानं गांजून वैतागानं बहिऱ्यानं करूं नये ती गोष्ट करून टाकली होती. शेटजींनी शेत ताब्यांत घेतलं असतं तर किसानसभेनं तें काम चालवलं असत. पण पुढाऱ्याचा शहाणपणा नी कायद्याच्या ज्ञानामुळ येणारा धीर नाड-लेल्या जनतेंत एकदम कुठून यावा ? सहनशीलतेची परमावधि होऊन रयतेच्या हातून अशा गोष्टी घडून जातात. त्यांतून रयतेला बचावणं हेंच पुढाऱ्यांचं कर्तव्य. पोलीस येऊन धरपकड करतील, शेटजी आणि त्यांचे हस्तक नामा-निराळे राहतील, याविषयीं शंका नव्हती. वडतीला झिपरू नी जीवन प्रचारा-साठी गेले होते. त्यांच्याशी या गंभीर गोष्टींचा खल करणं अगत्याचं होत. मिटाराम गावाबाहेरील दोन मैलांवरच्या झाडींत एका भिल्लाच्या घरीं गेला. गावांतून बातम्या आणण्याचं काम डोंगऱ्या नी काळूसिंग करणार होते आणि तोंपर्यंत वडतीला जाऊन धुडक्यानं झिपरू नी जीवन यांना घेऊन यावं असा मनसुबा ठरला.

इकडं शेताचा ताबा मिळाल्याच्या वार्तेची अपेक्षा करीत जगनशेट राम-भाऊंकडं येऊन बसले होते. धोंडूशेटला मार्गी लावून ते स्वता तांगा घेऊन इकडं आले होते. रामभाऊंची भेट एका आठवड्यांत झालेली नव्हती, म्हणून तोहि दुसरा उद्देश होताच. एक दिवस राहून रामभाऊंकडून मिटाराम परत जायला निघाला त्यानंतर दोनतीन तासांनीच शेटजी तिथं येऊन थडकले होते. अर्थात् मिटारामची न् त्यांची चुकामूक झाली म्हणून बरं, नाहीपक्षीं लाल-बावटेवाल्यांशी इतके घनिष्ट संबंध ठेवल्याबद्दल भाऊंना त्यांचीं बोलणीं ऐकावीं लागलीं असतीं. भिल्लसेवामंडळाचा लालबावट्याविरुद्ध कसकसा प्रचार चालावा या बाबत शेटजींनी भाऊंना बरंच चऱ्हाट ऐकवलं. बहिऱ्या भिला-च्या शेताचा ताबा घ्यायला गुमास्त्याला रवाना केल आहे, थोड्या वेळानं आपण स्वताहि जाणार आहोंत यापलीकडे त्या दिवसाच्या गोष्टींची कसलीच जास्त माहिती त्यांनी भाऊंना दिली नाहीं. कोंडवाड्यांतलीं गुरं समोरच दिसत

होतीं. त्याबाबतची हकीगत ऐकून शेटजींनी ढोरक्यांच्या नावानं खूप वटका केला. " हे ढोरके सगळे मातून गेले आहेत वेटे. आहेत तरी जातीनं भिल्लच की नाही ? कमालीचे शिरजोरखोर. मालक कोंडवाड्याचा दंड भरील. यांचं तें काय जाणार ? यांना चोपून पैसे वसूल करावेत यांच्या पासून " वगैरे त्यांची बडबड चालूच होती. सावकार-जमीनदारांचीं ढोरं सकाळीच दंड भरून सोडवून घेण्यांत आलीं होती. दंडाचे पैसे ते नेहमीप्रमाणे ढोरक्यांपासूनच वसूल करणार. दुसरे गरीब शेतकरी आपापलीं ढोरं सोडवून घेऊं शकले नाहींत. पाटील कोंडवाड्यांतल्या ढोरांच्या खावटीबद्दल वेगळा दंड आकारीत असला तरी ढोरांच्या पोटांत कितपत चारा जातो हें त्यांचीं कप्पे लागलेलीं पोटं सांगत होतीं. आणखी आठच दिवसांनी या ढोरांचा लिलाव झाला तर आश्चर्य नाहीं. लिलावाच्या वेळेस जमीनदार बाप्पा स्वस्त किंमतींत हीं ढोरं लाटतात नी पुन्हा भरमसाट किमती घेऊन शेतकऱ्यांच्या माथीं मारतात. युद्धकाळांत सावकार-जमीनदारांना मातीहि सोन्याच्या मोलाची वाटूं लागली तर नवल काय ?

जेवण आटोपल्यावर शेटजींनी भाऊंना विचारलं, " रामभाऊ, तुम्ही— फार भिडस्त आहांत बुवा. तांदूळ तसे आपल्याकडं पुष्कळ आहेत. नुसता निरोप द्यायला अवकाश की एखादं पोतं रवाना करून दिलं असतं मीं अहो, जवळ आहे म्हणून म्हणतों. तांदूळ तर सगळीकडं औषधाला देखील दिसत नाहीं हो. तसे मिळतात म्हणा कोशीस केली तर. परवा आडगावचे महिपत बाप्पा म्हणाले म्हणून दोन पोतीं मींच दिलीं त्यांना. सोळा ते वीस रुपये चवथ्या प्रमाणे कुणीहि घेतो. आता, तुमच्याशी खरेदी विक्रीच्या गोष्टी कशाला ? तुमच्या सोयी आम्हीं पाहूं नये तर कुणीं ? कांही कमती पडलं तर बेलाशक सांगत जा. आणि हें काय ? गोड्या तेलाचा दिवा दिसतो टणईवर ! घास-लेटचा डबा रिकामा झाला होय ? मग कां नाहीं सांगितलं ? पुन्हा दिलं असता एकदा पाठवून. अहो, आमचा धंदाच आहे. तांदूळ काय, गहूं काय अन् घासलेट काय, सरकार कांहीच पुरवीत नाहीं लोकांना. जास्त किमतीला का होईना आम्ही पुरवतों म्हणून लोकांच्या गरजा भागतात सगळंच महाग झालं तिथं ह्याच वस्तु स्वस्त कुठून मिळणार ? तुम्ही मात्र संकोच बाळगूं नका. तुम्हांला लागेल तें घरबसल्या देत जाऊं. लोकसेवा करणाऱ्या तुमच्या-

सारख्या त्यागी माणसाला फुकट घेण्यांत संकोच कशाला ? " पण लगेच सुंदऱ्याची आठवण होऊन ते म्हणतात, " काहो, तो सुंदऱ्या भिल आजकाल जरा शेफारला आहे. नांगी मोडली पाहिजे त्याचीं. म्हातारा असून बदमापगिरी जिरली नाहीं त्याची अजून. अहो, त्या लालबावटेवाल्यांशी त्याचा संबंध आहे ! अट्टल दरोडेखोर नी डांबीस आहे तो. आणि ह्या लाल-बावटेवाल्यांना तरी तशींच माणसं परवडतात. एका पराचे कावळे सगळे. शेतकऱ्यांना कां नाहीं चिथावणी मिळणार अत्याचार करायला ? परवाची रेंजर-साहेबांची गोष्ट ऐकून तर थक्क झालों बुवा मी. बिचारे सहीसलामत आले कसें हेंच नवल. या सुंदऱ्याला चांगला दाबलाच पाहिजे सुंदऱ्यासारखीं बदमाप माणसं हाताशीं धरून हे लालबावटेवाले भिल्लपावऱ्यांत शिरतील आणि आपल्या मंडळाविरुद्ध सगळयांना उठवतील. या देशद्रोह्यांच्या कारवाया वेळींच थंड पाडल्या पाहिजेत. "

" भाऊसाहेब, " शेटजींना भाऊ म्हणतात, " त्यांच्यांत कार्य करण्याची अजब हातोटी आहे, संघटनेचं कौशल्य आहे नी सर्व प्रकारच्या संकटांना तोंड द्यायची तयारी असते; पण त्यांच्यांत नी आपल्यांत मूलभूत तात्त्विक विरोध असल्यामुळं राजकारणाचा विचका उडतो. आपलं काम आपण प्रामाणिकपणानं करीत राहावं हेंच खरं "

" चुकतां आहांत रामभाऊ. तुम्हांला काय वाटतं कीं तुमच्यासारखेच तेहि सत्य-अहिंसेचे भोके आहेत म्हणून ? अशानं तुमचं कार्य धड होणार नाहीं. या लोकांना सडकलंच पाहिजे. अहिंसेसाठी हिंसा करावी लागली तरी हरकत नाहीं, पण यांना दयामाया दाखवून उपयोग नाहीं. तुम्ही इतके सज्जन आहांत म्हणून या भागात देखील लालबावट्याचे कार्यकर्ते बिनधोकपणें येतात-जातात. म्हणे संघटना करतात. कसल्या आल्या आहेत संघटना ? काँग्रेसनं शेतकरी-कामकरी राज्याचं ध्येय बाळगलेलं आहे. काँग्रेसवर विश्वास ठेवणं हीच देशभक्ति. या किसानसभांची नी कामगारसंघांची काय गरज ? आणि तो लालबावटा तरी हवा कशाला ? परक्या राष्ट्राचा झेंडा हे लोक खुशाल लोकांच्या हातीं देतात आणि वर्गविद्वेष पसरवण्याखेरीज दुसरं कांहीएक करीत नाहींत. यांच्या वर्गद्वेषी

राजकारणाला आळा घालण्यासाठी डोळयांत तेल घालून जपलं पाहिजे. डॉ. पट्टाभि सीतारामय्या म्हणतात तें पटतं आपल्याला. ही लालबावट्याची पुढाक हाकलून लावण्यासाठी उपलब्ध त्या सर्व साधनांचा उपयोग सर्रास करावा. लाठ्या चालवाव्या म्हणा ना. ”

आपला उपदेश रामभाऊंच्या डोक्यांत उतरत आहे असं दिसतांच शेट-जींना अधिक उभारी चढूं लागली आणि घरगुती प्रश्नांवरून राजकारणावर आलेलं चावळण्याच गाडं लालबावटेवाल्यांविरुद्ध इतकं घसरत गेलं की दीड केव्हां वाजला तें भाऊंना वा त्यांनाहि कळलं नाहीं. शेताकडं काय हालहवाल आहे तें पाहण्यासाठीं भाऊंना बरोबर घेऊन शेटजी टांग्यांतून निघाले. आजपर्यंत शेतांचा ताबा घेण्यांत त्यांना कधीच प्रयास पडले नसल्यामुळं धोंडूशेटनी आपल्या सूचना पूर्णपणें कृतींत उतरवल्या असतील असा त्यांना दृढ विश्वास होता. तीन वाजतां ऊन नरम झाल्यावर त्यांचा टांगा भाऊंच्या दारासमोरून धकला.

याच वेळेला हाळामागील खोदरीपलीकडं चारोळीच्या झाडाखाली भिल्ल-कोळयांच्या पोरांना जमवून मिठारामनं नुकतंच शिकवलेलं गाणं म्हणून भाऊंचा मुलगा नामू संघटनेचे खेळ करण्यांत दंग झाला होता. सगळ्या पोरांना त्याचा आवाज मारून टाकीत होता--

किसानसबा शेतकरीनी मावली । घरमनी सावली स व्हो !

पोऱ्हे सोरेस्ना देखीशी हाल । हातमा दिन्हा तिनि बावटा लाल ।

इय्या हातोळा दिन्हा बाहाल ।

‘ एकी करा ’ म्हनी सांगेल स व्हो ! ।।

उठा आयकीशी सबद मावलीना । मेंबर व्हयज्यात एक आनाना ।

शाती काळही आते सांगज्यात दुन्यामा ।

किसान सबाना आम्हु मेंबर सत व्हो ! ॥

शावकारवान्याना तोळीशी फास । पोऱ्हेस्लें दी ती सोनाना घास ।

घरमा लई ती सर्गेना वास ।

सूखना दिन तीस दावनार स व्हो ! ।।

त्याच्या ठसकेबाज गाण्याबरोबर सगळीं उघडींनागडीं पोरं मांझ्या टोकीत नाचत होतीं.

× × ×

राममाऊ नी जगनशेट गावांत शिरले तेव्हा त्यांना कोणतं दृश्य तिथं दिसलं? बहिऱ्या, सुंदऱ्या, सुभान्या वगैरे भिल्लांना त्याचप्रमाणे पाचसहा पावऱ्यांना नी कोळयांना पोलिसांनी अटक करून एकदोघांना बेदम बदडल्यामुळें गावांतले सगळे लोक खवळून गेले होते. त्यानी एकच गवेटी करायला सुरवात केली. एका पोलिसाच्या अंगावर दोघातिघांनी हात टाकला अशी पोलिसाची नी पाटलाची तक्रार होती. भिल्लांनी नी कोळया-पावऱ्यानी प्रतिकार म्हणून दंगल सुरू करतांच लाठीमार सुरू केला. सगळीकडं धामधूम नी आरडाओरड होऊं लागली. हा गोंगाट ऐकून सिटाराम, झिपरू नी जीवन डोंगऱ्याला घेऊन दौडतच आले. जमावाला शांत करायचा त्यांनी प्रयत्न चालवला. कैक लोक लाठ्यांच्या तडाक्यांनी घायाळ होऊन पडले—कांहींनी धडकी घेऊन पळ काढला. बायाबापड्या नी म्हातारीं कोतारीं आकांत करीत जखमी शरीरं सांवरण्याची कोशीस करीत होतीं. अर्ध्या तासांत चावडी-समोरचं पटांगण लढाई नंतरच्या युद्धभूमीप्रमाणे दिसूं लागलं. जमाव मोडला जाण्याची शक्यता दिसूं लागली. पण जगनशेटजींचा तांगा पाहतांच जमावाचा संताप उसळून आला. तांग्याच्या दिशेनं दगड फेंक सुरू झाली. घोड्यांना दगड लागले. तांग्याच्या तट्ट्यावरहि कांहीं आदळले. रामभाऊंच्या हाताला चोट बसली. त्यासरशी ते झांब येऊन तांग्यांतच पडल्यासारखे दिसले. धुरकऱ्याला मार बसला. शेटजी तावातावानं गरजले, “पोलीस! पोलीस! इकडं दगड लागताहेत. या लोकांना लालबावटे-वाल्यांची चिथावणी आहे. ते पाहा मागं उभे आहेत. सिटाराम, झिपऱ्या, सगळे लालबावटेवाले आहेत. सांभाळा, त्यांना मोकळीक दिलीत तर तुम्हाला गुन्हेगार धरीन हाणा या लालबावटेवाल्यांना-हरामखोरांना.” आणि त्याच वेळेला शेटजी एकदम दचकले. भिल्लांच्या घोळक्यांतून धडशी देऊन बाहेर येत ‘जीवन’ बरळू लागला, “खबरदार असला पाजीपणा कराल तर. लोकांना आम्हीं

चिथावलं काय ? त्यांना शांत करायचा प्रयत्न आम्ही करीत आहांत. हें दिसत नाहीं तुम्हाला ? जळीं. स्थळीं, काष्टीं, पाषाणीं लालबावटेवालेच दिसतात तुम्हांला. बतावणी करतां होय ? पोलीस ! मी यांचा मुलगा आहें. यांनी शेतकऱ्याची बायकापोरं नाडून स्वतांच्या तिजोऱ्या भरल्या. बहिऱ्या भिलानं कर्जनिवारणासाठी किसानसभेकडं अर्ज केलेला असूनसुद्धा माझ्या या वडलांनी त्याचं शेत बळजबरीनं ताब्यांत घ्यायचा घाट घातला. या स्वार्थलंपट सावकाराच्या खादीच्या कपड्यांना भुलूं नका. लोकांना नागवून, अत्याचार करून वर आणखी लाल बावटेवाल्यांच्या नावानं शिमगा करतां ? किसानसभा तुम्हांला पाहून घेईल. माझ्यापाशी सगळ्या शेतकऱ्यांच्या तक्रारी आणि या 'देशभक्त' सावकारांचीं पापं नोंदलीं आहेत. लोक हो, शांत व्हा. जें होणार असेल तें होऊं द्या. किसान-सभा तुमचा बचाव करील चोराला सोडून संन्याशाला फाशीं द्यायचा पोलिसांचा धंदा मोठा अजब दिसतो !"

"अरे बाबा, आम्हांला काय म्हणतां ? खून झाला तरी आम्हीं दंगेखोरांना मोकळंच सोडावं असं वाटतं की काय तुम्हांला ?" एक पोलीस जमादार म्हणाला.

"कशाला मोकळं सोडतां ?" झिपरू मध्येच बोलूं लागला. "तुम्ही सरकारचे बंदे. सरकारचा न्याय कांही नव्यानं सांगायला नको. खादीचे कपडे घालून देशभक्त म्हणून मिरवणारे हे बदमाष सावकार अत्याचारांतून सहीसलामत सुटतात नी बिचारे निरपराध लोकच तेवढे तुमच्या कायद्याला नी 'सुव्यवस्थे'ला बळी पडतात. जगनशेट नी त्याचे ते मवाली हस्तक गुन्हेगार असून तुम्हीं खुशाल या निरपराध लोकांना अटक करतांहा." "अहो मिस्टर, अटक कुणाला करावी हें तुम्हीं सांगायला नको आम्हांला." पोलिस जमादार करड्या आवाजांत बोलला. "तुम्ही लालबावटेवाले आहांत का ? म्हणूनच असले प्रकार होतात. तुम्हां लोकांना चांगलाच धडा दिला पाहिजे."

"पाहा. हे लोक इथं हजर असायचा नी खून व्हायचा संबंध अजिबात नाही कसा ? यांनींच चिथावणी दिली आहे लोकांना. बदमाष, देशबुडवे." शेटजी गरजले.

याच सुमारास एक दगड येऊन शेटजींच्या मांडीवर बसला. त्यासरशी ते मोठ्यानं किंचाळले. पोलिस पुन्हां पुढं झाले. लाठ्या सरसावल्या गेल्या.

"कोण आहे रे दगड फेकणारा ? शांत राहा सांगतों ना ?" जीवनचा आवाज ऐकून दगडफेक बंद झाली.

पण पोलिसांनी लाठीमाराचा हल्ला चढवीत मिठाराम, झिपरू नी जीवन यांच्याकडं मोर्चा वळवला. लोकांना शांत करीत नी जखमी गड्यांना उचलीत असतांना त्यांनाहि लाठ्या बसल्या. मिठाराम बेदम मारानं झांब येऊन खाली पडला. सुंदऱ्या धडशी देऊन सुटला नी त्यानं मिठारामला उचलून बाजूला काढलं. जीवनच्या हाताला चोट बसली. पोलिसांनी झिपरू, जीवन नी मिठाराम, यांना सुंदऱ्यासह अटक केली.

लोकांचा प्रतिकार बंद पडला होता. मारानं विवळणारे भिल्ल, पावरे, कोळी नी कुणबी पाहून त्यांच्यांतल्या नव्या संघटित एकजुटीबद्दल कुणालाही धन्यता वाटली असती. पण देशभक्त जगनशेटजी आनंदानं पोलिसांच्या बाजूला उभे होते. रामभाऊंची झांब उतरून तेहि खाली उतरले होते नी जखमी लोकांची विचारपूस करीत होते. बहिऱ्याच्या पोराचं प्रेत दोन भिल्लांकडून मोटारींत घालून आणि मिठाराम-झिपरूसह सोळा जणांना कैदखान्याची वाट दाखवण्याकरता मोटारीजवळ अटकावांत ठेऊन पोलिस चावडीच्या ओसरींत जाऊन बसले. जमादार खुर्चीत बसले. चहा-फराळ तयार करण्याची जमादाराची हुकमी आज्ञा होतांच पाटलांनी जागल्याला आंत पाठवून दिलं. शेटजीसुद्धा जमादाराच्या बहाल मर्जीमुळं एका खुर्चीतच आसन ठोकून बसले होते. गावांतल्या सगळ्या लोकांच्या नावांवर चोपड्याहून साखरेची पोतीं नी घासलेटाचे डबे नियंत्रित भावानं मिळवून स्वतांच बळकावून बसणाऱ्या पाटलानं फराळाचा मनपसंत बेत जमादारांना कळवला. जमादार तर खुशींत होते. तें त्यांच्या पिंजारलेल्या मिशांतून दिसणाऱ्या हास्यावरून कुणींहि ओळखलं असतं.

समोरच्या अंजनाच्या झाडाखाली उभे असलेल्या लोकांना उद्देशून जगनशेटजी बोलूं लागले, "तुम्हां लोकांना समजायला पाहिजे की असल्या प्रकारांत नुकसान तुमचंच आहे. तुमचेच जातभाई जखमी होतात नी तुरुंगांत जातात.

तुम्हाला पै-पैसा आम्ही पुरवतों म्हणून पोटाला तरी मिळतं तुम्हांला. नाहीतर दिसल असतं शेतीतलं सुख. वर आणखी तुम्ही या लालबावटेवाल्यांच्या भुलथापांना बळी पडतां. हे लोक तुमचं भलं करणार नाहीत, तुमच्यावर असले प्रसंग बेतायला हेच कारण आहेत. शांततेनं तुमचे प्रश्न सुटतील. पण तुम्ही किसानसभांच्या नी लालबावट्याच्या भरीला पडतां. शेतकरी-कामकरी रयतेचं राज्यस्थापन करणं हें काँग्रेसच ब्रीद आहे. सावकार आणि शेतकरी या दोघांनी सुखानं नांदावं अशी आमची इच्छा आहे. पण तुम्ही आमच्या जिवांवर उलटतां. लालबावटेवाल्यांना जवळ करूं नका. त्यांचं ऐकूं नका. ते तुम्हाला खड्डयांत नेतील. आजच्या दंगलीतून तुमचा काय फायदा झाला ? "

सुंदऱ्या भिल मध्येच बोलला,

" कोनले सांगतस तुम्हु, शेटजी ? बगयाना न्याव कयस आम्हले. लालबावटा उना म्हनी आम्हले धीर उना. किसानसबा उनी म्हनी करजदारीमाईन छुटानी आमना जाई. भुलथापा कोन दी ऱ्हायनं तें बी कयस आम्हले. किरशानन्या मुंड्या मोळीशी गबर व्हयनात तुम्हू. आखो खादीनां कपळा चळ्हाई देखावा करतस त्या शेटलमेनमा रंजकसाएब मुंड्या मोळी ऱ्हायना, आथा तुम्हु मोळी ऱ्हायनात. पन रंजकसाएबना आन तुमना बी पापे आम्हले मालूम सत. रंजकले आन तुम्हले किसान सबा देखी ली. ( कुणाला सांगतां, शेटजी ? बगळयाचा न्याय कळतो आम्हाला, लालबावटा आला म्हणून आम्हांला धीर आला. किसान सभा आली म्हणून कर्जदारींतून सुटायची आमना झाली. भुलथापा कोण देत असतो हें आम्हांला कळतं. शेतकऱ्यांच्या मुंड्या मुरगाळून गबर झालांत आणि वर खादीचे कपडे चढवून देखावा करतां. त्या जंगल सेटलमेंटमधे रेंजरसाहेब मुंड्या मोडतो, इकडं तुम्ही मोडतां. पण रेंजरसाहेबांची नी तुमची पापं आम्हांला मालूम आहेत. रेंजरला नी तुम्हांला किसान सभा पाहून घेईल. )

पोलिस जमादार नी शेटजी यांच्या हास्याचे तुषार उधळले गेले. जीवनकडं पाहून जमादार खोचदारपणानं शेटजींना म्हणतात, " शेटजी, हें मात्र बरं नाहीं आं. तुमचा मुलगाच्च या बदमाषांना मिळाला की. नाही तर दाखवला असता हात सगळ्यांना. लालबावटेवाल्यांचा खिम्मा करायला एक दिवस लागणार नाहीं. "

"काय करावं." शेटजी खुर्चीच्या डळमळत्या पायांकडं नजर टाकीत बोलले, "दुनिया उलटी झाली आहे. बापाला पोरगा विचारीत नाहीं आजकाल. कलियुग आहे झालं. दिसेल त्यालाहि बडगा नी येईल घरीं. जातो कुठं ? या लालबावटेवाल्यांत त्याचा कुठला टिकाव लागायला ? दुनियेंत सगळंच उलटं झालं आहे."

"अं. जाऊं द्या. आजकालचीं शिकलेली पोरंच तीं. त्यांचा काय भरोसा !" जमादारांनी साथ दिली रामभाऊंच्याकडं पाहात ते म्हणाले, "अहो भाऊसाहेब, काय पाहतां त्या लोकांना ? मोडलेली हाडं दुरुस्त करणारे डॉक्टर असतां तुम्हीं, तर आम्ही तुम्हांला दररोज भरपूर पेशंट्स् पुरवले असते ! या इकडं बसा. फराळाचं होईल तोंपर्यंत. ही तोहमत नसती तर आज पाटील-बोवांना चाळीस शेराचा बोकड मारायला सांगितलं असतं आम्हीं !......ओ, पण तुमच्यासमोर मी काय बोलतों हं ? आमचं खातं हें असं खातं-पितं आहे बुवा. तुम्ही देशभक्त लोक. तुमच्यासमोर तरी बोलण्यांत असले उल्लेख टाळले पाहिजेत !" आपली कैफियत शेटजींना कितपत पटली ते पाहण्यासाठी त्यांनी शेटजीकडं नजर टाकली. शेटजी नुसते हासले.

रामभाऊ मिठारामच्या सहकाऱ्यांपर्यंत येऊन ठेपले होते. त्या जुन्या सत्याग्रही सहकाऱ्यांना या स्थितीत पाहतांना भाऊंना खरोखरच वाईट वाटत होतं. त्यांनी सहजगत्या झिपरूला प्रश्न केला.

"तुम्ही फार दिवसांत दिसतांहां. मिठारामभाऊ काल आपल्याकडंच होते. आज इथंच होतां तुम्ही ?"

"नाही. वडतीला प्रचारासाठी जीवनबरोबर गेलों होतों. इथल्या प्रसंगाची हकीकत ऐकून तातडीनं आलों. तुमचे देशभक्त शेटजी म्हणतात की आम्हीं लोकांना चिथावणी दिली म्हणून!" झिपरूनं सांगितलं.

"जाऊ द्या हो" भाऊ म्हणाले, "पक्षोपपक्ष म्हटले की असे आरोप व्हायचेच. पण तुम्ही हजर नव्हतां या मुद्यावर तुमची सुटका होऊं शकेल"
"आणि बाकीच्या लोकांची ?" जीवननं पृच्छा केली. "आमची स्वतांची

सुटका नको आहे आम्हांला. आम्ही रयतेंत आहोत. रयतेबरोबर राहूं. या प्रसंगाला वैयक्तिक स्वरूप येऊन उपयोग नाहीं. सगळ्या लोकांना नाहक अटक करण्यांत आली आहे लाठीमार विनाकारण करण्यांत आला. सरकारी पोलिस खातं सावकारशाहीला मदत करीत आहे. या नोकरशाहीविरूद्ध नी सावकारशाहीविरूद्ध हा लढा आहे. त्याचं तें स्वरूप नष्ट होतां कामा नये. तुमच्या किंवा एखाद्या वजनदार गृहस्थाच्या मध्यस्थीनं सुटायचं नाही आम्हांला. मागं राहिलेली रयत सावकारांवर नी सरकारवर दडपण आणून आमची सुटका करील."

"तें कसं काय ?" भाऊंनी विचारलं.

"अहो आम्ही गेलों तरी किसान सभेचे इतर कार्यकर्ते आहेतच. प्रांतभर ते प्रचार करतील. रयतेची संघटित आघाडी उभारतील. कर्जनिवारण कायद्याचा लाभ घेऊं पाहाणाऱ्या शेतकऱ्यांविरूद्ध जगनशेटजींनी केलेल्या कारवायांमुळं आजचा प्रसंग ओढवला आहे. हें उघड सत्य आहे. त्या सत्याचा विजय होईल. किसानसभा सर्व गोष्टीचा विचार करून चळवळ करील." सिटारामचं हें उत्तर ऐकून भाऊ घटकाभर विचारांत पडले. नंतर ते हळूच म्हणतात, "तुमच्या कार्य पद्धतीबद्दल मला काहीहि म्हणायच नाहीं; पण अशा प्रसंगांत जनतेचं नुकसान नाहीं का ?"

"मुळीच नाही." झिपरू उत्तरला, "उलट या दडपशाहींतून रयतेची संघटना अधिकाधिक मजबूत होते. तिचा आत्मविश्वास वाढत जातो. सावकारशाहीविरूद्ध लढतांना निर्माण होणारी ही लढाऊवृत्ति स्वातंत्र्यलढ्यांत नी लोकशाहीच्या स्थापनेंत फार महत्त्वाची आहे. या गोष्टींकडं लोकशाहीच्या दृष्टीनं बघितलं म्हणजे तुम्हांला कळेल की जगनशेटजी या एका व्यक्तीविरूद्ध हा अत्याचार नव्हे. परकीय साम्राज्यशाही ही भांडवलशाहींतून निर्माण झालेली आहे. एकदोघा मुत्सद्यांच्या मनांत आल नी त्यांनी प्रदेश जिंकला असं साम्राज्यशाहीचं स्वरूप नव्हे तो सरंजामशाहीतला काळ मध्ययुगांत गेला. भांडवलशाही अर्थव्यवस्थेमुळं कच्च्या मालासाठी नी बाजार पेठांसाठी परके देश ताब्यांत ठेवण्याची गरज निर्माण होते. साम्राज्यशाहीचं

एकच एक कारण म्हणजे भांडवलशाही. परकीय साम्राज्यशाही मांडलदारी पद्धतींत आपल्या देशाची पिळणूक करते आणि स्वकीय भांडवलशाही, सावकार-शाही, जमीनदारशाही या पिळणुकींत भाग घेतात. म्हणून स्वातंत्र्याचा लोकशाही लढा हा स्वकीय सावकार-जमीनदारशाहीशींसुद्धां विरोधी असला पाहिजे. याचंच नांव पिळल्या जाणाऱ्या श्रमजीवी लोकांची वर्गसंघटनेची चळवळ तुम्ही त्याला वर्गविग्रह म्हणतां. वर्गीय लढा अपरिहार्य आहे. तो तुम्ही टाळूं शकत नाही किंवा तुमचं भिल्ल सेवामंडळहि नाहीं."

"मोठी दिलगिरीची गोष्ट आहे, भाऊ," जीवन म्हणाला, " तुमच्यांत नी आमच्यांत एका पिढीचं अंतर आहे. सुटाबुटांतल्या बड्या गावठी साहेबांचं अर्ज-विनंत्यांचं राजकारण बाजूला सारून लोकमान्यांनी तेल्यातांबोळ्यांचं राजकारण पुढं आणलं. गांधींनी रयतेंत जागृति उत्पन्न करून तिच्यांत सत्याग्रहाचं सामर्थ्य खेळवलं. तेंच राजकारण आम्ही पुढं नेत आहोंत. आमच्या राजकारणाची परंपरा उज्वल असून तें विकास पावणारं आहे. खादीधारी ढोंगी सावकार बगळ्यांचं राजकारण पराभूत करून किसान-कामगारांचं वर्गलढ्याचं प्रभावी राजकारण करून भांडवलशाहीचा जगांतून कायमचा खातमा उडवण्याचं कंकण आम्हीं बांधलेलं आहे. वर्गसलोख्याच्या भ्रामक तत्त्वज्ञानानं आजचे प्रश्न सुटणारे नाहींत. तुमच्यांत नी आमच्यांत मूलभूत तात्त्विक भेद आहेत. आमचे मार्ग नी साध्य हीं वेगळीं, तुमचीं वेगळीं माझ्यावडिलांनी वडीलकीच्या नात्यानं मला अटकाव करून पाहिला, पण मीं त्यांना दाद दिली नाहीं. सगळं जग पिळणाऱ्या नी पिळल्या जाणाऱ्या अशा दोन वर्गांत दुभंगलं आहे. माझे वडील तें सावरूं शकत नाहीत. माझ्या प्राणांत प्राण आहे, तोंपर्यंत याच भागांत वडिलांचा प्रमुख विरोधक म्हणून मी कार्य करीत राहणार. त्यांत माझाच जय होणार. जुनं जग विध्वंस पावून नवं पुढं आल्याच दृश्य लवकरच बाहेर तुम्हां-आम्हांला दिसेल. आम्ही तुरुंगाच्या वाटेवर असलों तरी लवकरच बाहेर येऊं बरं, आता मैदानावरच भेट होईल आपली. आपल्यासारख्या मान्यवरांशी दोन हात करण्यांत आनंद आहे. द्रोणाचार्य, कृपाचार्य, भीष्माचार्य, यांसारख्या वयानं नी प्रतापानं ज्येष्ठ असलेल्या गुरुवर्यांशी अर्जुनानं हक्का-साठी; न्यायासाठी, सत्यासाठी दोन हात केले. तोच आदर्श माझ्याहि समोर

आहे. वनवासांतून पांडव त्याप्रमाणे तुरुंगवासांतून एका महिन्याच्या आंत आम्ही अधिक खंबीर होऊन येऊ. माझ्या वडिलांना माझ्या कृतीमुळ तोंड काळं झाल्यासारखं वाटतं. त्यांना सांगा की जीवन तुमच्या घराण्याच नाव उजळ करणार आहे. सावकारशाहीच्या नरकांत जन्मलेला जीवन समतेच्या स्वर्गाच्या स्थापनेसाठी आयुष्य वेचणार आहे."

शेटजींनी आणि जमादारांनी बोलावल्यावरून भाऊ चावडीकडं वळले. अंधार पडल्यासारखाच होता. जातांना त्यांच्या मुखांत दोनच वाक्यं घोळत होतीं—"तुमच्यांत नी माझ्यांत फार अंतर आहे... . वनवासांतून पांडव त्याचप्रमाणे तुरुगवासांतून आम्ही अधिक खंबीर होऊन येऊं."

---

## ६

झाडांच्या सावल्या पूर्वेकडं लांब पसरल्या होत्या. समोरच्या अंजनाच्या झाडा आडून सूर्य नारायण आपले अखेरचे कटाक्ष अत्यंत हळुवारपणें फेकीत होता. धरतीवर पसरलेलं ऊन नरम झाल्यानं, नुकतंच लग्न झालेल्या बाल नवर-देवाच्या धोतरासारखं पिवळट दिसत होतं.

समोरच्या लवणाआडून अधूनमधून शेतकऱ्यांचे गाडे येतांना खडखडाट होई, डोकीवर रिकाम्या घागरी घेऊन परत येतांना मजूरणी हातपाय धुण्यासाठी लवणाच्या काठावर थांबत, त्यांची घरगुती विषयांवरील बोलचाल अस्पष्टपणें कानांवर येई. मायबापांची वाट पाहात पोरं हाळा समोरच्या पटांगणांत धमाल करीत होतीं. त्यांचा मेव्या भाऊंचा नाम्या होता. त्याचं गाणं बहुतेक पोरांना तोंडपाठ झाल्यासारखं होतं. " किसान सबा शेतकरीनी मावली धरमनी सावली स हो!' हें गाणं म्हणत सगळीं पोरं कुदत होतीं. नामूबरोबर मधेंच तीं ' लाल

बावटे की जय" म्हणून ओरडत कोंडवाड्यावरल्या झाडावरील सुक्या दोडक्यांना दगड मारण्यांत दंग होत.

कोंडवाड्यांत अजूनहि निम्मीं शिम्मीं ढोरं कंबरतोलीत उभीं होतीं. दोन दिवसांनीच त्यांचा लिलांव होणार ह्या विचारानं समोर मैचीवर बसलेल्या भाऊची थोडी चलबिचल झाली. तिकडून दृष्टि काढून ते समोर बघूं लागले शंकर मोटकरी हाळावर मोट हाकलत होता. थाळण्याचा चोळा सोडल्यामुळं ढोरांच्या कुंडांत पाणी धोधो पडूं लागलं होतं. तो आवाज ऐकून लवणाकडून येणारीं काही ढोरं पाणी पिण्याकरता कुंडाकडं लगबगीनं येऊं लागलीं होतीं.

भाऊंच्या बाजूलाच मैचीवर 'विश्वबंधु' नी 'लोकयुग' या वर्तमानपत्रांचे दोन अंक पडले होते. त्यांतील मजकुराबद्दलच ते विचार करीत होते. 'विश्वबंधु' हें वृत्तपत्र फार मोठ्या प्रमाणावर खपणारं नी काँग्रेसवादी म्हणवणारं म्हणून ते अवश्य वाचीत. जगनशेटजीच त्याचे अंक चोपड्याहून एकदोन दिवसां आड पाठवून देत. 'लोकयुगा'चा अंक ते कधी वाचीत नसत. चीरवाड्याला अटक होऊन लगेच सोडून देण्यांत आलेल्या जीवननं तो अंक मुद्दाम त्यांच्याकडं पाठवून दिला होता. नुकत्याच झालेल्या लाठीमाराबद्दलचा वृत्तान्त दोन्ही पत्रांत परस्पर विरुद्धच आला होता म्हणाना. ते दोन्ही वृत्तान्त दोनदा वाचूनसुद्धा भाऊचं समाधान होईना. झालेल्या गोष्टींची अधिकृत माहिती बरीचशी त्यांना होती. पण त्यांचं उद्विग्न मन त्या वृत्तान्तांनी अधिकच हेलकाव्यांत सापडल होतं. त्यांनी "विश्वबंधु" चा अंक उचलला नी भिल्ल सेवामंडळाचे अध्यक्ष जगनशेट यांनी पाठवलेला वृत्तान्त त्यांतून वाचायला सुरवात केली.

## " खानदेशांत लाल गुंडांचे अत्याचार.

### भिल्ल-पावऱ्यांना अत्याचारास चिथावणी देऊन काँग्रेसची बदनामी करण्याचं कुटिल राजकारण.

( भिल्लसेवामंडळ, पूर्वखानदेश, या संस्थेच्या अध्यक्षांकडून. )

चोपडा-यावल तालुक्यांना कर्जनिवारण कायदा लागू झाल्याची संधि-साधून सावकार-शेतकऱ्यांचे हितसंबंध सामोपचारानं सोडवण्याऐवजी लाल-बावटवाल्यांनी त्या भागांत भिल्ल, पावरे, कोळी, कुणबी, वगैरे अडाणी शेत-कऱ्यांना सावकार-जमीनदारांविरुद्ध अत्याचारास चिथावणी देऊन आपला राजकीय स्वार्थ साधण्यासाठी प्रयत्न चालवले आहेत. विशेषतः चोपड्याचे देशभक्त जगनशेटजी हे काँग्रेसचे अधिकारी असल्यामुळं त्यांच्याविरुद्ध चिथाव-लेला नुकताच एक अत्याचार घडला आहे. वीरवाड्याच्या भागातील देशभक्त जगनशेटजींच्या शेतांत त्यांचे नोकर औत हाकलत असता लालबावटेवाल्यांनी बहिऱ्या भिल नावाच्या शेतकऱ्यास 'तें शेत पूर्वी तुझं होतं, तुला तें मिळवून देऊं' असं सांगून शेतांत दंगल माजवली. अडाणी शेतकऱ्यांचा जमाव घेऊन ते शेतांत गेले आणि तिथं दे० भ० जगनशेटजींच्या नोकरांवर त्यांनी हल्ला केला. बराच वेळ बाचाबाची होऊन त्यांत बहिऱ्या भिल्लाचा मुलगा ठार झाला. कदाचित् शेटजींवर नी पर्यायानं कांग्रेसवर तोहमत आणण्यासाठीच लाल गुंडांनी स्वतः त्या मुलास ठार केलं असावं असा सर्वत्र समज आहे.

"या अत्याचारानंतर गावांत पोलीस आले. खुद्द देशभक्त जगनशेटजी हे या अत्याचाराची वार्ता ऐकून लगबगीनं चोपड्याहून टांग्यानं त्या जागीं गेले आणि लोकांना शांत राहायचा तसंच अविचारापासून परावृत्त होण्याचा त्यांनी उपदेश केला. परंतु जमावांत असलेल्या छुप्या लाल गुंडांनी लोकांना चिथावून दे० भ० जगनशेटजींवर त्याचप्रमाणे भिल्ल सेवामंडळाचे आचार्य श्री० रामभाऊ भारंबे यांच्यावर अमानुष दगलबाजीनं हल्ला केला. त्यामुळं पोलिसांना लाठीमार करावा लागला. लाठी हल्ल्यांत तीसचाळीस लोक जखमी झालेले असून कांहीं तर अत्यवस्थ आहेत. दे० भ० शेटजींना त्याचप्रमाणे श्री. रामभाऊ यांना लाल गुंडांकरवी बराच मार बसला आहे. तरीहि देश-भक्तांनी आणि श्री० रामभाऊंनी शांतपणं जमावाला आटोक्यांत आणलं. पोलि-सांनीं तिथल्या हजर असलेल्या मिठाराम चौधरी, झिपरू कोळी, सुंदऱ्या भिल, वगैरे लालबावट्याच्या कार्यकर्त्यांसह एकूण सोळा जणांना अटक केली.

"लाल-बावटेवाल्यांना जनतेंत स्थान उरलेलं नाहीं. जनता त्यांना पुरेपूर ओळखून आहे. त्यामुळं या देशद्रोही गुंडांनी अडाणी जमातींत व-

द्वेषाचं विष पसरवून आपला राजकीय स्वार्थ साधण्याचा डाव टाकला आहे. पण जनता दुधखुळी नाहीं. लाल गुंडांचे डाव जनता त्यांच्यावरच उलटवल्या-शिवाय राहणार नाहीं हें त्यांनीं लक्ष्यांत ठेवावं.

"भिल्ल, पावरे, कोळी, यांसारख्या मागासलेल्या जमातींत भिल्ल सेवा-मंडळानं शांततेनं पुष्कळ कार्य केलं आहे. मंडळाचं वर्चस्व कमी करण्यासाठी लालबावटेवाल्यांनी अत्यन्त कुटिल कारस्थानं रचलीं आहेत. लाठी मारांत लोकांचं मात्र नुकसान झालं. लाल गुंडांच्या धरमेंच्या कारवायानी जनता फस-णार नाहीं. दे. भ. जमनेटजी, भिल्ल सेवामंडळाचे आचार्य रामभाऊ आणि इथले महान पुढारी श्री. पांडुरंग गुरुजी त्या भागात जाऊन परिस्थिति आटो-क्यांत आणण्यासाठी नी जनतेला लाल गुंडांपासून सावध ठेवण्याकरतां लवकरच एकत्र येणार आहेत."

क्षणभर या वृत्तान्तातील सत्यासत्यांबद्दल आश्चर्य व्यक्त करीत भाऊंनी 'लोकयुगा'चा अंक उचलला नी सिटाराम-शिवरू-जीवन यांच्या फोटोकडे रोखून पाहून ते वाचूं लागले—

## " सावकार शाहीचा अमानुष बळी

### काँग्रेसच्या बुरख्याखाली सावकार-शाहीचा नंगा नाच

[ आमच्या खास बातमीदाराकडून ]

खानदेशांतील भिल्ल, पावरे, कोळी, वगैरे जमाती हजारो वर्षांपासून सावकार जमीनदारांच्या अमानुष पिळणुकीनं गांजले जात मध्ययुगीन अज्ञानांध-कारांत पिचत पडल होते. लालबावट्याच्या किसान सभेच्या नेतृत्वाखाली त्यांची एकजुटीची संघटना निर्माण करण्याचं कार्य चालू असतां चोपडा-याव-लच्या प्रतिगामी देशभक्त सावकारांनी सर्व उपलब्ध उपायांनी ह्या वाढत्या संघटनेस आळा घालण्यासाठी जंगजंग पछाडले. या भागांत तेथील प्रमुख गबर सावकार-जमीनदारांच्या आश्रयाखाली भिल्ल सेवामंडळ नावाची संस्था चालवली जात आहे. आजवर आठ वर्षांत या मंडळानं तेथील दलित जमातींत

संघटना करण्याचं कार्य अजिबात न करतां सावकारांच्या स्वार्थी कारवायांना पोषक वातावरण निर्माण केलं. चोपड्याचे देशभक्त सावकार श्री० जगनशेटजी हे या मंडळाचे अध्यक्ष आहेत, मंडळाचे कार्यवाह श्री० रामभाऊ भारंबे यांच्या प्रतिगामी नेतृत्वामुळं हें मंडळ प्रत्यक्ष सावकार सेवा मंडळच बनलं असून उपर्युक्त जमातींच्या प्रगतींत खीळ घालण्यापलीकडं त्याच्याकडून कसल्याहि कार्याची अपेक्षा नाहीं. कामकरी-शेतकरी राज्याचा डांगोरा पिटणाऱ्या नी काळ्या बाजारांत त्याचप्रमाणे सावकारींत बेसुमार लूट मिळवणाऱ्या जगनशेटजींनी वीरवाड्यांतील आणि इतरहि गावातील शेतकऱ्यांनी कर्जनिवारण कायद्यान्वयें अर्ज करूं नयेत म्हणून त्यांना दहशत घालून पाहिली. परंतु किसान सभेमुळं जागृत झालेल्या शेतकऱ्यानी भराभर सभेकडं अर्ज भरून आपले प्रश्न सोडवून घेण्याची तत्परता दाखवली. किसान सभेवर दात ओठ खाणाऱ्या जगनशेटजींनी शेतकऱ्यांच्या जमिनी, चीजवस्त नी जित्रापं ताब्यांत घेण्यासाठी योजिलेल्या अमानुष उपायांपैकी एकाची नुकतीच घडलेली हकीकत अशी.

वीरवाड्यांतल्या बहिऱ्या भिल्ल नावाच्या शेतकऱ्यानं किसान सभेकडं कर्जनिवारणासाठी अर्ज केलेला असूनहि शेटजींनी त्याचं शेत बळजबरीनं ताब्यांत घ्यायचा घाट घातला. आजवर मूळ मुद्दलाच्या सात आठ पटींनी अधिक फेड त्यानं केलेली असूनसुद्धा कर्जाचा भरमसाट आकडा दाखवण्यांत आला. शेत ताब्यांत घ्यायला आलेल्या गुमास्त्यानी नी भाडोत्री मवाली हस्तकानी शेतांत बाचाबाची सुरू केली. कर्जानं गांजलेल्या बहिऱ्या भिलान उद्वेगाच्या भरांत स्वतांच्या मुलाला शेतावर आपटून त्याचा जीव घेतला. "बापाच्या कर्जदारीमुळं मुलानं मोठेपणीं बापाला शाप देऊ नये, म्हणून मीं त्याला मारलं" हे बहिऱ्याचे उद्गार कुणाहि स्वातंत्र्य प्रेमी जनता-मित्राच्या हृदयाला पाझर फोडतील.

प्रेताचा पंचनामा होऊन पोलिसांच्या पहाऱ्यांत लोकांना डांबण्यांत आलं तोंच देशभक्त जगनशेटजी नी भिल्ल सेवामंडळाचे श्री. रामभाऊ भारंबे टांग्यानं तिथं आले. शेटजींनी लालबावट्याला शिव्या देऊन शिमगा साजरा केल्यामुळं भिल्लांनी नी कोळ्यांनी त्यांच्याभोवती दंगल केली. पोलिसांनी लाठीमार

केला. किसान सभेचे कार्यकर्ते सिटाराम चौधरी, झिपरू कोळी, जीवन, हे बाहेरगावाहून प्रचार करून परत आलेले होते. त्यांनी जमावाला शांत ठेवण्याचा प्रयत्न केला. पण शेटजींनी पोलिसांना चढवून आगींत तेल ओतलं. दुसऱ्यांदा लाठीमार होऊन बरेच लोक जखमी झाले. त्यानंतर वरील किसान कार्यकर्त्यांसह सोळा जणांना अटक करण्यांत आली. खादी पांघरून देशभक्त झालेल्या जगनशेटजींना सर्वां देखत पोलिस जमादाराबरोबर खान्याचे वाटेकरी होण्यांत लाज वाटली नाहीं. कॉंग्रेसच्या नावाखाली लालबावट्याविरूद्ध नी किसान सभेविरूद्ध शिव्यांचा, गुंडगिरीचा शिमगा करणाऱ्या नी शेतकऱ्यांची अमानुष पिळणूक करणाऱ्या जगनशेटजींचे चिरंजीव कॉ० जीवन हे घरादारावर पाणी सोडून किसान सभेचे कार्यकर्ते झालेले आहेत. त्यांना अटक करून नंतर चोपड्यास त्यांची सुटका करण्यांत आली. किसान सभेंत सामील न होण्यासाठी नी कर्जनिवारणासाठी अर्ज न करण्यासाठी शेटजी शेतकऱ्यांना धाकदपटशा दाखवीत आहेत. भिल्लसेवामंडळाचे कार्यवाह श्री. रामभाऊ हे सावकारसेवा करण्यांत पूर्ववत् दंग आहेत.

भिल्लांच्या सेवेच्या नावावर सावकारी स्वार्थ साधणाऱ्या या नकली देशभक्तांचे कावे न ओळखण्याइतके भिल्ल भोळे राहिलेले नाहींत. किसान सभेच्या प्रचारामुळं ते जागृत झालेले आहेत. सावकारशाहीचा नंगा नाच त्यांच्या एकजुटीच्या प्रहारानं लवकरच बंद पडेल यांत शंका नाहीं.

लालबावटेवाल्यांना हाकलून द्या, त्यांचा संबंध तोडून टाका, वगैरे प्रलाप करण्यासाठी देशभक्त शेटजी त्या भागांत कॉंग्रेसच्या नावाखाली प्रचारास निघाले आहेत. जनता त्यांना रोखठोक जबाब देऊन हजारोंनी किसान-सभेकडं वळत आहे.

स्वताला जनतेच्या भवितव्याचे मिरासदार समजणाऱ्या नकली देशभक्तांनीं कर्जनिवारणासाठी शेतकऱ्यांत प्रचार करण्याऐवजी उलट विरोध करून दडपशाहींत पोलिसांशी हातमिळवणी करावी यांत कॉंग्रेससारख्या महान राष्ट्रीय संस्थेची इभ्रत खास नाहीं. कॉंग्रेसच्या नावाला नी परंपरेला काळोखी फासणाऱ्या देशभक्त सावकारांचे दिवस भरत आलेले आहेत हें त्यांनी स्पष्ट समजावं. त्याचप्रमाणे वरील प्रदेशाच्या डोंगराळ भागांतल्या जंगलसेटलमेंटमधील रेंजर-

साहेबांचीं कृष्णकृत्यं पूर्णपणें तेथील किसान सभेच्या हातीं आलेलीं आहेत. त्याबद्दल योग्य ते इलाज करून प्रतिगामी सावकार-जमीनदारांना नी सोद्या नोकरशाहीला भिल्ल-पावऱ्यांच्या नी कोळयांच्या जागृत एकजुटीचा तडाखा लवकरच बसेल असा इशारा देतों "

सातपुड्याच्या डोंगरटांत शतकानुशतकं गुलामगिरींत पडलेल्या भिल्ल वगैरे जमातींबद्दलचा केवढा आशावाद या वृत्तान्तांत भरलेला होता! घटकाभर भाऊंना वाटलं, आपलं कुठं चुकतं तें आपल्याला समजलं आहे: बस्स, आता चुकीची दुरुस्ती केलीच पाहिजे. समोरच्या हाळाच्या कुंडांत एक वगार पाणी पितांना पडून गचकाड्या खाऊं लागली, त्यानं ते भानावर आले. वगार काढण्यासाठी ते पुढं जाणार तोंच ती धडपड करून निघाली मुद्धा. ते तसेच दाराकडे वळले. वृत्तपत्रांचे अंक छताच्या टोकरात खोवून आत गेले. पाट्यावरवंट्याची घरघर चालली होती. पतीच्या राजकारणापासून नी लौकिकापासून पूर्णपणे अलिप्त राहिलेल्या त्या आजन्म गुलाम स्त्रीकडं भाऊंनी कधीच लक्ष्य दिलेलं नव्हतं. तिच्या आयुष्यांत घरकाम, मुलंबाळं, पतिसेवा, या पलीकडं कसलाच कार्यक्रम नव्हता. पौरुषेय सृष्टीपासून सर्वांशां अलग पडलेल्या चिंधाबाईची आजारांतहि काम करण्याची ती आवखात पाहून भाऊंच्या मनांत आलं, "आजपर्यंत मन्साराममबोवा भारंब्याचा मुलगा म्हणून नांवाजण्यासाठी मीं शिक्षण घेतलं नी सत्य सांभाळून नोकरी केली. भिल्लांसाठी मंडळ चालवीत आलों अशी माझी श्रद्धा होती, पण भिल्लांत सुधारणा न होतां त्यांचा विरोधक म्हणून धिक्कार होऊं लागला. देशोद्धाराच्या गप्पा मारणाऱ्या मला बायकोकरतां जन्मभर काय करता आलं? तिचं अज्ञान मीं नष्ट केलं नाहीं, तिची स्थिति सुधारली नाहीं, तिच्या गुलामीवजा कष्टांकडं सहानुभूतीनं पाहिलं नाहीं. काय घडलं माझ्या हातून? आणि ते मिठाराम—झिरू—जीवन—त्यांच्यांत नी माझ्यांत सात समुद्राएवढं अंतर आहे. माझा मुलगादेखील 'किसानसभा शेतकरींनी मावली' हें गाणं म्हणून लालबावट्याचा जयजयकार करूं लागला आहे. अन् मी—जुनाट—बुरसलेला—प्रतिगामी—कसा आहें मी? माझं मलाच कळत नाहीं."

निराशेनं किंकर्तव्यमूढ झालेल्या भाऊंच्या डोळ्यांतून पटापट आसवं गळालीं!

पण त्यांच्या त्या दुबळया आसवांनी सावकारशाहीचीं पापं धुवून निघणारीं नव्हतीं वा पुढं पुढं चाललेल्या भिल्ल—कोळयांच्या लोकशाही शक्तींना त्यांची पर्वा नव्हतीं. कुठं भाऊ नी कुठं जीवन ? पहिला रेशमाचा किडा कोष फोडून बाहेर येऊं शकला नव्हता; दुसरा सावकारशाहीच्या नरकांतून—यमपुरींतून निसटून आला होता. नचिकेत ! नचिकेत ! मन्सारामबोवांच्या धाब्यावर गोष्टी सांगण्याचा प्रसंग भाऊंना आठवला. या वेळेस वडिलांचा मार्गदर्शक गूढ संदेश मिळेल तर बरं होईल असं त्यांच्या श्रद्धाळू मनाला वाटलं. पण तें शक्य नव्हतं. अध्यात्माची नी अंधश्रद्धेची कात ते टाकूं शकले नव्हते. जगनशेटजीं समोर नव्हे तरी स्वतांला साक्ष ठेवून त्यानी श्रद्धेनं दोन्ही हात जोडले नी ते पुटपुटले—
" जीवन ! तुझ्यांत खरं जीवन आहे. तुला माझे प्रणाम असोत. मी दोहींपैकी कुणीकडंच नाहीं आता. मी राजकारणातून संन्यस्त होणार. जीवन पुढं पुढं जाणार. त्याचं गाणंच तें आहे—'लोकयुगा'च्या अंकांत आलेलं—

पुढंच आता पुढंच पाय—मागं आता आहे काय ?
असे पसरली वाटेवरती जरि मरणाची खाय,
बेड्या, लाठ्या, तुरुंग, दगडी, यांचे आम्हां काय ?
स्वातंत्र्याचे रविकिरण
दिसता उठलो जागून,
काळोखांतच मग ठेचाळत राहिल कोणी काय !
शेतकरी नच दुबळा भोळा
कळिकाळाशी झुंजायाला,
हातीं घेऊन शीर उतरला रणिं मिळवाया न्याय
तोफ बंदुका बॉंब घेऊनी
पुंजीवाले येतिल धावुनि,
परतवावया परी न आम्हां व्यालि कुणाची माय
एकजुटीच हत्यार हातीं
लाल बावटा खांद्यावरती,
स्थापुं आपली सत्ता जगतीं करून शत्रुची राय !

जा. असेच पुढं जा. सावलीच्या उन्हांत तळतळणाऱ्या जिवांनो पुढं जा."

## 'सावलीच्या उन्हांत' या कादंबरीतील
# प्रादेशिक शब्दांचे अर्थ

अडपझडप—काहीसें, थोडें, कांही अंशीं.

अदावत—वैर, स्पर्धा, 'इखार'.

अधेला—दिडकी, शिवराई, पाव आणा.

अमाक—थोडें, किञ्चित्, जरा.

आकोडा—दोर आवळून बांधण्यासाठी घालावयाची लाकडी कडी.

आघुरडा—'कुर्त्रा' नावाचीं झुडपें.

आणभक—सुनाट वाटणारें, कसेंसें,

आंडोर—मुलगा, पुत्र.

आपेमान—अपमान, उपमर्द.

आफत—तोहमत.

आमना—इच्छा, मनीषा, उमेद.

आवकाळ्या—कष्ट, शिकस्त, यातना.

आव्हळा—एवढा.

उच्छाव—उत्सव, समारंभ, जत्रा.

उंधायकी—चक्रमपणा, खोटेपणा, लबाडी, असत्याचें वा अशक्याचें प्रतिपादन.

उंधायकी तापटणें—चक्रमपणासारखें बोलणें, अशक्य प्रतिपादणें, वाकडें बोलणें, अनाठायीं दुराग्रह धरणें, खोटें बोलणें.

उभारी—उमेद, प्रेरणा, स्फूर्ति, धिवसा, उत्तेजन, आशावाद.

उंबर—उमर, हयात, आयुष्य, वय.

उसू—नाल्याच्या बाजूनें नदीचा पुराच्या वेळेस येणारा भाग.

नंबरी, एकनंबरी—उत्कृष्ट, झकास, फस्कलास (फर्स्ट क्लास).

कचकण—झुडपांची अडगळ, दासण.

कारडणें—कसेंबसें चावून फोडून खाणें.

करंटी—बैलांचें खिल्लार (चरायला जाणारे).

कऱ्हो—नांगर समतोल ठेवण्यासाठी धरावयाचें रुमणें.

कसा—पैसे ठेवण्यासाठी विणलेली कमरेला गुंडाळावयाची पिशवी.

कानोडी—१. लज्जित, शरमिंधी; २. मिंधी.

कानोडेपणा—१. लज्जा. २. मिंधेपणा.

कुढापा—१. कष्ट, हाल, काचाड कष्ट. २. अनाठायी काटकसर, चिक्कूपणा, ओढाताण.

कुतरळा—१. कुतरडे २. 'आघुरडा' नावाची झुडपें.

कुन्ता—करिता, साठीं. (शब्दयोगी अव्यय).

कूट—गव्हाच्या वा बाजरीच्या झाडांचा भुसा (गुरांसाठीं).

कोठाईन—कुणापासून.
खकाणा—१.नाकात जाणारी त्रासदायक धूळ, तिखट धूळ २. कचरा केर.
खादी—खाद्य, खुराक, पौष्टिक खाद्य वा आहार, मुबलक आहार.
खालीपिली—विनाकारण.
खिट्टी—चेष्टा, खोड्या.
खेमर, खेचर—थट्टा, चेष्टा, विनोद, लाजवण्यासाठी केलेलें विनोदी भाषण.
खोदरं } खोदरी —नाला, ओढण, लाहांगी, दरकूट.
खोलाण—दोन्ही बाजूंना उंच भाग असून मधून जाणारा रस्ता, खोलगट भाग.
गथची—गळा.
गाई, गाळी—शिवी; दूषण.
गाठ ढळणें—वैचीला फळ लागणें, वैचीची गाठ ढळणें.
गिरदकं—फाटक.
गुड—पेंड्या रचून केलेला ढुडा.
घरजाळू—घरदाराचा नाश करणारें,
घरोट—जातें. [घरचुडवें
घागरा—'घमाड', परकर.
घेवार, घेगार-भीति निदर्शक कोलाहल, आकान्त, भीतिप्रदर्शक आरडा ओरड.
घोण घालणें—खाली मान घालणें.
चापट—चापट, थप्पड.
चावळणें—गप्पा मारणें, बोलणें, बातचीत करणें.
चिघूर—चिंचेचा फुलोरा.
चुडेल—भूत ( स्त्रीचें )
जबून—वाईट, बेरड, हरामखोर, चढाईखोर.
जातक—म्हणू, जसें कांही.
जाबेल—वाईट, जबून,बेरड.
जिव्राप, जिव्राच—दोर, गुरू.
जोडापा—१. जोड, पुरवणी, पुष्टि. २. साहाय्य, मदत. ३. पाठिंबा, अनुमति.
झावर—वाकळ, गोधडी.
झोऱ्या—मोठी सतरंजी, चोऱ्या.
टगरमगर—टकमक.
टपरी—विनभिंतीची किंवा कच्च्या धाब्याची खोली, साध्या लाकडांचें घर
टाहूली—१.खराब झालेला पिकाचा भाग, २. कवडसा, ठिपका ( सावलीचा वा उन्हाचा ), ३ पिकांत मध्येच डोकावणारे नापीक भाग.
टिमणें, टिमकाडणें—चदडणें, झोडपणें, मार देणें.
टोकर—बांबू, वेळू.
टोमा—मोठें पर्डें.
टरोंग—ध्येयशून्य मनुष्य, उडाणटप्पू.
ढगपडणें—आश्चर्य वाटणें, स्तंभित होणें, आश्चर्यानें कांही न सुचणें.

ढगा—दंडा, जाड काठी.
डकसा, डगसा—गुच्छ, झुपका.
डीर—अंकुर.
डोणगं—लहान नाव, होडी.
ढासण—कचकण, झुडपांवेलांची अडगळ.
ढुळका—'ढुयका' (अहिराणी व वऱ्हाडी बोलींत), डुलकी.
ढोरहुमाला—ढोरांप्रमाणें राबणें, काबाडकष्ट.
ढोरक्या—गुराखी, गुरें चारणारा.
तडसं—तरस, एक जंगली जनावर.
ताजें होणें—गबर होणें.
तेलचोळा—सगाई, सोयरिकींतला एक विधि, वाङ्निश्चय. (सगाई करतांना वरपक्षाकडलि बायांनी येऊन मुलीच्या केसांना तेल लावलें की सगाई पक्की होते ही चाल लेवा पाटीदारांत आहे)
तोटा—कडब्याचा मोट, धांडा.
थोर—कुंपणांत लावायचें एक झाड.
थोरवाटी—थोराचें कुंपण.
दंचळी—दमडी
दरवाड—वणवा, जंगलाला लागलेली आग.
दाण—खुराक, चंदी, सरकी वगैरे बैलांचें संध्याकाळचें खाद्य.
दुट्टी—धमकी, वटका, दुट्टी भरणें—धमकी देणें, वटका करणें.
दुपावणें—गर्भपात होणें.
धल्ला, धल्डा—म्हातारा, वृद्ध.
धांडा—कडब्याचा मोट; 'तोटा' पाहा.
धाबली—मामुली पद्धतीचें घर, कच्च्या बांधणीचें घर.
धिवसा—हिंमत, उत्तेजन, पाठबळ, उभारी.
नक्शी—वाईट; कुचमाल, कुटिल, गैर.
नफ्यांत होणें—अदृश्य होणें.
नानी मरणें—माघार घेणें, अंग काढून घेणें.
निभून—अगदी, पूर्णपणें, बिलकूल.
निर्नाम—अगदी, बिलकूल, पूर्णपणें, निभून.
निवतं—आमंत्रण, निमंत्रण (जेवणाचें).
न्याहाप, नाहाप—आश्चर्य, आश्चर्यकारक गोष्ट, चमत्कार.
पडाव—१ जंगलांतील मुक्कामाची जागा. २. जंगलांतलीं जनावरें रात्रीं गोळा होऊन बसतात ती जागा.
पयसा—पैसा, पैसे, संपत्ति, पयसावाला—श्रीमंत, इस्टेटदार, गबर.
परतण—चार बिघे.
पगोटी—दगडी ओटा (घराचा).
पाटावरोटा—पाटावरवंटा.
पाली—पल्लवी, पालवी.
पालदार— भरगच्च पालवीचा, पालवीदार
पिसली—पिशवी.
पुऱ्हाणं—गाडी हाकण्यासाठी लागणारी काठी.

पेहेळ, पेहेड—१. बीज, हाडपेर. २. शेतांत कुंद्याची किंवा इतर प्रकारच्या गवताची जमीन.

चट्टा—सगळा, पूर्ण, सबंध.

चलम—भाला.

चागूल—खांद.

चांडी—लबाडी, खोटेपणा.

चिढार—चिन्हाड.

चिपत—विपत्ति, हालअपेष्टा, कुढापा, तंगचाई, उणीव.

चेंबट—वाघाची एक जात.

चोफली शेकणें—चांगलाच मार देणें, शासन घडवणें.

चोफली शेकली जाणें—हाल होणें, कष्ट पडणें, नुकसान सोसावें लागणें, उपासमार होणें, इत्यादि.

भरकूस—पोटभर, पुरेपूर, पुष्कळ, भरपूर.

भुक्कड—१. दरिद्री, कंगाल, गरीब. २. खाऊलाग्या, लतकोडगा

भोंगऱ्या बाजार—पावरे जमातींतील लग्नाचा बाजार.

मगम—पोटभर जेवलेला.

माळी, माडी—आई.

माणकेश्वरी—अद्वाधुंदी, बेजबाबदारपणा, अरेरावी.

माप—१६ अधोल्या ( धान्य ).

मिठू—पोपट.

मुगा—उगा, मौनी, मुकाट्याने.

मुंडी—शिर, मान.

मेर—( शेताचा ) बांध, हद्द, सीमा.

मैची—बांबूची ताटी घातलेली खाट.

मोव्हाटी—पडवीवरील धाब्याचा भाग.

मोव्हाळं, मोव्हाडं, मोहाडं—तोंड.

रंघत; रंघती—रक्त.

रावण्या—विनवण्या, विनंती.

रोठी—जाडीभरडी.

लगनयाव—लग्नकार्य.

लवण—नाला, खोलाण.

लाव्हरी—पिकांत राहणारा एक पक्षी.

लोधडं—जंगलांतला उंटासारखा मध्यम आकाराचा प्राणी.

वडांग—कुंपण.

वायनं—विवाहानंतर नवऱ्यामुलीस माहेराहून बोलावणें येतें तें.

व्हकारा—होकार, साद, हाकेस दिलेला ओ.

शिकापन—कानमंत्र, शिक्षापण, शिकवलेलें

शिलावा—तितंबा, ओढाताण, नखरे, कांकूं, पुंडाई.

सईन—सहन.

संचार—चटणी.

सगेदा—सराव, सवय.

सासूल—चाहूल.

सुडकं—फडकें.

सूननजर—मारकी नजर, रागाची नजर

सूननजरेनं पाहाणें—रागाने पाहणें, मारक्या म्हशीप्रमाणें पाहणें.

सेयाणी--थंड, छायेची, नरम उन्हाची (वेळ).

सेयाणें—नरम उन्हांतून, सावलीत थंड वेळेस.

हराममौत—आत्मघात, कारणावाचून स्वताचें ओढवून घेतलेलें मरण.

हाळ—१. सार्वजनिक विहीर (जेथे मोट चालते अशी). २. गुरांसाठी असलेलें पाण्याचें कुंड.

उचल चोसंड्या—पगारी हस्तक, अल्प स्वार्थासाठी कृष्णकृत्यांत भाग घेणारा.

जीव—सार, ग्राह्यांश, अर्थ.

शावकार—सावकार.

वान्या—सावकार, मारवाडी व गुजराथी सावकार जमीनदार.

आखोर—आणखी.

आखो—आणखी.

घोळा—घोडा.

घोळा मार-नं—घोडा मारणें, नुकसान करणें.

तुपे—तुझ्यापाशीं.

मापे—माझ्यापाशी.

गचेटी—गोंगाट, गडबड, दंगल.

किरशान—किसान, शेतकरी.

कोरट—कोर्ट, न्यायालय.

व—अग, ग.

सराप—शाप, दूषण.

टिमकाडणे—चढवणें, चोपणें, मार देणें.

वजेवजे—१. हळुहळू. २. वेगानें. (दोन्ही प्रकारचे अर्थ होतात).

पुदाक—उपाद्, अनावश्यक गोष्ट.

मावली—माउली.

शाती—छाती.

डऱ्या—विळा.

पोऱ्हे—पोरे, मुलें.

सर्ग—स्वर्ग.

झांच—फेरी, चक्कर,

धुरकरी—गाडी हाकणारा.

चग्या—चगळा.

# आगामी प्रकाशनें



- कल्पनांचें साम्राज्य .... कादंबरी
  —पु. य. देशपांडे
- तिसरें राज्य .... .... नाटक
  —शरच्चंद्र टोंगो
- दूर कुठें तरी .... .... कादंबरी
  —लीला देशमुख
- चार जून .... .... कादंबरी
  —शं. बा. शास्त्री,
- आराधना .... .... कथासंग्रह
  —लीला देशमुख

---